नरेंद्र-कवि-कृत

# रुक्मिणी-स्वयंवर

(प्रस्तावना, पाठभेद, अर्थ-निर्णायक-टीपा, शब्दकोश व सूची यांसह)


संपादक–

विष्णु भिकाजी कोलते

एम्. ए., एल् एल्. बी.

मराठीचे अध्यापक किंग एडवर्ड कॉलेज, अमरावती.



१९४०

मुद्रक–श्री. तु. मा. पाटील

मॅनेजर, सरस्वती प्रिंटिंग प्रेस, अमरावती.

प्रकाशक–श्री. ज. भि. कोलते

मॅनेजर.

अरुण प्रकाशन मलकापूर ( वऱ्हाड )

किंमत २॥ रुपये

# अनुक्रमणिका.

# दोन शब्द

नरेंद्र-कवीचें रुक्मिणी–स्वयंवर आज अभ्यासकांसमोर ठेवतांना मला अत्यंत आनंद वाटतो. वस्तुतः दोन वर्षांपूर्वीच हें काव्य वाचकांच्या पुढे येण्याचा योग आला होता, पण कांही कारणांमुळे तसें होऊं शकलें नाहीं. प्रस्तुत आवृत्ति तयार करण्यासाठी मला सर्व प्रकारची मदत करणाऱ्या माझ्या मित्रमंडळीचा मी अत्यंत आभारी आहे. विशेषतः महानुभाव पंथांतील ज्येष्ठ व श्रेष्ठ महंत श्रीदत्तलक्षराज, श्रीयक्षदेव महानुभाव, श्रीगोपीराज ऊर्फ महात्मा मुशाफीर, श्रीकृष्णराजदादा लासूरकर, श्रीमुरलीधरशास्त्री, श्रीबाळकृष्णशास्त्री इत्यादिकांनीं पोथ्या वगैरे साधनसामुग्री देऊन मला ऋणी करून ठेवलेलें आहे. औपचारिक रीत्या त्यांचे आभार मानण्यापेक्षा त्यांच्या ऋणांत राहणेंच मी अधिक श्रेयस्कर समजतों.

प्रस्तुत ग्रंथ सर्वसामान्य लोकांकरिता नसून मराठी भाषेचा आस्थेवाइक अभ्यास करणाऱ्यांकरिता आहे. अशा प्रकारचें प्रकाशन कसें कष्टाचें व जिगजिगीचें असतें हें मी सांगावयाला नको. तथापि, अभ्यासकांना अल्पस्वल्प प्रमाणांत जरी या पुस्तकाचा उपयोग झाला तरी माझ्या श्रमाचें सार्थक झालें असें मी समजेन. यापेक्षा अधिक तें काय लिहायचें !

**विष्णु भिकाजी कोलते**

# संदर्भ ग्रंथ व त्यांचे संक्षेप

## महानुभावीय पोथ्या.

तृतीय शोधनीचा टीपग्रंथ [टीप]
पद्मपुराण. मराठी.
नवखंड रुक्मिणीस्वयंवर.
नरसिंहकृत रुक्मिणीस्वयंवर.

## महानुभावीय ग्रंथ

आद्य मराठी कवयित्री. (संपादक वा. ना. देशपांडे) यांतील धवळे-पूर्वार्ध [धपू.]; धवळे उत्तरार्ध [धउ]; मातृका रुक्मिणीस्वयवर [मारु].
स्मृति-स्थळ. [स्मृ. स्थ] संपादक. वा. ना. देशपांडे.
महानुभावीय मराठी वाङ्मय. लेखक. य. खु. देशपांडे
ऋद्धिपुरवर्णन. [ऋ]. संपादक. य. खु. देशपांडे.
उद्धवगीता. [उ]. संपादक. कोलते.
ज्ञानप्रबोध [ज्ञाप्र.] चित्रशाळा प्रेस.
शिशुपालवध. [शि] संपादक. भावे.
वच्छहरण [वच्छ] सं. वि. ल. भावे.
रुक्मिणीस्वयंवर-संतोषमुनि कृष्णदास.

## महानुभावीयेतर

ज्ञानेश्वरी. [ज्ञा.] संपादक. कुंटे.
[ज्ञा.रा.]=राजवाडे यांची आवृत्ति.
[ज्ञा.बं.]=बंकटस्वामींची प्रत.
अमृतानुभव. [अमृ]. प्र. सी. सुबंध यांची आवृत्ती, अनुभवामृत दीपिका
पांडवप्रताप. निर्णयसागर प्रत.
हरिविजय. निर्णयसागर प्रत.
मुक्तेश्वर-सभापर्व. [मुक्ते. सभा.]
मोरोपंत-कृष्णविजय [मोरो. कृवि]
महाराष्ट्र सारस्वत. वि. ल. भावे. आवृत्ति तिसरी.
Geographical Dictionary. N. L. Dey. Calutta Oriental Series, No. 21.

## संस्कृत

महाभारत. सभापर्व. का. वा. लेले.
पद्मपुराण. आनंदाश्रम व वेंकटेश प्रेसमधील आवृत्त्या.
भागवत-दशमस्कंद.
हरिवंश-चित्रशाळा.
संगीत समयसार. [संस] त. गणपति शास्त्री.
संगीत मकरंद [संम] म रा. तेलंग.
अभिनवरागमंजरी [अमं]. प्रकाशक श्री. सुखटणकर.

# प्रस्तावना

## महानुभावांचे साती ग्रंथ

महानुभावीय काव्यवाङ्मयांत रुक्मिणी–स्वयंवर, शिशुपालवध, उद्धव-गीता, वच्छहरण, ज्ञानप्रबोध, ऋद्धिपुर–वर्णन व सह्याद्रि–वर्णन, हीं सात काव्यें विशेष प्रसिद्ध आहेत. यांनाच 'साती ग्रंथ' असें म्हणतात. अर्थात आज प्रसिद्ध होत असलेलें प्रस्तुत 'रुक्मिणी–स्वयंवर' हें काव्य या साती ग्रंथांपैकीच होय. वर निर्दिष्ट केलेल्या सात काव्यांपैकी रुक्मिणी–स्वयंवर व सह्याद्रि–वर्णन हीं दोन सोडून बाकीचीं सर्व काव्यें यापूर्वीच प्रसिद्ध झालेलीं आहेत. आज या काव्याच्या प्रसिद्धीकरणानें त्यांत सहाव्या ग्रंथाची भर पडेल. राहतां राहिलें सह्याद्रि–वर्णन. तेवढें काव्य प्रसिद्ध झालें म्हणजे हे 'साती ग्रंथ' पूर्णपणें महाराष्ट्रीय रसिकांच्या समोर येतील. याच दृष्टीनें सह्याद्रि–वर्णन काव्यसुद्धा लौकरच प्रसिद्ध करण्याचा माझा विचार आहे. पण ती पुढची गोष्ट. आज नरेंद्र कवीचें 'रुक्मिणी–स्वयंवर' मी रसिका-समोर ठेवीत आहें व तेवढ्याचपुरतें या ठिकाणीं लिहावयाचें आहे.

प्रस्तुत काव्य ग्रंथस्वरूपांत महाराष्ट्रीय वाचकांसमोर आज प्रथमच येत आहे. यापूर्वी कै. [1]भावे, श्री. य. खु. [2]देशपांडे, श्री. ह. ना. [3]नेने इत्यादि सुप्रसिद्ध संशोधकांनी आपल्या लेखाच्याद्वारें त्याची केवळ तोंडओळख करून दिलेली होती. अर्थात, त्यांच्या लेखांवरून या काव्यांतील चारदोन सुंदर उताऱ्यापलीकडे अधिक माहिती मिळणें शक्य नव्हतें. पण त्यांच्या त्या लेखांनी प्रस्तुत ग्रंथाविषयी महाराष्ट्रीय रसिकांची जिज्ञासा वाढविण्याचें कार्य मात्र फार उत्तम रीतीनें केलें होतें त्याचें दृश्य फळ म्हणजे आज प्रसिद्ध होत असलेली या काव्याची प्रस्तुत आवृत्ति होय. हें काव्य वाङ्मयगुणांनी इतकें पूर्ण भरलेलें आहे की, त्याच्या संपूर्ण अभ्यासानें रसिक वाचक मोहित झाल्याशिवाय राहणार नाहींत; आणि या काव्याच्या प्रसिद्धीकरणानें प्राचीन

---

१. महा–सारस्वत. भाग १-१०७. २. महानुभावीय मराठी वाङ्मय. पृ. ३०. ३. भा. इ. सं. म. त्रैमासिक. वर्ष १५. अंक. २.

मराठी काव्यवाङ्मयांतील एका बहुमोल काव्याचें आपणास दर्शन घडलें असेंहि त्यांना वाटल्यावांचून राहणार नाही. प्रस्तुत जी आवृत्ति मी आज अभ्यासकांसमोर ठेवीत आहें तिचा थोडा संशोधनात्मक इतिहास या ठिकाणीं देणें अवश्य वाटतें. हा इतिहास पुढीलप्रमाणे होय.

## निवडलेलीं हस्तलिखितें

या काव्याच्या संपादनासाठीं मला पुष्कळ पोथ्या मिळाल्या. पण त्यांपैकीं फक्त चारच पोथ्यांचा मीं उपयोग केला. त्या पोथ्यांचा तपशील येणेप्रमाणें:—

### म प्रत

महानुभावांच्या साती ग्रंथांची ही संपूर्ण पोथी महंत श्री मुरलीधर शास्त्री महानुभाव, मुक्काम पंचाळेश्वर ( पो. कावी; जिल्हा अहमदनगर ) यांच्या जवळून मला मिळाली. संपादनासाठीं हातीं आलेल्या अनेक पोथ्यांपैकीं जिचा आरंभ व शेवट कायम आहे अशी एवढीच एक पोथी होती. म्हणून तिची मीं मुद्दाम निवड केली. या पोथीच्या शेवटीं पुढील समाप्तिलेख आढळतोः—

" एवं सप्तग्रंथ समाप्त ॥*॥ शाके भैरवइंदुशास्त्रक्षितिधाधाताभिधावत्सरीं मासेश्रावणमध्यदेशअचळेढोंकीप्रदेशांतरीं गौरग्रामअशूद्रपक्षगुणभूशनिवारदीनांतरीं तेथे ग्रंथनमाळिकालिहियली हरिनामहस्ताक्षरीं ॥ "

यावरून, शके १६१८ धाता संवत्सर, श्रावण वद्य द्वादशी, शनिवार या दिवशीं ढोंकी प्रदेशांतील गौरग्राम नांवाच्या गावीं या पोथीचें लेखन समाप्त झालें असें दिसून येतें. म्हणजे जवळजवळ अडीचशे वर्षांपूर्वी ही पोथी लिहिली गेली. पोथी सकळ लिपींत लिहिलेली असून अक्षर सुवाच्य आहे.

### द प्रत

रुक्मिणी—स्वयंवराची दुसरी पोथी माहूर येथील श्री दत्तलक्षराज महंतांच्या संग्रहांतून मिळालेली आहे. या पोथीचीं आरंभींचीं पानें सुरक्षित आहेत. पण शेवटचीं पानें कसरीच्या भक्षस्थानीं पडलीं असावींत. त्यामुळे अर्थातच पोथीचा लेखनशक कळयला कांहीच मार्ग नाही. केवळ कागदावरून व पोथीच्या जीर्णावस्थेवरून ही पोथी तीनशे साडेतीनशे वर्षांपूर्वींची

असावी असें वाटतें. म प्रतीपेक्षा ती बरीच जुनी आहे यांत शंका नाही. वच्छहरण, दायंबा–निर्वेद, रुक्मिणी–स्वयंवर, शिशुपालवध, ज्ञानमार्तंड, लक्ष्मीधरोक्त कविलक्षण, ज्ञानदर्पण, श्रीमूर्तिवर्णन इत्यादि काव्यें या पोथींत आहेत. पैकी शिशुपालवध काव्य सकळ लिपींत लिहिलेलें असून बाकीचीं सर्व बाळबोध लिपींत लिहिलेलीं आहेत. या पोथींतील शिशुपालवध काव्याच्या शेवटचें पान नाहींसें झालेलें आहे.

### क प्रत

रुक्मिणी–स्वयंवराची तिसरी पोथी रितपूर येथील महंत श्री गोपीराज महानुभव यांच्या संग्रहांतून मिळाली. या पोथीचा आरंभ आणि शेवट दोन्ही कायम आहेत; पण त्यावर लेखनशक माञ कोठेच लिहिलेला नाही. तथापि म प्रतीइतकीच ती जुनी असावी असें मला वाटतें या पोथींत ज्ञानप्रबोध, उद्धवगीता, वच्छहरण, रुक्मिणी–स्वयंवर व शिशुपाळवध हीं काव्यें आहेत. तीं सर्व सकळ लिपींत लिहिलेलीं आहेत. या पोथींतील शिशुपालवध संपूर्ण आहे. काव्याच्या समाप्तीला के. भावे यांनी छापलेली शकनिदर्शक ओवी नाही.

### ख प्रत

ही पोथीसुद्धा महंत श्री गोपीराज महानुभाव यांच्याच संग्रहांतून मिळालेली आहे. हिच्या आरंभींचीं व शेवटचीं बरींच पानें काळाच्या भक्ष्यस्थानीं पडलेलीं दिसतात. पानाचा आकार बराच मोठा व पृष्ठसंख्याहि पुष्कळ आहे. उद्धवगीता, ज्ञानप्रबोधादि एकूण सतरा काव्यें या पोथींत लिहिलेलीं आहेत. नाहींशा झालेल्या पानांबरोबर आणखी दोनतीन काव्यें तरी नष्ट झालीं असावींत. पोथीचा कागद अत्यंत जीर्ण झालेला आहे. इतका की तो फारच जपून चाळावा लागतो, नाहीतर पानाचा तुकडा पडतो. त्यावरून ही पोथी बाकीच्या सर्व पोथ्यांपेक्षा आणखी शंभर वर्षांनी तरी जुनी असावी असें वाटतें. पोथींतील अक्षर विशेष वळणदार नाही तथापि तें सुवाच्य आहे.

## संपादकीय दृष्टि

या चार निरनिराळ्या पोथ्यांवरून रुक्मिणी–स्वयंवराची ही आवृत्ति संपादन केलेली आहे. उद्धवगीतेचें संपादन करीत असतांना, एका पोथी-

तील पाठ मूळ म्हणून घेऊन इतर पोथ्यांतील पाठ तळ-टीपांमधून नमूद करण्याचें धोरण मीं आपल्या समोर ठेवलेलें होतें. पण यावेळीं मात्र तसें केलें नाही. संपादनासाठी घेतलेल्या चारहि पोथ्यांतील पाठ अगोदर पाहून त्यांतून भाषेच्या प्राचीनतेच्या दृष्टीने व अर्थाच्या दृष्टीने मला जो पाठ योग्य वाटला तोच मीं घेतलेला आहें. इतर पाठांतरें तळ–टीपांतून नमूद केलेलीं आहेत प्रत्येक पाठाच्या ग्राह्याग्राह्यतेचें विवेचन करणें अर्थातच शक्य नव्हतें. मूळ काव्य छापून झाल्यावर त्यांतील कित्येक पाठ मला बदलावेसे वाटले. त्या संबंधी अर्थनिर्णायक टीपांमधून मीं विवेचन केलें आहें. इतकेंहि करून मीं न निवडलेले काही पाठ अभ्यासकांना अधिक ग्राह्य वाटण्याचा संभव आहे, नाही असें नाही. आपल्याकडून शक्य तेवढा प्रयत्न मीं यथामति केलेला आहे एवढेंच. अधिक विचारांतीं इतर पाठ कोणाला ग्राह्य वाटले तर ते स्वीकारायला मी केव्हांहि तयार राहीन.

## मूळ पाठांत फेरफार

संपादन करीत असतांना पोथ्यांतील मूळ पाठांत मीं स्वतः कोणतेच फेरफार केले नाहींत. तथापि **स** आणि **श**, त्याचप्रमाणे **न** आणि **ण** यांचा पोथीलेखकांनी अनिर्बंध उपयोग केलेला असल्यामुळे काही ठिकाणीं त्या त्या शब्दाचें मूळ स्वरूप लक्षांत घेऊन, तर क्वचित यमकानुरोधाने आवश्यक व इष्ट तेच फरक केले. पण त्यामुळे त्या शब्दाच्या किंवा भाषेच्या मूळ स्वरूपाला यत्किंचितसुद्धा धक्का लागलेला नाही. लेखनाच्या दृष्टीनेहि काही ठिकाणीं थोडेफार फरक केलेले आहेत. उदाहरणार्थ, **द** प्रतींत ( आणि बहुशः **ख** प्रतींत सुद्धा ) **ख** साठी **ष**, व **स्थ** साठी **स्छ** लिहिलेला आढळतो. **क्ष** हें अक्षर देखील **ग्र** असें लिहिलेलें आहे. यांच्या ऐवजी अर्थातच, त्या त्या शब्दांतील त्या त्या विशिष्ट उच्चाराचाच वर्ण छापला आहें. क्वचित, **ओ** साठी ॐ आला आहे. तोहि **ओ** असाच छापला आहे. या खेरीज आणखी कोणतेच फेरफार केलेले नाहींत.

## प्रस्तुत संहितेची ओवी–संख्या

नरेंद्राच्या रुक्मिणी–स्वयंवराची संपूर्ण अशी एकच पोथी उपलब्ध

आहे. ती ईशान्वित श्रीकृष्णराजदादा पारिमांडल्य यांच्या संग्रहांत आहे. या पोथींत प्रस्तुत काव्याच्या एकूण २९३४ ओव्या आहेत. तथापि इतर सर्व महानुभावीय पोथ्यांत मात्र 'तें कटक वानिताये कवि नरेंद्र :. यादवरायाचें' या ओवीपर्यंतचा, म्हणजे सुमारें ८७९ ओव्यांचाच वृत्तांत आढळतो. (याचें कारण कविचरित्राच्या परिच्छेदांत पहावयास सापडेल.) त्यामुळे प्रस्तुत आवृत्तींतसुद्धा मीं तेवढाच भाग संपादनासाठी स्वीकारला. या ८७९ ओव्यांवरून नरेंद्राच्या भाषेची व काव्य-कर्तृत्वाची कोणालाहि सहज कल्पना येऊं शकेल. बाकीच्या सुमारें दोन हजार ओव्या छापण्याचें ठरवलें असतें तर त्या एकाच पोथीवरून छापाव्या लागल्या असत्या. शिवाय, तें काम अतिशय खर्चाचें झालें असतें. रुक्मिणी-स्वयंवराची कथा अतिशय जुनी असल्यामुळे केवळ कथेच्या दृष्टीने पुढील विभागाविषयी कोणालाहि विशेष औत्सुक्य असेल असें वाटत नाहीं. शिवाय, यापुढील काव्याचा बराचसा भाग प्रक्षिप्त असणें देखील संभवनीय आहे. याचेंहि विवेचन पुढे कविचरित्रांत केलेलें आहें तें पहावें. या दृष्टीनेसुद्धा ह्या राहिलेल्या दोन हजार ओव्या न छापतां सर्व महानुभावीय पोथ्यांत आढळणाऱ्या फक्त ८७९ ओव्याच या ठिकाणीं संपादन करून छापलेल्या आहेत. महानुभावीय काव्य-वाङ्मयाचें महत्त्व अभ्यासकांच्या दृष्टीने केवळ भाषेपुरतें असल्यामुळे श्रीकृष्णराज दादा पारिमांडल्य यांच्या जवळ असलेल्या एकुलत्या एका संपूर्ण पोथींतील इतर ओव्या छापण्याच्या खटाटोपांत मी पडलों नाहीं.

## हस्तलिखितांतील ओव्यांची संख्या

प्रस्तुत आवृत्तीसाठी उपयोगांत आणलेल्या हस्तलिखितांतील ओव्यांच्या संख्येविषयी येथे थोडा विचार करणें आवश्यक आहे. टीप-ग्रंथांतील आख्यायिकेवरून ९०० ओव्यांचें रुक्मिणी-स्वयंवर महानुभावीय पंथांत आलें असें कळतें. हा आकडा टीपकाराने स्थूल मानाने दिलेला असावा असें वाटतें. कारण साधारणपणें बहुतेक पोथ्यांत ही ओव्यांची संख्या ८७९ च आढळते. म प्रतींत ही संख्या बरोबर ८७९ आहे. पण कख प्रतींत ३३१ वी ओवी नसल्यामुळे ह्यांत ओवीसंख्या ८७८ आढळते. ही

३३१ वी ओवी **द** व **म** प्रतींत असल्यामुळे, शिवाय टीप-ग्रंथांत देखील तिच्यावर टीपा असल्यामुळे ती मूळांत असावी असें गृहीत धरून मीं ती या आवृत्तींत अंतर्भूत केलेली आहे. **द** प्रतींत मात्र ओव्यांची संख्या पुरेपुर ९०० आढळते. किन्नराने श्रीकृष्णाचें वर्णन करायला सुरवात केल्यावर 'भीमा परियेसी' हीं २९१ वी ओवी आणि 'तया वसुदेवाचे कुमर' हीं २९२ वी ओवी यांच्यामधे श्रीकृष्ण-सौंदर्य-वर्णनाच्या ६ ओव्या जास्त आहेत. पण त्या उघड उघड अस्थानीं आहेत. कारण २९२ व्या ओवीचा आरंभ '**तया वसुदेवाचे कुमर**' असा असल्यामुळे तत्पूर्वीच्या ओव्यांत वसुदेवाचेंच वर्णन असायला पाहिजे. तसें या ओव्यांत नाही. दुसरें असें की, या जास्तीच्या सहा ओव्यांत फक्त श्रीकृष्णाचेंच वर्णन आहे. पण पुढे २९२ व्या ओवींत 'रामकृष्ण' या दोघांचाहि उल्लेख व वर्णनविस्तार आलेला आहे. शिवाय, या अधिक ओव्यांत उगीचच पुनरुक्ति आढळते ही गोष्ट निराळीच. उदा :- 'जेणें पुतना बसविली वैकुंठीं : वैरपणें' : 'जेणें यमळार्जुनु उद्धरिले स्परिसें' हे उल्लेख आपल्या ३६० व्या ओवींत पुढे आलेलेच आहेत. सारांश, **द** प्रतींतील या जास्तीच्या ओव्या मूळांत नसाव्यात, अर्थात् त्या प्रक्षिप्त असल्या पाहिजेत, असें मला वाटतें तीच गोष्ट राहिलेल्या ओव्यांची. आपल्या ५८१ व ५८२ या ओव्यांच्या दरम्यान **द** प्रतींमध्ये विरहोपचाराच्या आणखी १४ ओव्या आहेत. त्यांत बराच पाल्हाळ असून शिशुपाल-वधांतील रुक्मिणीच्या विरहोपचाराचें उघडउघड अनुकरण आहे. इतरत्र कुठेहि या ओव्या आढळत नाहीत. त्यावरून त्याहुद्धा प्रक्षिप्त असल्या पाहिजेत. याशिवाय ४३८ व ४३९ ओव्यांच्या दरम्यान

> कीं चंद्रकांताची चौबारा विहिर : वरि खेडकुळिया साबर
> तेणें वाजे दांतौर : गर्जाचेनि मिसें

अशी ओवी **द** प्रतींत आहे. पण ही ओवी म्हणजे आपल्या ४१५ व्या ओवींतील 'तथ[2] चंद्रकांताचि चौरसे (**द** प्रतींतील याच ओवीचें पाठांतर तळटीपेंत पहा) विहिरीं : रत्नांचीं खेडकुळिया साबरीं' या चरणाचें व ४३८ व्या ओवींतील 'हो [2]काज विजूसी वाजतुसे दांतौर : मिसें

---

१. स्मृतिस्थळ. ११३ २. या ओळीसुद्धा **द** प्रतींत आहेतच !

गाजनेयाचेनि ' या चरणांचें पुनरुक्ति-परिपूर्ण असें मिश्रण आहे. अर्थात् द प्रतीतील ही ओवीसुद्धा प्रक्षिप्त आहे असें मानावें लागतें. सारांश, इतर प्रतींपेक्षा द प्रतींत ज्या २१ ओव्या जास्त आढळतात त्या प्रक्षिप्त असल्यामुळेच प्रस्तुत आवृत्तींत मीं त्या घेतल्या नाहीत. यावरून महानुभाव पंथांत आलेल्या रुक्मिणी-स्वयंवराची ओवी-संख्या साधारणपणें ८७८ किंवा ८७९ एवढीच असावी हें दिसून येईल टीप-ग्रंथांत व इतरत्र आलेल्या आख्यायिकेच्या अनुरोधानेच ही संख्या ९०० करण्यासाठीं द प्रतीच्या लेखकानें २१ ओव्या प्रक्षिप्त केल्या असाव्या.

## कवि-चरित्र

दुर्दैवानें नरेंद्राच्या चरित्राविषयीं पाहिजे तितकी सविस्तर माहिती उपलब्ध नाहीं नागदेवाला समकालीन असलेल्या अनेक महानुभाव पंडितांची हकीकत स्मृति-स्थळांत नमूद झालेली आढळते. किंबहुना. स्मृतिस्थळ म्हणजे सुप्रसिद्ध महानुभाव गद्यपद्य-लेखकांच्या चारित्राचा व चारित्र्याचा स्मृतिकोशच, असेंहि म्हणावयास हरकत नाही. पण या स्मृतिकोशांत सुद्धा नरेंद्राविषयीं विशेष माहिती साठवलेली दिसत नाहीं. स्मृतिस्थळाच्या ६४ व्या स्मृतींत नरेंद्राचा उल्लेख अगदी उडता आलेला आहे. पण त्यावरून नवीन अशी कोणतीच माहिती मिळत नाहीं. स्मृतिस्थळांतील ११३ व्या स्मृतींत मात्र नरेंद्रानें महानुभाव पंथाची प्रत्यक्ष दीक्षा कशी व कोणत्या निमित्तानें घेतली या वृत्तांताच्या अनुषंगानें नरेंद्राविषयीं व त्याच्या रुक्मिणी-स्वयंवर ग्रंथाविषयीं थोडी फार महत्त्वाची माहिती स्मृतींत आढळते. तिला टीपग्रंथांतील, आणि अन्वयस्थळांतील आणखी थोड्या माहितीची जोड दिली म्हणजे नरेंद्राच्या चरित्राविषयीं उपलब्ध माहिती संपली. ही माहिती प्रथम मूळ स्वरूपांत वाचकांच्या समोर ठेवतों.

**(१) नरींद्रबासां भेटि : अनुसरण :** ॥ नरेंद्र कवि : साल कवि : नृसिंह कविः हे तिघे भाऊ : नृसिंह कविन नलोपाख्यान केले : सालकविन रामायण केलें : तें आपुलालें रामदेवरायापुढां : म्हणितलें : तेथ नरेंद्र कवि बैसले होते : तयांसि भटोबासांपासौनि श्रवण होतें : अवघें आइकौनि म्हणितलें : यैसा द्वारकेचा रामहाटु वर्णितेति तरि तुमचेया पापा

पुरश्चरण होतें : येसें राया देखतां निमर्षिलें : तवं तेहीं म्हणितलें : तुम्ही एक कर्वीत्व करा : मी तुमचि युक्ति पाहों : मग नरेंद्रबासीं तेणें सळें अठरा सतें रुक्मिणासैंवर ग्रंथु केला : करूनि तयादेखतां रायापुढां म्हणितला : वाचितां ये वोवीपासि आले : ॥ देवाचेया दादुलेपनाचा उबारा : न साहावेचि सातांहीं सागरां : भेण वोसरोनि राजमरा : दीधली द्वारावती : ॥ १ ॥ यावरि रायें म्हणितलें : या ग्रंथाचा अभगु मज द्यावा : मी जेतुकीया वोवीया तेतुके सोनटके आणि चौथरीया आसु वोवाळणि घालीन :, नरेंद्रबासीं म्हणितलें : ना राजे हो आमचेया कवीकुळा बोलु लागेल : मग तयाचे गर्व हरले : रायासि थोर चमत्कारु जाला : मग तें रुक्मिणीसैंवर नरेंद्र कवि भटोबासां-पासि घेउनि आले : भटोबासांसि भेटि जाली : तैसीचि तेहीं भीक्षा केली : मग तेहूनि रुक्मिणीसैंवर ग्रंथ मार्गासि आला : भटोबासीं मागा केतुलेया एका काळा अनोबासांचीं हरगर्वी भिक्षा केलेयां हे अवघे आइकौनि म्हणितलें : सकळां कवीपरीस हा कवि चतुर : मग आपणही श्लोकबंध गद्य केलें : ॥ ११३ ॥

(२) साती ग्रंथाच्या टीपांत रुक्मिणी–स्वयंवराच्या आरंभीं पूर्वपीठिका सांगतांना " ॥ श्री ॥ **आतां नरींद्राची मुळ पीठीका ॥ नरींद्र-बास ग्रंथभेटी अनुसरण** ॥ असा आरंभ करून मग स्मृतिस्थळांतील उपरोक्त वृत्तांत जवळजवळ त्याच शब्दांत सांगितलेला आहे. परंतु त्यांतील " रायासि थोर चमत्कार जाला " या वाक्यापासून पुढे मात्र टीपग्रंथांत निराळाच वृत्तांत आढळतो. तो पुढीलप्रमाणेः—

रायासि थोर चमत्कार जाला : परि रायासि आभंग नेदीतीचिः म्हणौनि रायें म्हणितलें : हा ग्रथ आमच दसतरीं ठेवा : मग नरींद्रबासीं म्हणितलें : हा ग्रंथ आशोधी असे : तरि याचें शोधन करूं : मग आपुला दसरीं ठेवा : ऐसें म्हणौनि घरासि आले : मग एका रात्रिमाजी तीघा बंधुहीं तीन तीन शतें ग्रथ लीहीला : मग प्रातःसमइं राय आपुले भृत्य पाठउनि ग्रंथ नेला : मग ते नव शतें रुक्मिणीस्वयंवर नरींद्रकवी भटापासि घेउनि आले : भटोबासासि भेटि जाली : तैसीचि तेहीं भीक्षा केली : मग तेहुनि ते रुक्मिणीस्वयंवर ग्रंथ मार्गासि आला : नरींद्रबासीं केला म्हणौनि मागें नरींद्र ऐसे म्हणे : ॥

(३) " पूर्वी नरेंद्रबासीं रुक्मिणीस्वैंवर केलें : आन सातसे स्मृति जैसिया वर्तल्या तैस्याचि लिहिल्या " ( तळेगांवकरांचें अन्वयस्थळ )

## चरित्राची रूपरेषा

वरील तीन उताऱ्यांवरूनच नरेंद्राच्या चरित्राची रूपरेषा आज आखावी लागत आहे. त्यावरून नरेंद्र हा रामदेवराव जाधवाच्या दरबारांतील एक कवि असून त्याला साल आणि नृसिंह या नांवाचे दोन भाऊ होते असें दिसतें. नागदेवाचार्याकडून महानुभावांच्या तत्त्वज्ञानाचें याला 'श्रवण' झालें होतें आणि नंतर कांही दिवसांनी राजाश्रयावर लाथ मारून त्याने देवगिरी सोडली व महानुभावपंथांत प्रवेश केला. त्याने राजाश्रयावर पाणी सोडण्याचें कारणहि मोठें मजेदार आहे. त्याच्या बंधूंनी नलोपाख्यान व रामायणावर काव्यरचना केली होती. त्या काव्यांचें वाचन रामदेवापुढे झाल्यानंतर श्रीकृष्णभक्तीने वेधलेला नरेंद्र त्यांना स्पष्टपणें म्हणाला कीं 'यापेक्षा श्रीकृष्णवर्णनपर रचना तुम्हीं केली असती तर तुमचीं पापें तरी नाहींशीं झालीं असतीं !' त्यावर त्या बंधूंनी नरेंद्राला सांगितलें, 'तर मग तुम्हीच असें एखादें काव्य लिहा ना ! त्यावरून तुमच्या काव्यकर्तृत्वाचें कौशल्य तरी आम्हांला कळेल.' या सूचनेप्रमाणे नरेंद्राने खरोखरच श्रीकृष्ण-गुणवर्णनपर असें रुक्मिणी-स्वयंवर नांवाचें १८०० ओव्यांचें एक काव्य तयार केलें. तें राजाला वाचून दाखवीत असतां त्या काव्यावर रामदेवराव इतका बेहद्द खुष झाला की त्या काव्याचें कर्तृत्व आपल्याला मिळावें असें त्याला वाटलें. म्हणून त्याने नरेंद्राला अमूप द्रव्य देऊं केलें. पण अशा रीतीने आपल्या काव्याचा बाजार मांडण्याचें नरेंद्राने साफ नाकारलें. त्यामुळे रामदेवरावाला फार आश्चर्य वाटलें. निदान हें काव्य आपल्या संग्रहीं तरी असावें म्हणून त्याने नरेंद्राजवळ त्याची मागणी केली. पण नरेंद्र नुसताच कवि नव्हता. तो व्यवहारज्ञहि होता. त्याने राजाचा कावा ओळखला. त्याने राजाला सांगितलें की " हा ग्रंथ अजून अशुद्ध आहे. तो अगोदर मी शुद्ध करतों. नंतर आपण हा आपल्या संग्रहीं खुशाल ठेवा." असें म्हणून त्याने तो ग्रंथ घरीं नेला. एका रात्रींतून त्या तिन्ही भावांनी मिळून प्रत्येकीं तीनशे याप्रमाणे त्यांतील ९०० ओव्यांची नक्कल करून घेतली. पण

सकाळीं एकदम राजदूत आले आणि त्यांनी नरेंद्राजवळून तो ग्रंथ घेतला व राजाकडे नेला. बहुधा याच गोष्टीचा नरेंद्राला अत्यंत विषाद वाटला असावा. म्हणून ९०० ओव्यांचा तो ग्रंथ घेऊन नरेंद्र तेथून निघाला आणि तडक नागदेवाचार्यांकडे गेला. तेथे त्याने महानुभाव पंथाची दीक्षा घेतली. त्या दिवसापासून ९०० ओव्यांच्या रुक्मिणीस्वयंवराला महानुभाव-पंथीय वाङ्मयांत स्थान मिळालें. इतकेंच नव्हे तर तें महानुभावांच्या साती ग्रंथांत मोडूं लागलें. हा ग्रंथ नरेंद्राने लिहिला असल्यामुळे 'नरींद्र' या नावाने देखील तो महानुभावांत प्रसिद्ध आहे. याशिवाय ७०० आख्या-यिकांचा स्मृतिग्रंथ नरेंद्राने तयार केला होता.

## स्मृतिस्थळांतील वृत्तांत त्रोटक कां?

वर निर्दिष्ट केलेल्या आख्यायिका लक्षांत घेतल्या म्हणजे एकदोन प्रश्न तात्काल सुचतात. त्यांचा या ठिकाणीं विचार करणें आवश्यक आहे. पहिला प्रश्न असा की, केवळ स्मृतिस्थळांतील आख्यायिका लक्षांत घेतली तर त्यावरून नरेंद्राने संपूर्ण ग्रंथ नागदेवाचार्यांकडे आणला असावा असें वाटतें! कारण 'हा ग्रंथ आमच्या दप्तरीं ठेवा वगैरे वृत्तांत व त्यामुळे नरें-द्रादि तिन्ही भावांनी ९०० ओव्या नकलून ठेवल्याचा वृत्तांत' या आख्या-यिकेंत मुळींच नाही. इतकेंच नव्हे तर 'मग तें रुक्मिणी स्वेवर नरेंद्र कवि भटोबासांपासि घेउनि आले' असें त्यांत स्वच्छ म्हटलेलें आहे. यावरून नरेंद्राने हें संपूर्ण काव्य बरोबर आणलें असावें की काय अशी शंका येते. पण महानुभावांच्या पोथ्यांत तर या काव्याच्या ८७९ च ओव्या आढळतात, संपूर्ण काव्य आढळत नाही, ही वस्तुस्थिति आहे! श्री कृष्णराजाजवळील एकाच पोथींत हें काव्य संपूर्ण आढळतें. पण त्या पोथीच्या समाप्तिलेखांतील 'विद्यानगरीहुनि ग्रंथु आणिला : तळेग्रामकर केशवदायें प्रगट केला : **म्हणौनि : या देशासि आला**' या उल्लेखावरूनहि त्यापूर्वी हा ग्रंथ 'या देशासि' नव्हता असें दिसतें. पोथीचा शक १६७७ आहे. अर्थात् या संपूर्ण पोथीं-तील उल्लेखावरूनसुद्धा शके १६७७ पूर्वी हें काव्य संपूर्ण उपलब्ध नव्हतें असें दिसतें. या वस्तुस्थितीचा उल्लेख स्मृतिस्थळांतील आख्यायिकेंत असाव-याला पाहिजे होता. तसा तो त्यांत नाही. श्री. वा. ना. देशपांडे यांनी

पाहिलेला ' स्मृतिसमुच्चय, ' ' अज्ञात–स्मृति ' वगैरेंतहि तो आढळत नाही. असें का ? बरें आरंभींच संपूर्ण ग्रंथ आला असावा असें या आख्यायिकेवरून अनुमान केलें तर पंथीय पोथ्यांत ८७९ च ओव्या कां आढळाव्या ?

टीपग्रंथांतील नरेंद्राच्या मूळ–पीठिकेवरून मात्र नरेंद्राने हा ग्रंथ अपूर्ण स्थितींतच आणल्याचें स्पष्ट होतें. टीपकाराने त्याचें कारणहि दिलें आहे. त्याने उद्धृत केलेल्या आरंभीच्या ' आर्दा ' वरून व पूर्वपीठिकेवरून फार झालें तर असें म्हणतां येईल की कोणत्या तरी स्मृतिस्थळांत हा वृत्तांत असावा. पण तेवढ्याने मनाचें पूर्ण समाधान होत नाही हें मात्र खरें. कांहींहि असलें तरी पंथीय पोथ्यांत ज्याअर्थी सर्वत्र ८७९ च ओव्या आढळतात त्याअर्थी टीपकाराने दिलेला एकंदर वृत्तांत खरा असावा असें वाटतें.

## १८०० ओव्यांच्या २९३४ ओव्या कशा झाल्या ?

महत्त्वाची गोष्ट अशी की, वरील आख्यायिकेवरून नरेंद्राने मूळ ग्रंथ फक्त १८०० ओव्यांचाच लिहिलेला होता हें स्पष्ट दिसतें. स्मृतिस्थळाची आणि टीपग्रंथाची या बाबतींत पूर्णपणें एकवाक्यता आहे. म्हणून त्याविषयीं शंका घेण्याचें कांही कारण नाही. पण त्यामुळे असा प्रश्न उद्भवतो की, नरेंद्राने जर १८०० ओव्यांचाच ग्रंथ लिहिला तर मग या रुक्मिणी–स्वयंवराच्या एकुलत्या एका संपूर्ण पोथींत २९३४ ओव्या आढळतात याचा अर्थ काय ? मूळापेक्षा ११३४ ओव्या त्या पोथींत जास्त कुठून आल्या ? त्या जास्तीच्या ओव्या प्रक्षिप्त समजायच्या की तें नरेंद्राचेंच सुधारून वाढवलेलें कर्तृत्व समजावयाचें ?

वस्तुतः पाहतां या प्रश्नाचें सविस्तर विवेचन या ठिकाणीं करण्याची विशेष आवश्यकता नाही. कारण आज प्रसिद्ध होत असलेली आवृत्ति ही फक्त ८७९ ओव्यांचीच आहे. तथापि नरेंद्राच्या मूळ ग्रंथाची संख्या ठरविण्याच्या दृष्टीनें हा प्रश्न विचार करण्यासारखा आहे यांत शंका नाही. या प्रश्नाचीं दोन रीतींनी उत्तरें देतां येतील. एकतर असें म्हणतां येईल की, खुद्द नरेंद्रानेच महानुभावपंथांत आल्यानंतर पूर्वीच्या ९०० ( म्हणजे खरोखर ८७९ ) ओव्यांत भर घालून राहिलेला ग्रंथ पूर्ण केला असावा. याचा

अर्थ असा की, देवगिरीहून आपल्याबरोबर आणलेल्या ८७९ ओव्यांत सुमारें २०५५ ओव्यांची भर घालून त्याने तो ग्रंथ तयार केला असावा. किंवा, या जास्तीच्या ओव्या इतर कोणीतरी प्रक्षिप्त केल्या असाव्या, असेंहि म्हणता येईल. यांपैकी पहिली गोष्ट असणें शक्य वाटत नाही. महानुभावपंथांत आल्यानंतर खुद्द कवीनेच ग्रंथ वाढवला असता तर त्या गोष्टीचा उल्लेख स्मृति-स्थळांत, वृद्धाचारांत, किंवा एखाद्या अन्वयस्थळांत आला असता. निदान टीपकाराने तरी याचा उल्लेख खात्रीने केला असता. पण ज्याअर्थी असा उल्लेख या चारी ग्रंथांपैकी एकाहि ग्रंथांत आढळत नाही त्याअर्थी निदान आजतरी, हा ग्रंथविस्तार खुद्द कवीनेच केला असावा असें मानता येत नाही. दुसरें असें की तृतीय शोधनीचा टीप लिहिणाऱ्याला—ज्याने ९०० ओव्याच नरेंद्राने बरोबर आणल्याचा उल्लेख केला आहे त्याला—या गोष्टीचें—ज्ञान असणें शक्य दिसतें. पण ज्याअर्थी त्यानेहि याविषयी कांहीच उल्लेख केलेला नाही त्याअर्थी नरेंद्राने हा ग्रंथ स्वतः वाढवला असावा असें मानायला जागा नाही. शिवाय, तसें खरोखरच असतें तर महानुभावीय पोथ्यांत ८७९ च ओव्या आढळतात त्या कां ! किंबहुना या पंथांत प्रविष्ट झाल्यानंतर नरेंद्राने तो ग्रंथ वाढवलेला असल्यामुळे आणि विशेषतः या वाढवलेल्या भागांतच पंथीय तत्त्वज्ञानाची थोडी फार छाया पडलेली असल्यामुळे महानुभावांनी तो विशेष जपून ठेवला असता. पण तसें झालेलें आढळत नाही. त्यावरून सुद्धा ही वाढ नरेंद्रकृत नव्हे असेंच दिसतें. आणि अर्थात् जर ती नरेंद्राची नाही तर मग ती इतर कुणाची तरी म्हणजे प्रक्षिप्त असली पाहिजे.

## तळेग्रामकराचें कर्तृत्व ?

कदाचित या संपूर्ण पोथीच्या[१] शेवटीं उल्लेखिल्याप्रमाणे विद्यानगरीहून ग्रंथ आणून ज्या 'तळेग्रामकर केशवदाये' तो प्रकट केला त्याचेंच हें कर्तृत्व

---

१. हा समाप्तिलेख असा : "विद्यानगरीहुनि ग्रंथु आणिला : तळे-ग्रामकर केशवदाये प्रगट केला : म्हणौनि या देशासि आला : हा नरींद्र शके १६७७ युवानाम संवत्सरें : पुस मासे : कृष्णपक्षे : वद्य तृतीया : सोमदने : प्रथम प्रहरे : श्रीरुक्मिणी स्वयेंवर नरींद्र : संपूर्ण समाप्ती : "

असणें संभवनीय आहे. याच गृहस्थाला हा ग्रंथ प्रथम उपलब्ध झाला असें या समाप्तिलेखावरून दिसतें. तेव्हां त्याच्या आधारें असें म्हणतां येईल कीं शके १६७७ च्या सुमारास या केशवदास तळेग्रामकराला नरेंद्राच्या संपूर्ण ग्रंथाची म्हणजे १८०० ओव्यांची पोथी मिळालेली असावी. त्यावर स्वतःच्या प्रक्षिप्तांचा प्रयोग करून त्यानें प्रस्तुतचा ग्रंथ तयार केला असावा. अर्थात् हें नुसतें संभवनीयतेचें अनुमान आहे. आणि नुसतें अनुमानच करायचें म्हटलें तर असेंहि म्हणतां येईल की, ८७९ खेरीज बाकीच्या सर्वच ओव्या प्रक्षिप्त असून त्या याच तळेग्रामकराने रचलेल्या असाव्यात. पण तसें अनुमान कदाचित चुकीचें होईल. कारण ८७९ नंतरचा सर्वच भाग एकाच कर्त्याच्या प्रतिभेचा विलास असता तर त्यांत त्याच त्याच कल्पनांची अनेक ठिकाणीं जी पुनरुक्ति झालेली आढळते तशी आढळली नसती. ही पुनरुक्ति कां व कशी झाली असावी याचें विवेचन श्री. [1]ह. ना. नेने यांनी विस्तरशः केलेलें असल्यामुळे तें या ठिकाणीं पुन्हा करण्याचें प्रयोजन नाही. जिज्ञासूंनी त्याचें विवेचन पाहावें. सारांश, ८७९ नंतरच्या मूळ ओव्यांत आणखी कोणीतरी ( बहुधा केशवदास तळेग्रामकराने ) प्रक्षिप्त ओव्यांची भर घालून प्रस्तुत २९३४ ओव्यांची पोथी तयार केली असावी असें वाटते. तळेग्रामकर हे पारमांडल्य आम्नायाचे आहेत ही गोष्ट व प्रस्तुत एकुलती एक पोथी श्री. कृष्णराजदादा पारिमांडल्य यांच्याच जवळ आढळते ही गोष्ट लक्षांत घेतली म्हणजे माझ्या म्हणण्यावर अधिक प्रकाश पडेल. अर्थात् ही गोष्ट पूर्णपणें योगायोगाची नसेलच असें नाही !

## प्रस्तुत काव्याचा लेखनकाल

श्री. य. खु. देशपांडे यांनी ज्ञानकोशांतील[2] आपल्या लेखांत रुक्मिणी–स्वयंवराचा लेखनकाल शके १२०० दिला आहे; तदनंतर प्रसिद्ध केलेल्या ' महानुभावीय–मराठी–वाङ्मय[3] ' या ग्रंथांत त्यांनी तो काल शके १२१० असा दिला आहे; आणि त्याच्याहि नंतर प्रसिद्ध झालेल्या ' ऋद्धि-पुर–वर्णनाच्या ' प्रस्तावनेंत[4] हा काळ शके १२१३ नमूद केलेला आहे.

---

१. भा. इ. सं. मं त्रैमासिक. सप्टेंबर. १९३४

२. ज्ञानकोश. म. ७७. ३. पान ३०. ४. प्रस्ता. पा. १.

अर्थात्, हा शेवटचाच शक त्यांना मान्य असावा. के. भावे यांनीहि महाराष्ट्र-सारस्वतांत[1] शके १२१३ हाच रुक्मिणी-स्वयंवराचा काल दिलेला आहे. श्री. वामनराव[2] देशपांडे व श्री. नेने[3] यांना देखील हाच शक मान्य दिसतो. या विद्वानांच्या मतापेक्षा माझें मत फारसें भिन्न नाही. तथापि या लेखनकाळाविषयी स्वतंत्र अशी चर्चा अजून झालेली नसल्यामुळे ती येथे करण्याचा विचार आहे.

## संपूर्ण पोथींतिल ओवी

वरील तिन्ही विद्वानांनी आपला लेखनकाल, श्रीकृष्णराजदादांच्या जवळ असलेल्या रुक्मिणी-स्वयंवराच्या संपूर्ण पोथींतील शकदिग्दर्शक ओवीवरून ठरविलेला असावा, असें वाटतें. के. भावे यांनी तर आपल्या ग्रंथांत ती ओवीच ( थोडी चुकीची ) उद्धृत केलेली आहे.

ही ओवी मूळ पोथींत पुढीलप्रमाणे लिहिलेली आढळते :—

शकें द्वादशोत्तरशतें तेरोत्तरें
नंदन नामं संवत्सरें
ग्रंथ केला एकसरें
माघ वदी चौथी ॥ २९३३ ॥

या ओवीच्या विश्वसनीयतेविषयी थोडी शंका उद्भवणें शक्य आहे. विशेषतः ८७९ नंतरच्या ओव्या नरेंद्राच्या की आणखी कोणाच्या, या विषयीं वर जें विवेचन आलें आहे त्यावरून या शकाच्या ओवीविषयी शंका येणें साहजिक होय. त्यांतील ८७९ नंतरच्या ओव्यांचें कर्तृत्व खुद्द नरेंद्राकडे नसून इतर कोणाकडे तरी ( बहुधा केशवदाय तळेग्रामकराकडे ) असावें असें मत वर निर्दिष्ट केलेंच आहे. या तळेग्रामकराला (१) एकतर नरेंद्राचा मूळ ग्रंथ मिळाला असेल व त्यांत त्याने इतर ओव्यांची भर घालून तो वाढवला असेल; किंवा (२) पुढील सर्व ओव्या त्याने तयार केलेल्या असतील. खुद्द नरेंद्राचा ग्रंथ जर त्याला मिळाला असेल तर कदाचित ही शकनिदर्शक ओवी त्यांत असेलहि; किंवा खुद्द तळेग्रामकराने तयार केलेल्या

---

१. भाग १ पृ. १०९. २. स्मृ.स्थ.प्रस्ता. ५. ३. भा. इ. सं. मं. त्रैमा. सप्टें. १९३४

ओव्यांपैकीहि ती असूं शकेल. या दोहोंपैकी दुसराच पक्ष अधिक संभवनीय वाटतो. कारण ८७९ नंतरच्या इतर अनेक ओव्या-प्रमाणे या ओवीचीहि रचना अत्यंत शिथिल आहे. तिच्या पहिल्याच ओळींत ' उत्तर ' शब्दाची झालेली निरर्थक पुनरुक्ति पाहिली म्हणजे ही शिथिलता लागलीच जाणवते. वस्तुतः तेथे केवळ ' द्वादश शतें ' इतकेंच लिहून भागलें असतें ! पण त्याऐवजी ' द्वादशोत्तर शतें ' असें लिहिलेलें आहे. या मधल्या ' उत्तरा ' चें येथे प्रयोजन काय ? त्याने कांही विशेष अर्थ व्यक्त होतो काय ? कांहीच नाही. तेव्हां अर्थात्, या रचनेंत ढिलाई दिसते असेंच मानावें लागतें. अशी ढिलाइची ओवी नरेंद्रकृत असेल असें मानणें म्हणजे नरेंद्राला अन्याय करणें होय. याचमुळे ही ओवी नरेंद्रकृत नसून केशवदाय तळेग्रामकराची ( किंवा प्रक्षिप्तकाराची ) असावी असें वाटतें.

पण तसें जरी असलें तरीहि रुक्मिणी–स्वयंवराचा काळ ठरविण्यासाठी या ओवीचा आपणांला उपयोग होऊं शकतो. कारण, तळेग्रामकराने का होईना, पण ही ओवी आजपासून जवळजवळ दोनशे वर्षांपूर्वी लिहून ठेवलेली आहे यांत शंका नाही. या केशवदायाने आपल्या किंवा तत्कालीन पंथा-यांच्या माहितीप्रमाणे प्रस्तुत रुक्मिणी-स्वयंवराचा काळ या ओवींत नमूद केलेला दिसतो. या बाबतीत एक गोष्ट आपण लक्षांत घ्यावयास पाहिजे. ती अशी की, महानुभावीय ग्रंथांचा जुनपणा भासविण्यासाठी खोटाच काळ दडपून देण्याचा प्रश्न दोनशेवर्षांपूर्वी मुळीच उपस्थित झालेला नव्हता. आणि म्हणूनच दोनशेवर्षांपूर्वीच्या माहितीप्रमाणे केशवदाय तळेग्रामकराने निर्दिष्ट करून ठेवलेला हा शक, विरुद्ध पुराव्याच्या अभावीं अविश्वसनीय मानण्याचें कारण नाही.

## ओवींत झालेली ' घडामोड '

या शकनिदर्शक ओवीचें शुद्ध स्वरूप वर उद्धृत केलेंच आहे. पण दुसरी एक गोष्ट अभ्यासकांच्या निदर्शनाला आणणें अवश्य वाटतें. या ओवीच्या मूळ स्वरूपांत बदल करण्याचा प्रयत्न केव्हांतरी झालेला दिसतो. कै. भावे यांच्या महाराष्ट्र–सारस्वतांत ( भाग १–१०९ ) हीच ओवी

शके द्वादशशतें त्रयोदशोत्तरें
वृषभनाम संवछरे
ग्रंथ कला एकसरें
माघ वद्य चौथीशी

अशी दिलेली आहे. यांत ‘ द्वादश-शतें ’ मधील ‘ उत्तर ’ नाहींसें झालें असून ‘ तेरोत्तरें ’ चें ‘ त्रयोदशोत्तरें ’ बनलें आहे. ‘ नंदन ’ संवत्सराने ‘ वृषभाचें ’ रूप घेतलें असून खुद्द ‘ संवत्सरे ’ तील ‘ सरे ’ ची जागा ‘ छरे ’ नी पटकावली आहे. तिसऱ्या चरणांत मात्र कोणताच फरक नाहीं; पण पुढे शेवटल्या चरणांत पुन्हा ‘ वदी ’ चें ‘ वद्य ’ बनलें असून शेवटीं ‘ चौथी ’च्या पुढे येऊन बसलेलें अक्षर त्या ठिकाणच्या जाड ठशावरून दिसून येईलच ! कै भाग्यांना मिळालेली ही ओवी त्यांनी स्वतः मूळाशीं ताडून पाहिली नसावी असें दिसतें ! याशिवाय खुद्द पोथींमधेहि थोडीशी आणखी ‘ घडामोड ’ झालेली आहे. मूळ ओवींतील ‘ द्वा ’ खोडून त्या-पुढील ‘द’ चा ‘दा’ केलेला व त्यासमोर ‘ शो ’ खोडून ‘ हो ’ जोडलेला आढळतो. हेतु हा की वाचणाराने ‘ द्वादशोत्तर ’ ऐवजी ‘ दाहो-त्तर ’ असें वाचावें. तसेंच ‘ तेरो ’ खोडून ‘त्रयो’ केलेलें आहे; आणि ‘ नंदन ’ चें डोकें उडवून तेथे ‘ वृषभ ’ आणला आहे. ही ‘ खोडी ’ करणाऱ्याच्या इच्छेनुसार ओवी वाचली तर ती

शकें दाहोत्तरशतें त्रयोत्तरें
वृषभनाम संवत्सरें
ग्रंथ केला एकसरें
माघ वदी चौथी ॥

अशी वाचावी लागेल. अर्थात्, नरेंद्राचें हें रुक्मिणी-स्वयंवर शके १००३ मधे लिहिलें गेलें असें भासवण्याचा हा प्रयत्न आहे. पण, यादवांचा व मराठी भाषेचा इतिहास लक्षांत घेतला तर हा प्रयत्न किती हास्यास्पद आहे हें कोणालाहि सांगावला नको ! या ओवीच्या दुसऱ्या चरणांतील ‘ वृषभ ’ संवत्सराकडे लक्ष दिलें म्हणजे १००३ च्या जागीं १२०३ घालावें असा लेखकाचा उद्देश असावासें वाटतें. कारण १२०३ मधे वृष संवत्सर येतो. पण त्याला असें जर करायचें होतें तर मग ‘ दाहो ’ शब्द घालण्याचें

# कांही व्याकरण-विशेष

अभ्यासकांच्या सोयीसाठी कांही व्याकरण-विशेष पुढे नमूद करीत आहे. स्थलाभावीं त्यावर विस्तृत चर्चा करणें शक्य नाही. तथापि जिज्ञासूंनी वर उल्लेखिलेला श्री. नेने यांचा लेख, त्याचप्रमाणे त्यांनी 'श्रीचक्रधर सिद्धान्तसूत्रांत' दिलेल्या भाषाशास्त्रविषयक टीपा (पृ. ९५-१०८) आणि 'दृष्टांत-पाठा'च्या शेवटीं जोडलेलें 'दृष्टांतपाठ व व्याकरण' हें ५ वें परिशिष्ट अवश्य अभ्यासावें ही सूचना करणें अवश्य वाटतें.

## विभक्तिप्रत्यय

**प्रथमा**—कुमरू १; रावो ५४; सौंदर्ये ७६; दळवै ६१८; लक्ष्मीं ६७.

**द्वितीया**—कवीसि. ८; प्रधानेंसीं १२७; देवा २८; देवातें ७५; ब्रह्मेयां. ३०९; कुमरीयेसी. ९४; लते २२; इयें १४४; वैदर्भिये ३९८; आपणपें. ६०६.

**तृतीया**—सेंदुरें १; शब्दीं ९; हांसिनि ८२; चांदिणेनि ५१३; वारेनें ५२९; दांताचेनि तेजें ३; तेहीं १२८; कवणां ८; बाइला ११; लाजा ९१; दृष्टी ५२५; अवस्था ३४४; कातरी ११४; कालिंदिया ११३; मंदाकिनीएचेनि वोलें ३; मियां १४२; तुवां १५१; तिया ४४९.

**चतुर्थी**—महाकवीं ९; कवीसि ४; बाळे १११.

**पंचमी**—चंद्रमंडळपाहुनि ३३; सागरापासौनि ५९; रती पासौनियां १९३; देवांपासि १६२; हे पाहुनि १४४; चद्रबिंबौनि ६६; रातोत्पळौनियां १६४.

**षष्ठी**—गणांचा १; गुणांची ३२; विद्यांचें ३; तयाचां ठाइं २; कामिनी-येचा २६; वाटोगरियाची ७; मुक्ताफळांचिया २२; प्रबंधिचा २३; लोकिंचिया ८०.

**सप्तमी**—ठाइं २; गळां ९५; कांडिये ८३; खणोखणीं ४१९; आफाविलेयां ६१ (सती सप्तमी); आम्हा असतां ३४०

**संबोधन**-जी! १२३; भीमा १५३; वो! ५७७; परिक्षिता ६८; आहो १२१.

## क्रियापदांचीं रूपें

**वर्तमान काळाचीं रूपें**–आति १३०; निफजे २५; ये ६१; करी ५९; प्रकासे ८३; मलपतु २६; बिहे २५४; आइकों १५१; बोलती १८; बोलेती २१; येसि १५०; लोटीसि ६२६; कोमाइलीनसि ४४१; जाणतासि ६३५; म्हणतु आहे १२९; येताये १२९; पाताये ६७०.

**भूतकाळाचीं रूपें**–दुहिलें २०; महुरेली १३९; ठेला १६९; जिंतिला २५३; जिंत्रिनला ३५; केलीस ३५९; आइकिलें आहे १२९; धाडिली होती २१९; आला होता २७९; येती जाली १०७; करिता जाला १७५.

**भविष्यकाळाचीं रूपें**–करीन १५; म्हणैन ४७; मांडु ११६; होउनि ११६; जोडे ४४; होइल ७३; घडैल ७३.

**आज्ञार्थ**–परियसा १४; परियसें १५४; आइकें ६८; अवधारीं २०८; उठिं ४४३; नेथा १३०; राहा ५७७.

**विध्यर्थ**–बोलें २८; देनु ४३; अवधारितु ३८; सांघों ५७; दिजे १९४; जीजे ६३४.

**संकेतार्थ**–धरितिये ६४१.

**कर्मणी प्रयोग**–आनिका वरिलियें ६४०; करणां वाखाणे ८; दीजैन २३६; दीजैल १४; कीजति ४६; किजत ५३७; म्हणिपति १२१; बोलिजताए १२८; बोलिजति ५३८.

**ल्यबन्त**–देउनि ९; जोडुनि १२७; करूनि २०; जाणौनि २८; धूनि ४४०; आलिंगोनियां ११०.

**तुमन्त**–मागों ९६; पाहों १२३; बोलौं ६५३; नाचौं ३४०; विचारूं क्षेत्रियातें १२४; करूं आला ४७०; जीवउं ९७; भोगावया ७१; आणावेया १३०; भोगुं नेणती ११९.

**अकरणरूप**–नांतुडे १४१; नुमाने १६०; नोळखवे २०१; नेणों ५०५; नाथिलें ४०५; नुपचारोति ६८०; नुपेक्षी ६४०.

**प्रयोजक रूपें**-बैसवीली ११०; भेटविला १३७; करविली १४८, जाणविसि ३५१; देवविलीं ३९३.

**नामधातु**-मोलावली १९४; हिणांवे ६८५; आर्घिला ४६९; ढिलौनि ३९४; दुणावत ५४०; गारैला ८६२.

**तरतमभाव**-हे पाहुनि राय हीन वर १४४; गरुडा पासौनी १६१; देवांपसि १६२; रती पासौनियां १९३; पांचां धाकुली ६६.

**कांहीं वाक्प्रचार**-वास पाहणें ११५; पाटा फुटणें २९; पाठीं लागणें ११८; रूप करणें २९०; तेला उतरणें ४००; चुडे राखणें ६१८; ठकला ठकणें १४५; दिवाळी असणें १४९; सासुर सांघणें २०३; म्हणों आदरणें ६२४; ब्रीद बोलणें २६०; कास घालणें ४९८.

## कवीची भूमिका

इतक्या अनेक दृष्टींनी रुक्मिणी-स्वयंवराचें बहिरंग-परीक्षण केल्यावर आता अंतरंगाकडे वळायला हरकत नाही. प्रस्तुत काव्य लिहीत असतांना कवीने केवळ कथा-कथन-काराची भूमिका घेतली नसून महाकवीची भूमिका घेतली आहे, हें आपण पूर्वीच पाहिलें. आपल्या या भूमिकेची नरेंद्राला पूर्ण-पणें जाणीव होती. संस्कृतमधील स्मृति-पुराणादिकासारख्या धार्मिक ग्रंथा-बरोबरच 'काव्यें, नाटकें, कथा' (१७) त्यानें अभ्यासलेल्या होत्या. 'महा-कवीं' (१२; २८) च्या काव्यांची देखील त्याला ओळख असावी असें दिसतें. या काव्य-निरीक्षणामुळे खऱ्या 'कवित्वा' ची नरेंद्राला यथार्थ कल्पना आलेली होती. 'साहित्याच्या कुंजांत रसांचे पाट वाहत असतात आणि तेथे कविता-कामिनीबरोबर 'भाव' डुलत डुलत विहार करीत असतो' (२६) असें त्यानेच म्हटलें आहे. शिवाय 'कथा-कापुर-केळीच्या उदरांत स्फूर्ति-चंद्राच्या तुषारांनी प्रमेयांच्या कापूर' (२५) भरायचा असतो' असेंहि त्याचें मत स्पष्ट दिसतें. सारांश, **कविता** ही कामिनीच्या कमनीय देहाप्रमाणे असली पाहिजे, तिच्या बरोबर '**भाव**' विहार करीत असला पाहिजे, त्याचा हा विहार-**रस** निर्झराच्या काठावरील साहित्य-सारऱ्यांत व्हायला पाहिजे, **स्फूर्ति**-चंद्राचे तेथे तुषार उडायला पाहिजेत आणि त्यांत प्रमेयांचा म्हणजे सुंदर **तत्त्वांचा** सुगंध निर्माण झाला पाहिजे. हें सर्व करण्यासाठी जे **शब्द**

वापरायचे ते तरी कसे ? तर ' विणेया पासौनि ' (२४) अधिक गोड आणि ' अमृता पासौनि ' (२७) अधिक रसाळ ! या काव्य-कल्पनेनुसारच नरेंद्राने रुक्मिणीस्वयंवराची रसिकतेने रचना केलेली आहे. उत्कृष्ट काव्य हें उचंबळलेल्या अंतःकरणांतून निर्माण होतें. याची जाणीव या काव्यावरून देखील होते. नरेंद्राने आपला जीवभाव सर्वस्वीं श्रीकृष्णार्पण केला होता. त्यामुळे त्याचें अंतःकरण आनंदाने उचंबळून आलें होतें. या उचंबळलेल्या अंतःकरणांतून जो आनंद ओसंडून बाहेर वाहूं लागला तो या रुक्मिणी-स्वयंवराच्या स्वरूपांत प्रगट झाला. ' श्रीकृष्णाचां गुणीं जीत्रिनलाः माझा जिउ श्रीचक्रधरा विनटला : तो अतुल आनंद वोसंडला : कवितेचेनि मिसें ' ( ३५ ) असें नरेंद्र स्वतःच सांगतो ! अशा प्रसंगीं शब्दांच्या साह्याने आपलें अंतःकरण पूर्णपणें उकलून दाखवणें कुणालाहि शक्य नसतें. नरेंद्राचीहि अशीच स्थिति झालेली आहे. तो म्हणतो,

जें विरहिणींचां मनीं वसे : तें बोलतां होए आनारिसें
जें वाचितां ये रस-डोळसें : भाव लिखित (३६)

या आनंदाच्या भरात ' मि बियाळ बोलें उसणतां ' अशी कदाचित माझी स्थिती झाली तर

भावो ओळखावा श्रोतां : प्रेमगर्भ (३७)

अशी त्याने काव्य-रसिकांना नम्रपणाने विनंती केलेली आहे.आधीच रुक्मिणी-स्वयंवराची कथा म्हणजे ' साहित्याचा क्षीरसागर आहे; नउरसांची तीं पाणपोई आहे; तें अनेक भावांचें भांडार आहे; सकलकलांचा तो निधी आहे; इतकेंच नव्हे तर स्वर्गसुख प्राप्त करून देणारा तो सुप्रसिद्ध सोपान आहे. ' अशी ही सदा-सुरस कथा वर्णन करण्यास नरेंद्रासारखा प्रतिभासंपन्न कवि लाभल्यामुळे उडालेली बहार कांही और आहे ! साहित्याच्या नर्तनाने मीं ' जग भोजें नाचवीन : आनंदाचां ' असें नरेंद्राने आत्मविश्वासाने म्हटलें आहे. प्रस्तुत काव्य वाचल्यानंतर त्याचा हा आत्मविश्वास अगदी खरा असल्याचें आपल्या प्रत्ययास आल्यावांचून राहत नाही. या कथा वर्णनप्रसंगीं

जिये भाषेचिये रसवृत्ती : सा भाषांचे कुपे कीजेति निगुती
ते मऱ्हाटी कवण जाणे निरूती : जे रसांचें जीवनि ( ४६ )

असा मराठी भाषेचा यथार्थ गौरव नरेंद्राने केलेला आढळतो.

## वर्णन-चातुर्य

रुक्मिणी-स्वयंवर हें अर्थात् कथात्मक काव्य आहे. अशा काव्यांत 'वृत्तांत' बराच येत असल्यामुळे तें रूक्ष उतरण्याचा संभव फार असतो. आणि म्हणूनच कथानकपर काव्यरचना करणाऱ्या कवीवरील जबाबदारी फार मोठी असते. वृत्तांत-निवेदनांत देखील रूक्षपणा येऊ न देतां उत्कट भावनांच्या साह्याने रसांचीं कारंजीं उडवणें हें सोपें काम नाहीं. एखादीदुसरी भावना दहाबारा ओळींत उत्कटपणाने वर्णन करणें निराळें आणि कथात्मक काव्याचा देह सांभाळून भावनांचा उत्कटपणा कायम राखणें, नव्हे...शेवटपर्यंत टिकवणें निराळें. आपल्या काव्यदेहाची हानी होऊ नये म्हणून कथानकी काव्य रचणाऱ्या कवीला ओळीओळींतून रसाळपणा निर्माण करावा लागतो. यासाठीच 'रसिक अक्षरांची' गुंफण साधणें अवश्य असते. विशेष हें की, आपल्या आख्यानांतील प्रत्येक प्रसंग श्रोत्यासमोर हुबेहूब कसा उभा राहील याची त्याला निरंतर काळजी वहावी लागते. अर्थात्, कोणत्याहि सामान्य प्रसंगाचें असामान्य रसिकतेने वर्णन करण्याचें चातुर्य कवीच्या अंगीं असल्याशिवाय त्याला हें साधणें शक्य नाहीं. हें वर्णनचातुर्य नरेंद्राच्या ठिकाणीं पूर्णपणें होतें. रुक्मिणी, किन्नर, श्रीकृष्ण यांच्या शरीरसौंदर्याचीं, त्याचप्रमाणे रुक्मिणीची विरहावस्था व त्यावरील उपचार यांचीं नरेंद्राने केलेलीं वर्णनें याची साक्ष देतील. वानगीसाठी एकच उदाहरण या ठिकाणीं देतों. आपला विवाह श्रीकृष्णाशीं न करतां शिशुपालाशीं करण्याचें वडिलांनी ठरवलेलें ऐकतांच हिंपुटी झालेली आणि म्हणून प्रियकर श्रीकृष्णाच्या विरहव्यथेने विशेष विकल झालेली रुक्मिणी जेव्हां 'बनियेच्या राउळांतून' 'धारा-दामोधरा'कडे जायला निघाली तेव्हांची तिची

पाय न धरती बेंबिळे : सर्वांगें जाति विकळें
आधे उघडे केले डोळे : न धरे कंठ-नाळ (४४८)

आंगेंसीं होती प्रधान-कुमरी : तिया धरिली वरिचां वरि
दोहीं हातें वारिताय चकोरी : गजंबु सखियांचा (४४९)

ते मुर्छा वरिचां वरि राहिली : मग पाउलें दोनि चालिली
चांचरी जात जात आली : दारा सेजाराचेया (४५०)

विरह-ज्वरें पान-ऐसी कांपे : पावो ठेविता पाताळ पळिपे
तेथ स्फटिकाची भोय लासावें तापें : हें नवल काई ! (४५२)

ही स्थिति पहा. अलंकारांचा विशेष उपयोग न करता केलेलें हें वर्णन कोणा-लाहि सहज आकृष्ट करील ! अशा वर्णन-चातुर्याचीं उदाहरणं या काव्यांत सर्वत्र विखुरलेलीं आहेत.

## निसर्ग-सौंदर्य

पण नरेंद्राचा विशेष हा की त्याने निसर्ग-सौंदर्याकडे इतर कोणत्याहि प्राचीन कवीपेक्षा अधिक लक्ष पुरविलेलें आहे. प्राचीन मराठी काव्यांत स्वतंत्र निसर्ग-वर्णनें आढळत नाहीत हा आधुनिक टीकाकारांचा एक ठराविक आक्षेप आहे. नरेंद्राच्या रुक्मिणी-स्वयंवराकडे पाहून त्यांना यापुढे असा आक्षेप घेणें शक्य होणार नाही. मुक्तेश्वराच्या काव्यांत निसर्गाचीं कांही वर्णनें आढळ-तात हें खरें, पण त्यापेक्षा किती तरी पटींनी अधिक प्रमाणांत तीं नरेंद्राच्या काव्यांत आढळतात. आणि त्यांतहि महत्त्वाची गोष्ट ही की, नरेंद्राचीं वर्णनें केवळ बहिर्मुख दृष्टीने केलेलीं नाहीत. निसर्गांतील दृश्यांचा परिणाम कवीच्या किंवा कवीने वर्णिलेल्या पात्राच्या अंतःकरणावर कसा होतो हें कवीने वर्णन करायला पाहिजे असें म्हणतात. नरेंद्राच्या काव्यांत आपल्याला बरोबर तसेंच आढळतें. त्याने केलेल्या वर्णन-प्रसंगांतील चंद्रोदयाचें वर्णन हा मेरुमणि आहे. या चंद्रो-दयामुळे रुक्मिणीच्या अंतःकरणाची झालेली तगमग, तिला सुटलेली चुटपुट, तिचा वाढलेला विरह-संताप वगैरे गोष्टी कवीने अतिशय सुंदर रीतीने वर्णन केलेल्या आहेत. त्यावरून सृष्टिसौंदर्य-वर्णनांतील नरेंद्राच्या अंतर्मुखतेची रसिकांना फार चांगली कल्पना येईल.

## नरेंद्राची उपवन-सृष्टि

नरेंद्राने वर्णन केलेलीं निसर्गांतील दृश्यें बहुविध आहेत. त्यांत समुद्र, वनोपवनें, वसंतऋतु, उन्हाळा, अस्ताचलावरील सूर्य, सायंकाळ, दिवे, नक्षत्रें चंद्रोदय इत्यादि अनेक प्रसंगांचा समावेश होतो. द्वारकानगरीभोवती अस-लेल्या समुद्राचें वर्णन त्याने थोडक्यांत पण यथार्थतेने केलेलें आहे. त्या समुद्रावरील 'गळाळे, आवर्त, उभड, वळसे : उकाळिया, उलाळ धारसे : दापातेया सावजाचेनि रवसें' आकाश अगदी गर्जून गेलेलें होतें. तेथील

वोहर, सुसर, मगर, मासे इत्यादि नानाविध जलचर आकाशांत उडून नक्षत्रांना गिळूं पाहत होतीं. आणि समुद्र असल्यामुळे अर्थातच 'तरिया, तारुवें, दोनि प्रव्हाणें : नावा होडी बेडिया जंग ' इत्यादिकांनी तो भरून गेलेला असणे साहजिक आहे. याहीपेक्षा नरेंद्राने निर्माण केलेली वनोपवनांची सृष्टि अधिक मनोहर आहे. त्यांत अशोक, बकुळ, पुंनाग, बचकुंद, कल्हारासारखे वृक्ष असून तेथे कदर्प—केतकींची कुपणें आढळतात; नारयळी, सुरपोफळी, रायखजूर, आंबे, सोनजांबु, क्षीरद्राक्ष, आवळे, रायमातुळंगी, नारिंगी, दाळिंबे, रायअंबीर, सोनकेळी, मधुफणस, बोरी वगैरे फळझाडें फळांनी लहडलेलीं आहेत; तेथे वेधचांफा, पाडळी, रतिकेशर, कर्णिकार, कुंकुमसेवंती, कमळें, इत्यादि पुष्पांचा सुवास दरवळत असून पुंसा, साळेया, कोकिळ, भवर, मोर, राजहंस, मृग, सोगौर, चकोर, चक्रवाक इत्यादिकांच्या आवाजांनी भोवतालचें वातावरण अगदी गजबजून गेलें आहे ही सर्व सृष्टि वर्णन करतांना नरेंद्राने काव्य—कल्पनांच्या ज्या चंद्रज्योति उडवलेल्या आहेत त्यांची शोभा तर आगळीच आढळते.

## सायंकालीन शोभा

पण या वनोपवनांच्या वर्णनापेक्षाहि नरेंद्राने सायंकाळ व तदनुषंगिक इतर प्रसंगांचीं जीं वर्णनें केलीं आहेत तीं अधिक महत्त्वाचीं व सुंदर वाटतात. एकदोनच उदाहरणें आपण या ठिकाणीं पाहूं. वैभवाने विनटलेल्या विदर्भांच्या राजनगरींतील ही सायंकालीन शोभा पहाः—

संकोचलीं कमळें : पक्षिये टाकिती अविसाळें
 चक्रवाकें होति व्याकुळें : वीयोगें प्रियाचेनि
नानाविद्धा फुलांचा आमोदीं : सैंग उधांति राज-बिदी
 तेथ दाटत शृंघारियांची मादी : पेठें फुलसातेचा
द्विजीं सारिलीं संध्यावंदनें : शोडषोपचारीं देवता-पुजनें
 अग्निहोत्रें केलीं उपासनें : मौनें बिसर्जेलीं
नगरीचा प्रासादीं : मंगल तुरांचा शब्दीं
 पेखनेकरांचा मांदीं : आकास अवतरलें
शृंघारू करौनि गाणिका : उगाणा घेत कामुका
 स्वैरिणीतें नेति दूतिका : खागेयासी (४७६-४८१)

तत्कालीन महाराष्ट्राची राजधानी देवगिरी येथील सायंकालीन कार्यांच्या अनुभवावरूनच हें वर्णन नरेंद्राने केलेलें असावें असें वाटतें. या वर्णनांत साधेपणाचें सौंदर्य असूनहि श्रोत्यांच्या डोळ्यांसमोर प्रसंगाचा देखावा हुबेहूब उभा करण्याचें सामर्थ्य आहे. पण अलंकारांनी व नरेंद्राच्या काव्य-कल्पनांनी बहरलेलें निसर्ग-वर्णन वाचायचें असेल तर चंद्रोदयाचें पुढील वर्णन पहा:—

ऐसा उदयाचाळिचा उपरवाळां : उपहुडु जाला चंद्र-मंडळा
जैसी रासी जाली गगनाचां खळां : चकोरां पीकाची
कीं चांदणेयांचा समुद्र : तेथ निगत लक्ष्मी-मुख-चद्र
कीं कृष्णालागि धाडिताये इंद्र : पाउडु अमृताचा
कीं गगन-मंडपीं चंद्रिका-वेलां : नक्षत्रांचीं फुलें लागलीं
कीं अमृताचेनि बिजें विरूढलीं : आकारें चद्राचेनि
कीं देवाचिये कीर्ति-हंसीं : मिळौनि ब्रह्म-हंसेंसीं
सांकुवें गाळिलें आकासीं : रूपें चंद्राचेनि
कीं क्षीराब्धिचें दूध उमप : सिंपावेया चौगांविचें रोप
गगनाचां गाहटीं माप : सुधाकराचें (४९१-४९७)

अशा अनेक कल्पनांचें मोठें मनोहर दृश्य कवीने निर्माण केलेलें आहे. हा सगळा उतारा येथे देण्याचा मोह होतो. पण स्थलाभावास्तव तसें करतां येत नाही. वाचकांनी तो मुळांतच वाचावा म्हणजे झालें. निसर्गसौंदर्यवर्णनाच्या दृष्टीने ५४ ते ६४ हीं सर्वच प्रकरणें बहारीचीं उतरलीं आहेत !

## अलंकार

नरेंद्राच्या या काव्यकोषांत अलंकारांचें अफाट वैभव साठवलेलें आढळून येतें. त्यावरून त्याच्या प्रतिभेचें स्फुरण व कल्पनांची तरलता कोणाच्याहि प्रत्ययाला येईल. कथानकी काव्यांत अलंकारांचा शृंगार जर पाहायला सापडणार नाही तर ती काव्यकथा रूक्ष झालीच म्हणून समजा, याची नरेंद्राला चांगली जाणीव होतीसें दिसतें आणि म्हणूनच आपलें काव्य अलंकारांच्या साहित्याने सजवण्याची त्याने विशेष काळजी घेतली आहे. या काव्याचें कोणतेंहि पान चाळलें तरी त्यांत चारदोन सुंदर अलंकार रसिकांच्या चित्तांना आल्हादित केल्याशिवाय राहणार नाहीत. उपमा, दृष्टांत, उत्प्रेक्षा,

अपन्हुति व रूपक हे नरेंद्राचे विशेष आवडते अलंकार आहेत. तथापि रूपकावर त्याचा भर फार. कोणताहि प्रसंग रूपकाच्या साह्याने वर्णन करण्यांत त्याचा हातखंडा दिसतो. उदा:—

जाणिवेचेनि चंद्र-मंडळेंः रस-समुद्रा भरितें चढें आगळें
यन्हवीं उपेखें वडवानळेंः नेणिवेचेनी ॥ ४१ ॥
आवडिचा आवर्ती पडतः सिहाणिवेचें तारु तळु घेत
उत्कंठेचेनि पतंगें माल्हावतः कुळेंवा जाणिवेचा ॥ ६३० ॥
चंद्र-बिंबाचां पाणि-पात्रींः चंद्रिकेचि वारुणि पवित्र वक्त्रीं
पान करुनि रात्रींः डुलती चकोरें ॥ ५०८ ॥

अशा सुंदर सुंदर रूपकांचीं उदाहरणें या काव्यांत सर्वत्र विखुरलेलीं आढळतील. नरेंद्राच्या उपमाहि सुंदर असतात. एकच उदाहरण पहाः—

कास्मिरांचिये करंडिये जैसेः भीतरिल मूर्ति प्रकासे
पातळा लुगडेयातुनि तैसेंः आवएव दीसताती ॥ ८३

पारदर्शक स्फटिक-पात्रांतून आंत ठेवलेली मूर्ति जशी स्वच्छ दिसते त्याप्रमाणे झिरझिरित वस्त्रांमधून त्यांचे अवयव दिसत होते ! या उपमेची बहार निराळी वर्णन करून सांगायला नको. पण उपमारुपकादि अलंकारांपेक्षा कवीच्या प्रतिभाशालित्वाची ओळख उत्प्रेक्षा व अपन्हुति या दोन अलंकारांवरून विशेष होते. आणि या दोन्ही अलंकारांचीं उदाहरणें रुक्मिणी-स्वयंवरांत लागतील तितकीं आढळतात. उदा:—अस्ताचळावरील सूर्यावर कवीने केलेल्या पुढील उत्प्रेक्षा पहाः-

तवं उचित-चंद्रिका म्हणे : सूर्या अस्ताचळीं होत उपेणें
जैसें तेजाचें सांटवतें वोपणें : मढीं पवळेयाचां
कीं कुंकुम-रनीं सरागू : झेंपावत शृंघार-विहिंगू
कं त्रिनेत्र तातला अनंगू : रिगत पश्चिम-समुद्रीं
कीं ठेविला प्रकाशाचा मुडा : पाताळीं पेणें होत गरुडा
कीं श्रीकृष्णें आधिला पश्चिमिली कडां : कमळ-कांतिचेनि
कीं संध्या-सरोवरीं सारसिचा गिवसू : करूं आला सोनेयाचा सारसू
तैसा सूर्या होताय प्रवेशु : अस्ताचेळीं ( ४६७-४७० )

याचप्रमाणे सायंकालीन अंधःकारावर, दिव्यांवर, नक्षत्रांवर, उदित चंद्रावर व चांदण्याच्या शुभ्रत्वावर नरेंद्राने केलेल्या उत्प्रेक्षा अतिशय मनोहर आहेत. त्यांतच मधून मधून,

> कीं चट्ट नव्हे तें स्वेतद्वीप : माझारि सांवळें तें श्रीकृष्णाचें रूप
> वरि टाकोनि पाहों आलें स्वरूप : श्रीचक्रधराचें
> कीं भूगोळकाचां प्रासादीं जैसा : गाळिवा अमृताचा आरिसा
> तेथ श्रीकृष्णाचा बिंबला तैसा : कळंकु नव्हे तो

अशी आल्हादकारक अपन्हुतीची देखील अनेक उदाहरणें रसिकांना आनंदित करून सोडतात.

## रसोत्कटता

तथापि, नरेंद्राने आपलें काव्य केवळ अलंकारांनीच शृंगारलें आहे असें नाही. काव्याला प्राणभूत असलेला रस तोहि त्याने अनेक ठिकाणीं अत्यंत उत्कट रीतीने निर्माण केलेला आहे आणि म्हणूनच प्रस्तुत काव्य अतिशय भावमधुर उतरलेलें आहे. संगीताच्या साह्याने किन्नराने गाइलेलीं श्रीकृष्णाचीं स्तुतिस्तोत्रें ऐकून 'सभे सुखाचें भरितें चढलें' आणि 'सर्वांगीं सात्त्विक दाटलें : रुक्मिणीचां' हा उत्कट रसनिर्मितीचा एक सुंदर प्रसंग आहे. आणि त्यानंतर रुक्मिणीची झालेली अवस्था वर्णन करण्यांत तर कवीने आपलें सर्व कौशल्य वेचलें आहे. ते सर्व प्रसंग अभ्यासकांनी मुळांतून वाचावे एका प्रसंगाकडे मात्र अभ्यासकांचें लक्ष वेधणें अवश्य वाटतें. भागवतांतील 'रुक्मिणी-पत्रिका' शब्दकौशल्याचें सुंदर उदाहरण मानतां येईल पण नरेंद्राने लिहिलेली 'रुक्मिणी–पत्रिका' मात्र भावनांच्या मधुर जलाने भरलेली आढळते. या दृष्टीने या दोन्ही 'पत्रिका' खरोखरच ताडून पाहण्यासारख्या आहेत.

## कल्पना–सौंदर्य

कवीची खरीखुरी योग्यता त्याच्या कल्पनांवरून आपणांस अजमावता येते. ह्या कल्पना सामान्यतः अलंकाराच्या रूपाने व्यक्त होत असतात. अर्थात्, नरेंद्राने निर्माण केलेल्या अलंकार–वैभवावरून त्याच्या कल्पना–वैभवाचीहि आपणांस ओळख पटतेच. अशीं कांहीं उदाहरणें नमुन्यादाखल पूर्वी दिले-

र्लीच आहेत. तथापि कल्पना–सौंदर्याच्या दृष्टीने विशेष सुंदर वाटणारीं अशीं आणखी दोनतीन उदाहरणें या ठिकाणीं नमूद करणें अवश्य वाटते. म्हणजे ह्यावरून नरेंद्राची प्रतिभा केवढी विशाल होती याची वाचकांना कल्पना करतां येईल. विरहावस्थेने व्यथित झालेली रुक्मिणी मंचकावर पहुडलेली असतांना तिने ‘ डावा हातु उसिसां घातलाः उजवा हृदयावरि ठेवला ’ यावर

जैसा जिवेसी देवो धरिला : निसटैल म्हणौनि

अशी अत्यंत सुंदर कल्पना नरेंद्राने केलेली आढळत. ती कुणालाहि हृद्य वाटेल! त्याचप्रमाणे, सुदेवाला पाठवणी देतांना रुक्मिणीने ‘कापुर–विडा देवों आदरिला : तव हातीं जाळू निघाला ’ यावर दयाल

तेणें हृदइंचा देवो वोवाळिला : सगळ–मूर्ति म्हणौनिया (६८८)

अशी आल्हाददायक कल्पना कवीने केलेली आहे. अशींच आणखी दोन-तीन उदाहरणें पहा :—

जयाचेनि प्रतापें खरागलें : हो का गगन काजळैलें
सूर्यासि तीव्रपण आलें : तेणें तापें ॥२०३॥

हिमाचें देखोनि दामोधर : सिये सूर्यो कांपे निरंतर
हो काज विजूसी वाजतसे दातौर : मिसें गाजनेयाचेनि ॥४३८॥

वसंतु माजिरा कैसा : सूर्यातें करीं पश्चिमी धरी दिसा
दिनकरू भूलला तेया रसा : म्हणौनि वेगां न ढळे ॥७५३॥

## समारोप

सारांश नरेंद्राचें हें रुक्मिणी–स्वयंवर म्हणजे भाव–मधुरतेने, रसोत्कट-तेने, कल्पना–सौंदर्याने व अलंकार–प्रचुरतेने विनटलेलें एक अतिशय सुंदर काव्य आहे. भाषाभ्यासकांना त्यांत शब्दांचें भांडार आढळेल, निसर्गप्रिय वाचकांना त्यांत सृष्टिसौंदर्याचीं रमणीय स्थळें सांपडतील, काव्य–मर्मज्ञांना रसभावांचीं कारंजीं उडत असलेलीं दिसतील आणि भाविकांना विप्रलंभ शृंगाराच्या रमणीय पार्श्वभूमीवर श्रीकृष्णभक्तीचें सुंदर चित्र चितारलेलें पाहतां येईल. नरेंद्राची ही सहजसुंदर काव्यकृति कुणालाहि वेड लावील यांत शंका नाही !

प्रयोजन काय? सारांश, एकदोन लेखकांनी तरी आपापल्या मतानुसार निरनिराळ्या वेळीं हे 'शोध' या ओवींत घातले असावेत असें वाटतें. तेव्हां या 'घडामोडी' कडे व 'शोधा' कडे दुर्लक्ष करून मूळ ओवीच आपण लक्षांत घेतली म्हणजे झालें.

## ओवीवरून नक्की शक कोणता निघतो?

या शकनिदर्शक मूळ ओवीवरून रुक्मिणी-स्वयंवर काव्य, शके १२१३, नंदननाम संवत्सर, माघ वद्य चतुर्थीला लिहिलें गेलें असें दिसतें. या मितींत 'वार' दिलेला नसल्यामुळे ती तपासून पहातां येणें शक्य नाहीं. शके १२१३ ला नंदन संवत्सर येत नाहीं हें खरें. पण 'गतशक' लेखनाच्या पद्धतीप्रमाणे मात्र या ठिकाणीं शक-संवत्सराचा मेळ बरोबर पडतो. अनेक मराठी पोथ्यांतून गतशक लिहिण्याची पद्धति आढळते. याचा अर्थ असा कीं, शक-संवत्सर नमूद करतांना, ज्यावर्षी एखादें कृत्य झालें असेल त्या वर्षाचा संवत्सर तेवढा देतात. पण शक मात्र होऊन गेलेल्या ( गत ) वर्षाचा लिहितात. उदाहरणार्थ, वरील ओवींत 'नंदन' संवत्सर दिलेला आहे. नंदन संवत्सर शके १२१४ ला येतो. याचवर्षी खरोखर रुक्मिणी-स्वयंवराचें लेखन पूर्ण झालें. पण नंदन संवत्सराचा उल्लेख केल्यावर शक मात्र 'गत' घायला पाहिजे. त्याप्रमाणे १२१४ च्या ऐवजी मागील ( गत ) शक १२१३ हा या ओवींत नमूद केलेला आहे. अर्थात् १२१३ हा 'गत' शक असल्या-कारणाने वरील ओवीवरून रुक्मिणी-स्वयंवराचा खरा लेखनशक १२१४ हाच ठरतो. !

## इतर पुराव्याचा विचार

या ठिकाणीं स्मृतिस्थळांतील कालानुक्रमाच्या पुराव्याचा विचार करणें योग्य होईल. स्थूलमानाने स्मृतिस्थळांतील आख्यायिका कालानुक्रमाने येतात, असें वाटतें. त्यांतील ८३ व्या स्मृतींत दिल्लीच्या सुलतानाची स्वारी दक्षिणेवर झाल्याचा उल्लेख येतो; आणि त्यानंतर ११३ व्या स्मृतींत नरेंद्रकृत रुक्मिणीस्वयंवराचा उल्लेख येतो. या वरून दिल्लीच्या सुलतानाच्या स्वारीनंतर रुक्मिणीस्वयंवराचें लेखन झालें असावें असें म्हणावें लागतें. ८३ व्या स्मृतींतील उल्लेख हा शके १२१६ मधील ( इ. स. १२९४ ) अल्लाउद्दीन खिल-

जीच्या स्वारीचा आहे असें धरून चालल्यास तदनंतर म्हणजे शके १२१६ नंतर रुक्मिणीस्वयंवर लिहिलें गेलें, असें त्यावरून निष्पन्न होतें. आणि तळेग्रामकराच्या पोथींतील शकनिदर्शक ओवीवरून तर हें काव्य शके १२१४ मधे (इ. स. १२९२) संपूर्ण झाल्याचें दिसलें! अर्थात्, येथे ही दोन वर्षांची विसंगति निर्माण होते! फार झालें तर असें म्हणतां येईल कीं, नरेंद्राच्या लेखनाचा शक १२१४ असला तरी महिना वद्य पक्षाचा माघ आहे. म्हणजे १२१४ चा हा जवळजवळ शेवट मानायला हरकत नाही. ही गोष्ट लक्षांत घेतली तरीहि वर्षदीडवर्षांची विसंगति कायम राहतेच! मग, शके १२१६ नंतर रुक्मिणी-स्वयंवर लिहिलें गेलें असें मानायचें कीं पोथींत दिल्याप्रमाणे शके १२१४ ला मानायचें? पोथींत निश्चित शक दिलेला असल्यामुळे तोच लेखनकाल मानावा असें मला वाटतें. स्मृतिस्थळांतील आख्यायिका कालानुक्रमाने येतात हें स्थूलमानाने खरें असलें तरी 'पण तें सर्वत्र खरें नाही' असें स्मृतिस्थळाचे संपादक श्री. वा. ना. देशपांडे म्हणतात, तेंच या ठिकाणीं लागू पडतें. म्हणून केवळ स्मृति-स्थळांतील आख्यायिकांच्या कालक्रमानुरोधाने रुक्मिणी-स्वयंवराचा लेखन काल ठरविणें फारसें बरोबर होणार नाही. विशेषतः तळेग्रामकराच्या पोथींत हा शककाल निश्चित स्वरूपांत दिलेला असल्यामुळे तोच अधिक विश्वसनीय मानणें योग्य होईल. सारांश, शके १२१४ माघ वद्य चतुर्थी हाच रुक्मिणी-स्वयंवराचा लेखनकाल होय असेंच आज मानायला पाहिजे.

## आधारभूत ग्रंथ

रुक्मिणी-स्वयंवराच्या लेखनकालाचा विचार केल्यावर आता मूळ काव्याच्या विवेचनाकडे वळण्यास हरकत नाही. पण त्याहिपूर्वी हें काव्य लिहितांना नरेंद्राने कोणकोणत्या ग्रंथांचा आधार घेतला असावा हें पाहणें आवश्यक वाटतें. नरेंद्र हा अत्यंत विद्वान होता यांत शंकाच नाही. 'वेदांवरि रचिलीं स्मृति-पुराणें' (१६); त्याचप्रमाणे 'आणिकें काव्यें नाटकें कथा : आख्यानें प्रबंध चित्र-गाथा' (१७) या सर्वांचा त्याने सूक्ष्मतेने आणि रसिकतेने अभ्यास केला असावा हें वरील उल्लेखांवरून स्पष्ट दिसतें. काव्यरचना करतांना या सर्व ग्रंथांच्या रसिकावलोकनाचा परिणाम नरेंद्राच्या प्रतिभेवर

झाल्याशिवाय कसा राहील ? पण या सर्वसाधारण परिणामापेक्षा रुक्मिणी-स्वयंवरावर कांही विशिष्ट ग्रंथांची छाप पडलेली आहे की काय हें पाहणें महत्त्वाचें आहे. खुद्द नरेंद्राला आपण प्रश्न केला तर

काढूनि ब्रह्म–सुखाचें बोनें : सुकें केलें भागवत ॥ ४८ ॥
तो पुराणांतुल आनंद–समुद्र : तेथ दशम–स्कंदु तोचि चंद्र
तें चांदिणें सांघैन म्हणे नरेंद्र : रुक्मिणि–सैंवर ॥ ४९ ॥

शुकाचार्यांनी लिहिलेल्या भागवताच्या दशम स्कंधाच्या आधारें आपण आपलें काव्य तयार केलें आहे असें उत्तर त्याजकडून मिळेल. आणि स्थूलमानाने तें खरेंहि आहे. याशिवाय यांतील कांही कथाभाग, विशेषतः कल्याणकीर्ति भाटा-बरोबर असलेल्या किन्नरस्वरूप शापभ्रष्ट वेदघोष ऋषीने भीमकाच्या दरबारांत श्रीकृष्णाचें जें वर्णन केलें तें पद्मपुराणांतून घेतलें असल्याचें नरेंद्राने नमूद ठेवलें आहे.

भागवतापासौनि **पद्मपुराणीं** : जें सैंवर बोलिजे रुक्मिणी
तेथ देवातें कौनरू वाखाणीं : तें सांघैल नरेंद्र ॥ ७९ ॥

यावरून हें उघड दिसून येईल. सारांश, भागवताचा दशम स्कंद व पद्मपुराण या दोन संस्कृत ग्रंथांच्या आधारें नरेंद्राने आपलें हें रुक्मिणी–स्वयंवर रचलें असें त्याच्याच म्हणण्यावरून दिसून[1] येतें.

## नरेंद्राच्या कथेंतील एक विशेष

नरेंद्राने लिहिलेल्या या रुक्मिणी–स्वयंवराच्या कथेंतील एक विशेष लक्षांत ठेवण्यासारखा आहे. विदर्भदेशाधिपती भीमक राजाच्या सभेंत रुक्मिणी बसली असतांना तेथे कल्याणकीर्ति नांवाचा एक भाट येतो. त्या भाटाजवळ

---

१. रुक्मिणी–स्वयंवराच्या संपूर्ण पोथींतील समाप्तीच्या ओव्यांत आलेल्या निर्देशा-वरून देखील हीच गोष्ट दिसून येते. '**श्रीभागवत पद्मपुराणीं**ःया कामधेनू दोन्ही : दोहीलीया आदुभणी : मग केलें रुक्मिणी स्वयेंवर ' असें २९२१ व्या ओवींत म्हटलें आहे. शिवाय ' हे **श्रीभागवती** कथा आईकतु श्रोते : **पद्मपुराण**पर्यंत ये कथेतें : श्रवण होये जयासि जेथें : ते पावती परमगती ' (२९२५) या ओवीवरूनसुद्धा भागवत व पद्मपुराण हे दोनच ग्रंथ रुक्मिणी–स्वयंवराला आधारभूत असावेत, असें दिसतें.

एक किन्नर असतो. हा किन्नर म्हणजे रंभेशीं संभोगसुख उपभोगण्याचें नाकारल्यामुळे शापभ्रष्ट झालेला वेदघोष नांवाचा ऋषि होय. औपचारिक आदरातिथ्यानंतर ' आपण कोणकोणते देश भटकून आलां ? तेथे कोणकोणते राजे पाहिले ' अशी पृच्छा भीमकाने कल्याणकीर्तीजवळ केली. त्यावरून कल्याणकीर्तीने ओळखलें की या प्रश्नाच्या मिषाने भीमक राजा रुक्मिणीसाठी एखादा अनुरूप वर सुचवायला सांगत आहे. राजाचा हा मनोरथ लक्षात घेऊन त्याने किन्नराला निरनिराळ्या देशांतील राजांचीं वर्णनें करायला लावलीं. किन्नराने पूर्व, पश्चिम, दक्षिण व उत्तर या सर्व दिशांकडील राजांचीं वर्णनें केलीं; पण त्यांपैकी एकहि राजा रुक्मिणीच्या मनाला आला नाही. म्हणून शेवटीं त्याने श्रीकृष्णाचीं स्तुतिस्तोत्रें गायला सुरवात केली. त्यासरशीं रुक्मिणी आनंदित झाली. तिला श्रीकृष्णाचा वेधच लागला. हें लक्षांत घेऊन भीमकराजाने रुक्मिणी श्रीकृष्णाला देण्याचा विचार निश्चित केला. पण ··· यापुढचा कथाभाग सर्वविश्रुत आहे.

## पद्मपुराणाचा आधार ?

वर वर्णन केलेला वृत्तांत नरेंद्राच्या रुक्मिणीस्वयंवर–कथेंतील एक महत्त्वाचा विशेष होय. कारण हा वृत्तांत इतरत्र कोठेच आढळत नाही. नरेंद्राच्या नवनवोन्मेषशाली प्रतिभेचा तो एक अपूर्व विलास असावा की काय असें वाटतें. हा विशिष्ट कथाभाग आपण पद्मपुराणांतून घेतला असे नरेंद्राने ( ७५ ) म्हटलें आहे खरें; पण वस्तुस्थिति तशी दिसत नाही. कारण पद्मपुराणांत हा कथाभाग आढळत नाही. पद्मपुराणाच्या उत्तरखंडांतील २७५ व २७६ व्या अध्यायांत ( आनंदाश्रम प्रत ) रुक्मिणीविवाहाचा कथाभाग आलेला आहे. वेंकटेश्वर प्रेसने छापलेल्या पद्मपुराणाच्या आवृत्तींत उत्तरखंडांतील २४६ व २४७ मधे तोच वृत्तांत आहे. पण या दोन्ही आवृत्तींत कल्याणकीर्ति भाट, शापभ्रष्ट किन्नर वगैरे व्यक्तींचा पत्ता नाही. पद्मपुराणाच्या इतर भागांतहि तो नाही. व्यासमहामुनींच्या भागवतांतील दशमस्कंधांत ( अ. ५२ ते ५४ ) आलेल्या रुक्मिणीस्वयंवराच्या कथेंतसुद्धा वरील वर्णन आढळत नाही ! दशमस्कंधाच्या ५२ व्या अध्यायांतील

सोपश्रुत्य मुकुंदस्य रूपवीर्यगुणश्रियः
गृहागतैर्गीयमानास्तं मेने सदृशं पतिम ॥२३॥

या श्लोकावरून ' घरीं आलेल्या लोकांकडून भीमकाने श्रीकृष्णाची स्तुति-स्तोत्रें ऐकलीं व आपल्या कन्येला हा योग्य वर आहे असें त्याने ठरवलें ' एवढाच काय तो महत्त्वाचा कथाभाग कळतो. हरिवंशाच्या विष्णुपर्वांतील ५९ व्या अध्यायांतसुद्धा रुक्मिणीच्या स्वयंवराची कथा आहे. पण तेथेंहि कल्याण कीर्ति–किन्नरादिकांची कथा सापडत नाही. सारांश, श्रीकृष्णचरित्र–वर्णनपर अशा भागवतांत व हरिवंशांत ही कथा नाही; आणि पद्मपुराणांतसुद्धा ती नाही. मग नरेंद्राने हें उपाख्यान कोठून घेतलें असेल ?

## एकनाथ–विठ्ठलादि महानुभावीयेतर कवि

या बाबतींत आणखी एक गोष्ट या ठिकाणीं नमूद करण्यासारखी आहे. ती अशी कीं उपरोक्त संस्कृत ग्रंथांच्या आधारें आमच्या अनेक मराठी कवींनी रुक्मिणी–स्वयंवर गाइलें आहे. एकनाथ, सामराज, विठ्ठल, श्रीधर, मोरोपंत इत्यादि कवींनी निरनिराळ्या थाटांत या कथेचें संकीर्तन केलें आहे. पण त्यांच्यापैकीहि कोणीसुद्धा कल्याणकीर्ति व किन्नर यांचा उल्लेख केलेला आढळत नाही. नाही म्हणायला ' गृहागतैर्गीयमानाः ' या चरणाच्या आधारें नाथांनी

तेथे **कीर्ति**नामा ब्राह्मण । रायापाशीं आला जाण ॥
तेणें केलें कृष्णकीर्तन । तेथें तनमन वेधलें ॥ १–१८ ॥
बैसली होती रायापासीं । सादर देखोनी भीमकीसीं
मग वर्णिलें कृष्ण-रूपासी । चित्स्वरूपासी साकार ॥१–१९॥

असें वर्णन केलेलें आहे नरेंद्राने वर्णिलेला कल्याण**कीर्ति** आणि नाथांचा **कीर्ति** नांवाचा ब्राह्मण यांत हें अर्धनामसादृश्य आहे. पण नरेंद्राने कल्याण-कीर्तीला भाट म्हटलें आहे, तर नाथांनी त्याला ब्राह्मण म्हटलें आहे. याशिवाय

कलारत्न भूमंडळीं **कीर्तिनामा** नटश्रेष्ठ आला विदर्भेंद्रधामा
करी नृत्य संगीतशास्त्रप्रमाणें, उणें त्यापुढें दिव्य गंधर्वगाणें

हें विठ्ठल कवीने करून ठेवलेलें वर्णन सुद्धा लक्षांत घेण्यासारखें आहे. यांतील नामसादृश्य उघड करून दाखवायला नकोच. नरेंद्राचा ' भाट ' व नाथांचा ' ब्राह्मण ' विठ्ठल कवीच्या काव्यांत ' नटश्रेष्ठ ' बनला आहे. नरेंद्राच्या आख्यानांतील किन्नर संगीतशास्त्रांत प्रवीण आहे. पण विठ्ठलाचा हा नटश्रेष्ठच संगीत शास्त्रज्ञ असून शिवाय तो नृत्य करणाराहि आहे. हा **कीर्ति**–

नामा ब्राह्मण व नटश्रेष्ठ नाथांनी व विठ्ठलाने कुठून काढला कांही कळत नाही. कारण भागवतांतील वर्णनांत तो नाही. पण नाथ तर म्हणतात की ‘मूळ सांडून सर्वथा। नाही वाढविलें ग्रंथा’! (१८-६९) मग हें झालें कसें? विठ्ठल कवीने सुद्धा ‘श्रीमद्भागवतीं पवित्र दशमस्कंधीं कथापद्धती। आध्ये तीन’ त्याच्याच साह्यानें आपलें काव्य लिहिलें आहे. त्यानेहि कीर्ति-नामा नटश्रेष्ठ कोठून व कसा घेतला हें कळायला मार्ग नाही. या नांवावर टीप लिहितांना कै. वा. दा. ओकांनी सुद्धा ‘हें वर्णन दशमस्कंधांत नाही’ असें नमूद केलें आहे. भागवतावरील एखाद्या संस्कृत टीकेंत याला कांही आधार असल्यास नकळे. पण बहुधा तसें नसावें. इतर [1]मराठी कवींच्या काव्यांत हें नांव येत नाही. तथापि ‘गृहागतैः’ च्या साह्याने कांहींनी भीमक राजाकडे आलेल्यांना ब्राह्मण कल्पिलें आहे तर कांहींनी भाट कल्पिलें आहे. ‘भगवद्भक्त ब्राह्मण जे येती मत्पित्यासि भेटाया’ (मोरो. कृष्ण-विजय ८३-१०); ‘सेवार्थ बंदीजन नित्य येती। तेहीं प्रसंगें वर वर्णि-जेति’ (सामराज. २-५९) इत्यादि उदाहरणांवरून हें दिसून येईल. वरील कवींचा हा कल्पनाविलास असावा असें वाटतें. तें कांहीहि असलें तरी किन्न-राचा, म्हणजे शापभ्रष्ट वेदघोषाचा वृत्तांत मात्र यांपैकी कोणीच वर्णन केलेला नाही हें लक्षांत घेण्यासारखें आहे.

## महानुभावीय रुक्मिणी-स्वयंवर

पण, इतर मराठी कवींच्या काव्यांत हें कल्याणकीर्ति-किन्नराचें उपा-ख्यान आढळत नाही हें जितकें खरें आहे तितकेंच हेंहि खरें आहे की, रुक्मिणी-स्वयंवरावर काव्यरचना करणाऱ्या बहुतेक महानुभाव कवींच्या काव्यांत तें आढळतें! नरेंद्राव्यतिरिक्त महदंबा, संतोषमुनी कृष्णदास, गोपाळ-दास, कृष्णमुनी विराटदेशे, नरसिंह इत्यादि अनेक कवींनी रुक्मिणी-स्वयंवर आपापल्या परीने वर्णन केलें आहे. त्यांतील बहुतेकांनी उपरोक्त आख्यानाचा

---

१ नाथांचा हा ‘कीर्ति’ नामा ब्राह्मण श्रीधरकवीच्या हरिविजयांत **‘कीर्तिमुख’** नामा ब्राह्मण बनलेला आढळतो. पहा: तो **‘कीर्तिमुख’** नामा ब्राह्मण। जो चौसष्ट कला प्रवीण। तो करीत पृथ्वीपर्यटन। भीमक-सभेसी पातला॥ (अ. २३-२१.)

उपयोग करून घेतलेला आढळतो. महदंबेच्या ‘ धवळ्यां ’ त “द्वारकेहूनि कौंडण्या आले **नागारीः** तिहीं सर्वेश्वरु वाखाणिले नानापरी : ” ( धपू. ३ ) असा केवळ नागारींचा म्हणजे भाटांचाच उल्लेख आहे; पण ‘ मातृकी–रुक्मिणी–स्वयंवरांत ’ मात्र भाटांचा व किन्नराचा “ आले पैं **नागारी** कौंडण्यासी ॥ जंबुदीपीं रायें वाणितां आदरें : मुरारी **कींन्नरें** वर्णियेला ” ( ८–९ ) असा स्पष्ट उल्लेख केला आहे, ‘ ऐका भागवतीं पद्मपुराणीं । ऋषिवाणीं आधार करोनि ’ ( अ. २७-२२९ ) काव्यरचना करणाऱ्या संतोष-मुनि कृष्णदासानेहि कल्याणकीर्ति भाट ( अ. २-३ ) व किन्नर यांच्या उपाख्यानाचा उपयोग करून घेतलेला आहे. इतकेंच नव्हे तर “ आतां किन्नरें वार्णिले ऋषिकेशु । **हा पद्मपुराणाचा इतिहासु**” (अ. २-१३०) असें नरेंद्राप्रमाणे यानेहि स्पष्ट म्हटलें आहे. कृष्णमुनि विराटदेशे याच्या नवखंड रुक्मिणी–स्वयंवरांत देखील हें उपाख्यान आहे. ‘ **कल्याणकीर्ति** वर **मागध** हा तयाचा ’ ( प्रसंग १.६१ ) ‘मधुवन मज तेथे **किन्नरू** भेटला हा ’ ( प्र. २-२ ) या चरणावरून त्याची कल्पना येऊं शकेल. नरसिंहाच्या रुक्मिणी–स्वयंवरांत मला कल्याणकीर्ति आढळला, पण किन्नर मात्र भेटला नाही ! इतरत्र किन्नराने वर्णिलेले राजे नरसिंहाच्या काव्यांत कल्याण-कीर्तीनेच वर्णिलेले आहेत. तथापि असा एखादुसरा अपवाद सोडला तर स्थूलमानाने असें म्हणायला हरकत नाही की, महानुभावीय कवींनी कल्याण-कीर्ति भाट व त्याला मधुवनांत भेटलेला शापभ्रष्ट वेदघोष म्हणजेच किन्नर यांचा उपयोग करून घेतलेला आहे. या किन्नराकडूनच अनेक राजांचीं सविस्तर वर्णनें त्यांनीं केलीं आहेत. नरेंद्र, संतोषमुनि–कृष्णदास इत्यादि कवींनी हा वृत्तांत आपण पद्मपुराणांतून घेतल्याचें सांगितलें; पण पद्मपुराणांत मात्र तो आढळत नाही, हें आपण यापूर्वी पाहिलेंच ! त्यामुळे प्रश्न असा उपस्थित होतो की नरेंद्रादिकांनी हा वृत्तांत कोठून घेतला असावा ?

## महानुभावीय पद्मपुराण ?

कांही दिवसांपूर्वी महानुभावीय पोथ्या चाळीत असतांना श्रीगोपीराज-ग्रंथसंग्रहालयांत मराठी पद्मपुराणाची मला एक पोथी आढळली. पद्मपुराण आणि तें मराठींत पाहून थोडें आश्चर्य वाटलें ! कारण संस्कृत पद्मपुराणाचें कोणी मरा-

ठींत रूपांतर केल्याचें मला ठाऊक नव्हतें. त्यामुळे ही पोथी मीं उत्सुकतेने चाळली. कोणत्या तरी संस्कृत (?) पद्मपुराणाच्या आधारें पंडित दामोधर नांवाच्या कवीने हें मराठी पद्मपुराण १९ अध्यायांत सांगितलें आहे. 'संस्कृत पूर्वीचें : तें मऱ्हाटी बोलिलों वाचें' (२८७०)असें कवीचें म्हणणें असून 'श्री दत्तात्रेय देवाचें नीरोपण : तें पद्मरुषी सांघे आपण : मांधातया होये श्रवण' (२८७२) अशी त्यांतील कथानकाची बैठक आहे. एकंदर कथानक परमेश्वराने घेतलेल्या निरनिराळ्या अवतारांचें वर्णन करणारें आहे. मधून मधून अनेक संस्कृत श्लोक (?) कवीने वापरलेले दिसतात. 'भागवतीं जो पक्षु न दीसे : तो हरीवंसीं बोलिला असे' (१०५) या 'हरीवंसी अवघा वंसु : सांघीतीला भारथाचा पैसु :' पण 'राहीला मोसु : पद्मपुरानीचा' (१०९), तेथे पद्मपुराणांतील मार्ग वर्णन केलेला नाही. अर्थात, भागवतांत आणि हरिवंशांत नसलेल्या कथा पद्मपुराणांत आहेत असा या म्हणण्याचा अर्थ दिसतो. त्याचप्रमाणे या पंडित दामोधर कवीने आधाराला घेतलेलें मूळ पद्मपुराण हें 'पुर्वी पद्मपुराण केवळा : सांघितलें दत्तात्रदेवी' (१८) 'तेर्थांचे काढौनि सार' (१९) या कवीने वर्णन केलें आहे. अर्थात, हें पद्मपुराण मूळांत दत्तात्रेयानें पद्मरुषीला व मग पद्मरुषीनें मांधाता नृपतीला सांगितलें असें कवींचें म्हणणें दिसतें. या एकंदर वर्णनावरून हें पद्मपुराण सुप्रसिद्ध पद्मपुराणाहून वेगळें असल्याचें दिसून येईल. प्रस्तुत पोथीवर लेखनाचा शक नाही. तरी ती १५० वर्षांची जुनी असावी, ही पोथी दुसऱ्या पोथीवरून नकलल्याचें तिच्यावर लिहिलेलें आहे.

तें कांहीही असलें तरी कल्याणकीर्ति व किन्नराचा जो वृत्तांत 'पद्मपुराणांतून घेतल्याचें नरेंद्र व संतोषमुनि कृष्णदास सांगतात तो या पोथींत आढळतो, हें मात्र खास. या कथाभागाच्या ओव्या पुढील प्रमाणे आहेत :

माग। वेदघोका श्रापु घडला : तो **कीनरु** वनीं जाला
**कल्याणकीर्तीन** देखीला : तो आला कौंडन्यपुरा (२२६९)
तो बंदीजन नागारी : राय वर्निले परोपरी
परी दुषन ठेवीली नीर्धारी : समस्ता रायासी (२२७०)
कीन्नरू वर्णि गोपाळा : म्हने श्रीकृष्ण परब्रह्माचा पुतळा
तो रुक्मिनी बाळा : वरीजे (२२७१)

सारांश, या पंडित दामोधर कवीने कोणत्या तरी संस्कृत ग्रंथाधारें रच-

लेल्या मराठी पद्मपुराणांत हा कथाभाग आढळतो. नरेंद्रादिकांनी आपला कथाभाग या पद्मपुराणांतून घेतला असें म्हणतां येईल काय ?

## या पद्मपुराणाचें उत्तरकालीनत्व

अर्थात् नाही. कारण, एकतर प्रस्तुत ग्रंथ हा नरेंद्राच्या रुक्मिणी-स्वयंवरानंतर लिहिलेला असावा असें उघड उघड दिसतें. नरेंद्रसमकालीन कोणत्याहि कवीने पद्मपुराण रचल्याचा वृत्तांत स्मृतिस्थळ, वृद्धाचार किंवा अन्वयस्थळ यांपैकी कोठेहि नमूद केलेला नाही. सुप्रसिद्ध कवि वच्छहरणकर्ता पंडित दामोदर याने तर हा ग्रंथ खात्रीने लिहिलेला नाही. यांतील कथाभागाच्या सिंहावलोकनाने देखिल एक गोष्ट स्पष्ट होते. ती अशी की महानुभावीय विचारांच्या प्रतिपादनासाठी हा ग्रंथ लिहिलेला आहे. दशावतारांमधे श्रीकृष्णावतार सर्वश्रेष्ठ असून त्याच्या ' सन्निधाना '-नेच मोक्ष मिळतो असें पद्मऋषी मांधात्याला सांगतो. किंबहुना ' या दस आवताराचें कथन : श्रीदत्तात्रदेवि बोलीलें जाण : तया नांव पद्मपुराण : सांघीतलें पूर्वी ' (२२४५) असें हा कवि म्हणतो. ' युगायुगीं जो तारक : तो श्री दत्तात्रदेवो देख ......अवतरुनी जाला दाता : एक तोची उधरीता : चक्रपाणी ' असेंहि त्याने म्हटलें आहे. ' सन्निधान ' 'अवगळा' 'तम' इत्यादि पारिभाषिक शब्दांच्या योजनेवरून सुद्धा हेंच दिसून येतें. शिवाय, यांत कलियुगांतील **'दिल्ली क्षेत्र'** देखील आलेलें आहे ! प्रस्तुत ग्रंथाविषयीं यापेक्षा अधिक विवेचन करण्याचें हें स्थळ नव्हे. तथापि उपरोक्त कारणांवरून हा ग्रंथ नरेंद्राला 'आधार' देण्याइतका जुना नाही हें खास. या महानुभावीय पद्म[1]पुराणावरून नरेंद्राने आपली कथा कशावरून घेतली नसेल ? अशी शंका कोणाला आल्यास तिची निवृत्ती व्हावी म्हणूनच हें विवेचन या ठिकाणीं केलें आहे. माझ्या मतें हें महानुभावीय 'पद्मपुराण' कोणत्याहि संस्कृत ग्रंथाच्या आधारें रचलेलें

---

१. या पद्मपुराणाचा लेखक पंडित दामोधर हा उपाध्ये आम्नायांतील सेवलेकर वंशांतील असून तो साधारणपणें १५ व्या शतकांत होऊन गेला असावा. उपाध्ये आम्नायाच्या नवव्या पिढीचा हा आचार्य होता असें महंत श्री यक्षदेव महानुभाव यांच्या संग्रहांतील एका 'वृद्धान्वया' वरून दिसतें.

नसून पूर्णपणें स्वतंत्र आहे. पण तो या ठिकाणीं विवेचन करण्याचा विषय नाहीं; म्हणून येथेच थांबूं.

## हें उपाख्यान म्हणजे नरेंद्राचा प्रतिभा-विलास ?

सारांश, कल्याणकीर्ति व किन्नर यांचें हें उपाख्यान भागवतांत नाहीं, हरिवंशांत नाहीं, पद्मपुराणांत नाहीं व इतरत्रहि कोठे आढळत नाहीं. तथापि नरेंद्र आणि संतोषमुनि हे दोघेहि स्पष्ट सांगतात कीं हें आख्यान आपण पद्मपुराणांतून घेतलें म्हणून. पण उपलब्ध पद्मपुराणांत तर तें सापडत नाहीं. हें कसें ? संतोषमुनि कृष्णदास हा उत्तरकालीन कवि असल्यामुळे त्यानें नरेंद्राचें अनुकरण केलें असें म्हणतां येणें शक्य आहे. पण मग नरेंद्राने तरी हें आख्यान कोठून घेतलें, हा प्रश्न शिल्लक राहतो. पद्मपुराणाच्या एखाद्या आवृत्तींत तें असेल की काय अशी शंका येते. उपलब्ध आवृत्ती-वरून[१] मात्र या शंकेचें निवारण होत नाहीं.

पण असा प्रकार आणखी कांहीं मराठी कवींच्या काव्यांत झालेला आढळतो हें लक्षांत घेणें अवश्य आहे. एकच उदाहरण द्यायचें झालें तर श्रीधराचें देतां येईल. पांडवप्रतापाच्या ३० व्या अध्यायांत हरिश्चंद्राचें आख्यान वर्णिलेलें आहे. आणि हें आख्यान ' स्वस्ति श्रीपांडवप्रताप ग्रंथ । अरण्यपर्व व्यासभारत । त्यांतील सारांश यथार्थ । तिसाव्यांत कथियेला ' (३५०) आपण व्यासभारतांतील अरण्यपर्वाच्या आधारें लिहिलें असल्याचें श्रीधर सांगतो. इतकेंच नव्हे तर ग्रंथाच्या शेवटीं ' ज्या मूळ भारतीं कथा । त्याच येथें लिहिल्या तत्त्वतां । प्राकृत कवींचें समतां । नाहीं कदा धरियेलें ' ( अ. ६४-१८० ) अशी त्याने ग्वाही दिलेली आहे. पण व्यासकृत भारताच्या वनपर्वांत हरिश्चंद्राचें हें आख्यान आढळत नाहीं ! हरिविजयांतहि एके ठिकाणीं " ऐका पद्मपुराणीचें संमत । राधा तेथें आली धांवत । रथापुढें येऊनि त्वरित । ध्यान हरीचें विलोकिलें ॥ ... जैसें उदकीं मिळे लवण । तैसी राधा गेली अदृश्य होऊन " ( अ. १८-१९२. ) म्हटलें

१. चरित्रकोशकार सुप्रसिद्ध विद्यानिधि सिद्धेश्वरशास्त्री चित्राव यांच्याकडे पृच्छा केली असतां त्यांनींहि '...पद्मपुराण... या दृष्टीने पुनः चाळलें पण त्यांत ही माहिती मला आढळलेली नाहीं. ' असें कळविलें.

आहे; पण पद्मपुराणाच्या उत्तरखंडांतील श्रीकृष्णचरित्रांत अक्रूर-गमन-प्रसंगीं असा वृत्तांत वर्णन केलेला आढळत नाही!

कदाचित, एखाद्या ठिकाणीं किन्नराचा धावता उल्लेख असेलहि, नाही असें नाही. पण उपलब्ध पद्मपुराणावरून तरी तसें म्हणतां येत नाही. हें आख्यान इतक्या विस्तृत स्वरूपांत तरी खुद्द नरेंद्राच्या प्रतिभेने निर्माण केलें असावें असें वाटतें. रुक्मिणीस्वयंवराच्या या कथेला महाकाव्याचें स्वरूप देण्याचा नरेंद्राचा विचार दिसतो. आणि म्हणूनच भीमकाची सभा, तेथे रुक्मिणीचें सख्यांसमवेत आगमन, नंतर भीमक राजाला पडलेली रुक्मिणीच्या विवाहाची चिंता इत्यादि प्रसंग त्याने विशेष विस्ताराने पण अतिशय रसाळ भाषेंत वर्णन केलेले आहेत. हें आख्यान सांगत असतांना तो केवळ पुराणिक बनलेला दिसत नाही; तर त्याची बैठक महाकवीची दिसते. याचें प्रत्यंतर नरेंद्राने लिहिलेल्या ओवीओवींतून येतें. रुक्मिणीची विरहावस्था, त्यावरील उपचार, सायंकाळ, चंद्रोदय, वनोपवनें, समुद्र, द्वारका इत्यादिकांचीं त्याने केलेलीं वर्णनें देखील हीच गोष्ट दाखवितात. महाकवीच्या या भूमिकेवरूनच कल्याणकीर्ति व किन्नराचें उपाख्यान ह्याने तयार केलेलें किंवा एखाद्या लहानशा आधाराने विस्तारलेलें असावें असें वाटतें. मूळ ग्रंथांत नसलेलीं आख्यानें वर्णन करण्याचा प्रघात अनेक मराठी कवींच्या काव्यांत आढळतो. नरेंद्राचाहि प्रकार तसाच असावा. निदान या हकीकतीला प्रत्यक्ष असा आधार जोपर्यंत आढळत नाही तोपर्यंत तरी असें म्हणायला हरकत नाही. वेदघोष ऋषी व त्याला मिळालेला रंभेचा शाप हाहि कुठेच सापडत नाही. श्रुतिस्मृतिपुराणादिकांच्या आधारें 'प्राचीन चरित्रकोश' संपादन करणारे विद्यानिधी श्री सिद्धेश्वरशास्त्री चित्राव यांनीहि 'तशी माहिती माझ्या ध्यानांत आलेली नाही' असें मला लिहिलें. त्यावरून मीं केलेलें अनुमान बरोबर असावें, असें वाटतें.

## भारतीय भूपतींचीं वर्णनें

विशेषतः किन्नराकडून चारहि दिशांच्या अनेक राजांचीं जीं वर्णनें नरेंद्राने केलीं आहेत त्यांची ठेवण थेट महाकाव्यांतील स्वयंवर-प्रसंगाच्या धाटणीवर आहे. दमयंती-इंदुमती यांसारख्या नायिकांच्या स्वयंवरप्रसंगीं

सभेंत बसलेल्या अनेक राजांचीं वर्णनें सखीमुखांतून महाकवींनी वदवलेलीं आढळतात. अगदी त्यासारखीच पण प्रसंगोचित अशी दुसरी कल्पना नरेंद्राने रुक्मिणी–स्वयंवरांत केलेली दिसते. ' गृहागतैर्गीयमानाः ' या भागवतांतील चरणार्धावरून भीमकाकडे आलेल्या लोकांकडून श्रीकृष्णाचीं चरित्रें वारंवार गाइलीं जात असत हें नरेंद्राला ठाऊकच होतें. याला योग्य अशी पार्श्वभूमी निर्माण करण्यासाठी या अनेक राजांच्या वर्णनांचा चित्रपट त्याने तयार केला असावा. ही चित्रपटसृष्टि निर्माण करण्याकरिताच नरेंद्राने किन्नराची कल्पना काढली असावी. त्याच्या भोंवती शापभ्रष्टत्वाचें वलय निर्माण केल्यामुळे या कल्पनेला खरीखुरी पौराणिकता व गूढता आलेली आहे ! या कल्नेची एकंदर उठावणी फार मनोहर व डौलदार झालेली आहे असें कोणालाहि वाटेल !

## हीं वर्णनें कोठून घेतलीं असावीं ?

किन्नराच्या तोंडीं नरेंद्राने पूर्व, पश्चिम, दक्षिण व उत्तर या दिशांकडील अनेक राजांचीं नांवें घातलीं आहेत, तीं त्याने प्रत्यक्षपणें एखाद्या दुसऱ्या ग्रंथावरून घेतलीं असावींत कीं काय अशी शंका येते. ही नामावली भीमकाच्या दरबारांत वर्णन केलेली उपरोक्त संस्कृत ग्रंथांत आढळत नाही. नरेंद्राने या ठिकाणीं आपल्या कल्पनेने तिची योजना केली असें म्हटलें तरी या भारतीय राजांचीं नांवें महाभारत–भागवतादि ग्रंथांतूनच घेतलीं असलीं पाहिजेत. या सर्व दिशांतील राजांचीं नांवें जेथे एकत्रित आढळतात असा एक राजसूय यज्ञाचा प्रसंग महाभारतांतील सभापर्वांत आलेला आहे. राजसूय यज्ञ करण्याचें निश्चित झाल्यावर धर्मराजाच्या अनुज्ञेने भीम, अर्जुन, नकुल व सहदेव हे अनुक्रमें पूर्व, उत्तर, पश्चिम व दक्षिण या दिशांना दिग्विजयासाठी गेले होते. या ' दिग्विजयपर्वांत ' ( सभा. २५–३२ ) चारहि दिशांकडील देश व तेथील राजांचीं नांवें आलेलीं आहेत. त्याचप्रमाणे, प्रत्यक्ष राजसूय यज्ञाच्या वेळीं करभार देण्यासाठी हे सर्व राजे आले होते तेथे (सभा. राजसूयपर्व. अ. ३४) आणि द्यूतपर्वांतील ५१ ते ५३ या अध्यायांत हीं नांवें पुनः आलेलीं आहेत. त्यांच्या साह्याने नरेंद्राने आपली नामावली वर्णन केली असावी असें दिसतें. अर्थात्, महाभारतांत आलेलीं सर्वच नांवें

नरेंद्राने घेतलीं आहेत असें नाही. त्यांचीं वर्णनें करतांना मात्र त्याने आपल्या प्रतिभाशक्तीचा उपयोग करून घेतलेला आहे. या राजांचीं नांवें रुक्मिणीला अनुरूप वर सुचवण्याच्या दृष्टीने वर्णन करावयाचीं असल्यामुळे त्या त्या राजाचीं यथार्थ स्तुतिस्तोत्रें गाणें कवीला अवश्य होतें. इंदुमतीला सभामंडपांतून मिरवीत असतांना अनेक राजांचीं स्तुतिपूर्वक गुणवर्णनें तिच्या सखीच्या तोंडीं कालिदासाने घातलीं आहेत की नाही? तसाच प्रकार नरेंद्रानेहि या राजांचीं वर्णनें करतांना केलेला दिसतो.

महाभारतांतील वरील पर्वांत व अध्यायांत आलेल्या नांवांची व नरेंद्राने वर्णन केलेल्या नांवांची तुलना करून पाहण्याचें हें स्थळ नाही. कारण आपल्या कामापुरतीं अशीं निवडक नांवेंच त्याने तेथून घेतलेलीं आहेत. सगळीं नाहीत. तीं तेथून घेतलीं असावींत असें मानण्याचें कारण बऱ्याच ठिकाणीं देशांचीं व देशाधिपतींचीं नांवें बरोबर जुळतात. उदा:–'**हाटक** देशिचा **गुह्यकु**' (२१४) म्हणजे 'तं जित्वा **हाटकं** नाम देशं **गुह्यक**-रक्षितम्' (सभा. २८–३); '**सींहपुरींचा चित्रायुधु**' (२१६) म्हणजे 'ततः **सिंहपुरं** रम्यं **चित्रायुध**सुरक्षितम्' (२७–२०); '**लोहित दश मंडळिचा**' (२२०) म्हणजे 'व्यजयल्लो**हितं** चैव **मंडलैर्दशभिः** सह' (२७–१७); '**उजनियेचेनि वींदानवींदें**' (२३१) म्हणजे '**विन्दानुविन्दावावन्त्यौ**' (३१–१०). या उल्लेखांवरून माझ्या म्हणण्याचा प्रत्यय येईल. कांहीं ठिकाणीं भारतांतील या अध्यायांत केवळ देशांचींच नांवें आहेत; तेथील राजांचीं नांवें नाहीत. पण भीष्मद्रोणादि पर्वांत तीं विखुरलेलीं आढळतात. तेथून तीं नरेंद्राने गोळा केलीं असावींत असें वाटतें. क्वचित्, त्याने नवीनच नांवें घातलीं आहेत. उदा:—उत्तरेकडे वर्णन केलेला 'तुडकान' व 'खोरासान' देश. पण असे कांही अपवाद सोडले तर स्थूल मानानें हीं देशांचीं व राजांचीं नांवें महाभारतांतून घेतलीं असावींत असें मानायला हरकत नाही. या पुस्तकाच्या शेवटीं जोडलेल्या व्यक्ति–सूचींतील व स्थळ–सूचींतील माहितीवरून देखील ही गोष्ट लक्षांत येऊं शकेल.

## नरेंद्राचें संगीतज्ञान

या किन्नराच्या कल्पनेमुळे रुक्मिणी-स्वयंवर काव्याच्या पूर्वार्धांत

संगीताची जी पार्श्वभूमि नरेंद्राने निर्माण केलेली आहे ती विशेष विलोभनीय वाटते. पाखराप्रमाणे दिसणारा तो स्वरूप-सुंदर किन्नर व त्याच्या मागे उभे असलेले त्याचे ते श्रुतिधर यांच्या संमिश्र गायन-वादनामुळे भीमकाची सभा आश्चर्यमुग्ध झाली असल्यास नवल नाही. त्यांतहि, इतर भूपाळांपेक्षा श्रीकृष्णाचें जें विस्तृत वर्णन किन्नराकडून करविलें आहे त्याला या सुरेल संगीताची साथ मिळाल्यामुळे रुक्मिणीसारख्या भावनाप्रधान कुमारिकेच्या अंःतकरणावर याचा कसा परिणाम झाला असेल हें कल्पनेनेच ओळखणें बरें ! श्रीकृष्णाविषयीच्या भक्तिभावाने आधीच भारलेलें तिचें भाविक अंतः-करण त्या किन्नराच्या श्रुतिमंजुल स्तुतिस्तोत्रांनी उचंबळून येऊन तिच्या सर्वांगावर सात्त्विक भाव दाटले. ! हा परिणाम घडवून आणण्यासाठी नरें-द्राने केलेली ही संगीताची योजना अतिशय मनोहर वाटत नाही काय ? या प्रसंगाच्या निमित्ताने नरेंद्राच्या संगीत-ज्ञानाचीहि आपणांस पुष्कळ ओळख होते. रामदेवराव जाधवासारख्याच्या दरबारांत असलेला हा कवि संगीतशास्त्रज्ञहि होता असें दिसून येतें. कारण त्या शास्त्रांतील अनेक पारि-भाषिक संज्ञा त्याने यथार्थतेने वापरलेल्या आढळतात. स्वर्गांतलि संगीताला त्याने ' शुद्ध ' म्हटलें आहे. पाताळांतील संगीताला ' संकीर्ण ' नांव दिलें आहे आणि मृत्युलोकीच्या संगीताचा ' साळंग ' म्हणून उल्लेख केला आहे. हें कितपत बरोबर आहे तें मात्र सांगवत नाही. कारण असें वर्गीकरण शोधतांहि सापडलें नाही. रागाच्या स्वरूपावरून त्याच्या ज्या तीन मुख्य जाती झालेल्या आहेत त्यांना ' शुद्ध', 'सालंग' (छायालग) व 'संकीर्ण' अशीं नावें आज आढळतात, पण तीं स्वर्गांतील मृत्यु लोकांतील व पाताळांतील गायन प्रकार म्हणून नव्हे !

स्वर, श्रुति, ताळ, प्रबंध, षोडव, ग्राम, जाति, मूर्छना, राग, रागांग, उपांग, देशांग, भाषांग, ध्रुपद, ध्रुपदांग, अभंग, साळांग, वर्ण, गमक, छंद, रूपक, गीतखुड, हे निरनिराळे पारिभाषिक शब्द नरेंद्राने वाप-रले आहेत. त्याने ताळ सात नमूद केले असून साळांगें चार, रूपकें पन्नास वर्ण तीन, ध्रुपदांगें दोन व अभंग चार सांगितले आहेत. हे सर्व गायनशास्त्र-दृष्ट्या बरोबर आहेत की नाहीत तें त्या विषयांतील तज्ञांनी तपासून पहावें. भीमकाच्या सभेंत किन्नराने श्रीराग, देशाक, धानाश्री, मल्हार रामक्रि, गुर्जरि

आणि गौडी, इतके राग गाइल्याचें उल्लेख आहेत. किन्नराच्या मागे उभे असलेल्यांना त्याने 'श्रुतिकार' (१७८) 'सिकार' 'मांदळी' असें म्हटलें आहे. या श्रुतिकाराजवळ आधाटी, पहुंगें, निबंध, वाहो, जंतर, बिणा, आणि काहाळी हीं वाद्यें होतीं. यांपैकी आधाटीचें (वीणेचें) वर्णन १७३ व्या ओवींत आलें आहे. तेथील उथाळी, तुंबा, नाभि, सुधटी हे शब्द लक्षांत घेण्यासारखे आहेत. 'चार्की घालौनि' म्हणजे खुंट्या पिरगाळून 'जंताचा'= वाद्याचा (व स्वरांचा) मेळ बसवीत असत, म्हणजे 'सूर' लावीत असत. आणि नंतरच म्हणजे 'जंत्रा गात्राची मिळणी' पडल्यावरच सप्त–स्वरांचीं संमेळनें निर्माण होऊन गायनाला अपूर्व रंग चढत असे. नरेंद्राने उल्लेखिलेल्या गायकांत सारदा, कमळ, श्वतर, नारद व तुंबर यांचीं नावें येतात.

## 'वास्तूकले'तील कांही शब्द

या संगीतकलेप्रमाणेच 'वास्तु' कलेंतील शब्दांचेंहि ज्ञान नरेंद्राला असावें असें दिसतें. ५१ व्या प्रकरणांत 'धारा–दामोदरा' चें जें वर्णन आलें आहे त्यांत अनेक पारिभाषिक शब्द योजलेले आढळतात. विशेषतः खांब्र, निखंब, चउकटी, फळेथर, बाळाण, गवाक्ष, खण, सोळखणें, उंबरा, दारवंठा, दारमंका, कवाड, नाट, मुहुटी, गोपुर, भीतभंग, चांदोवा इत्यादि घराचे निरनिराळे विभाग दिग्दर्शित करणार शब्द; त्याचप्रमाणे त्यांतील शिल्पशास्त्राची कल्पना आणून देणारे घडिव, कांडारीव, गुंठीव, चिरीव वगैरे शब्द अभ्यासण्यासारखे आहेत. राजमंदिराच्या बाह्य शृंगाराचीहि कल्पना त्या उताऱ्यातील वर्णनावरून चांगली येते. त्याचें या ठिकाणीं वर्णन करून जागा अडवण्यापेक्षा तो उताराच वाचण्याची वाचकांना विनंती करतों म्हणजे झालें!

## काव्यांतील शब्द–संग्रह

वरील दोन परिच्छेदांवरून नरेंद्राने रुक्मिणी–स्वयंवर काव्यांत वापरलेल्या शब्द-संग्रहाची सहज कल्पना येऊं शकेल. संगीत शास्त्रांतील पारिभाषिक शब्द व वास्तूंतील शब्द; यांशिवाय आणखी अनेक प्रकारचे शब्द या काव्यांत आलेले आहेत. उदा:–७१८ व्या ओवींत आलेले लाटांचे प्रतिशब्द; ७१९ व्या ओवींत आलेलीं जलचरांचीं नावें; ७२० व्या ओवींतील होड्यांच्या

निरनिराळ्या प्रकारांचीं नांवें; त्याचप्रमाणे ८५ व ८६ या दोन प्रकरणांत आलेलीं अनेक वृक्षांचीं व वनस्पतींचीं नांवें पाहिलीं म्हणजे नरेंद्राच्या शब्द-भांडाराची कल्पना सहज येईल.

पण यापेक्षा, मराठी भाषेंतील शब्दघटनेच्या दृष्टीने या काव्यांत निरनिराळ्या भाषांतून आलेल्या शब्दांचें वर्गीकरण करून अभ्यास करणें फार उपयुक्त होईल. अर्थात, तसें करणें मला शक्य नाहीं. पण स्थूल मानानें प्रस्तुत काव्यांतील भाषेकडे नजर फेकली तर तींत तत्सम शब्दांपेक्षा तद्भवांचा व देशी शब्दांचाच भरणा विशेष आढळून येतो असें वाटतें. कंठमाळ; दळ; कल्लोळ; ओळगणी; उथाळीं; उपरवाळा; उपाळिंग वगैरे अनेक शब्दांतून 'ळ' काराचें प्राचुर्य आढळतें. हा 'ळ' मराठींत द्राविडी भाषांच्या संपर्कामुळे आला असावा किंवा प्रो. दिवेटिया, प्रो. कानो इत्यादिकांच्या मताप्रमाणे तो पैशाची भाषेच्या संपर्कामुळेंहि आला असणें शक्य[1] आहे. गण, ईश्वर, सिद्धी, विद्या, मनोरथ, कवि, दीपक, साहित्य, सारस्वत, रस इत्यादि संस्कृत तत्सम शब्दांप्रमाणेच ओखद, उसग, हियें, खेव, दिठी, मिया, माथा, विसावा, राउळ, माखा, वीज, चांद इत्यादि तद्भव शब्दहि पुष्कळ आढळतात. हे तद्भव शब्द बनत असतांना होणाऱ्या वर्णागम, वर्णविपर्यय, वर्णनाश, वर्णविकृति इत्यादि प्रकारांचीं उदाहरणें अनेक आहेत. तीं देऊन जागा अडवीत नाहीं. फक्त एकाच गोष्टीचा विशेष उल्लेख करतों. मागे वि. ज्ञा. विस्तार, नोव्हेंबर १९३४ च्या अंकांत प्रो. चिं. नी. जोशी यांनी 'मराठी द्राविडी संबंध व ज्ञानेश्वरींतील द्राविडी शब्द' या विषयावर एक विस्तृत लेख लिहिला होता. त्यांत त्यांनी दिलेल्या कानडी शब्दांपैकी पुढील शब्द रुक्मिणी-स्वयंवरांत आढळतात:—परी, कुसरी, चोखाळ, मिरविती, मातु, किडाळ, आ(सा)टोप, मीड, ओळगे, गुढा, चवी, पिलीं, पांकळ, पोट, पहुड, वोवरी, कहे, बाप, दाटी, वोडवली, नातुडे, पोळी, बोनें, सरी, कैवार, हुडा, परिये, बिढार, लोंच, पाळेगण, हडप व मेच. उब, उबारा हे शब्द मात्र तेलगू असल्याचें ज्यांनी निर्देशिलेलें आहे.

---

१. श्रीज्ञानेश्वरदर्शन. साहित्यखंड. 'ज्ञानेश्वरीकालीन मराठी व ज्ञानेश्वरीचें व्याकरण, हा श्री. ह ना. नेने यांचा लेख पहावा.

# श्रीपरेशाय नमः

## १

### श्री गणेश-निर्वचन

उमे शंकराचा कुमरू : कीं सांवों गणांचा ईश्वरू
तो सेंदुरें साडंबरू : गोरा मेरू जैसा १

तयाचां ठाइं सिद्धींचे सर्ग : नानाविधें वसताति भोग
तेणें आधारें देव अनेगें : मुरत्राडले २

दान–मंदाकिनीएंचेनि वोलें : विद्यांचें नंदनवन पाल्हैलें
दांतांचेनि तेजें–मूर्यें आटलें : विघ्न–तम ३

तेयाँ गणराजाचें उदार रूपडें : थोरपणें देव जिंतिले होडें
कवीसिं शब्दब्रह्मींची राणीव कोडें : जेणें पाळिली ४

गणेशें मनोरथँ मुद्रा दीधली : कविता पर्डीए सेश भरिली
तयं पुढां सारदा देखिली : सारस्वत–फळेंसीं ५

## २

### श्री शारदा-निर्वचन

ते देवी कवि-कुळ-दीपकू : कीं साहित्य–सृष्टीचा चाळकु
कीं सारस्वत–गंगेचा त्रियंबकू : कुमारि–वेशें ६

१ **म.** स्वर्ग. २ **द.** विद्ध. ३ **कख.** अंनग. ४ **कदम.** किनीचेनि. ५ **द.** विद्येचें. ६ **दम.** तया. ७ **द.** मनोर्थ. ८ **द.** पिदिये. ९ **द.** पुढें. **म.** * १० **क.** ना तो.

जियेचिया आंगाचिए वोपे : मोतियांचें लेणें हारपे
  घाटोगरियाची गवसणी घापे : पुजेचेनि मिषें ७
ते विद्याधरी कवणा वाखाणे : जियेचिया रूपाचें चांदिणें
  कवीसि दाखवी वोपणें : प्रमेयांचें ८
ते आदि-कुमारि विनोदें : महाकवीं नवरसांचें घिउंदें
  पेहें देउनि परिये दे : अनुहात शद्बीं ९
ते देवता तरि शद्ब-ब्रह्मींची : पुन विद्यावंती राया मुरारिची
  तिया सलगि देवाचिये भाटिवेची : दीधली सामग्री १०
तिया संतोसें वाइला : अमृताभिशेखु केला
  हातीं परियळु दीधला : रस-फळांचा ११
ते आपुलिया कृणवा महाकवी : नवरसांचे मेघ वोळवी
  सावायाचे दिवटे खोलवी : कवितौ-पुटीं १२
कवि चालती तेणें उजियेडें : वरि गुरु-कृपेचें आंजन जोडे
  तैंचि ठेवे दीसती चोखडे : श्रीकृष्ण-कथेचे १३

## ३

## कथारंभ

आतां परियेसा कथा-मुख : कैसी कवितेची रेख
  तुम्हां दीजैल आनंद-सुख : साहानुकेसी १४

१ **कख.** चिए. २ **द.** णासि. ३ **ख.** अनाहात. ४ **म.** परि. ५ **द.** तया सलगि केली. ६ **द.** मज. ७ **कखम.** संतोषें. ८ **ख.** ताचा अभि ९ **द.** मग १० **कख.** तिया. ११ **दम.** साव १२ **कख.** कविते. १३ **क.** पुटं. १४ **खदम.** जरि. १५ **क.** परिसै. १६ **क.** तुम्हासि.

श्रीचक्रधराचा वाणितां कीर्ति-चंद्र : [1]चढवीन सुखाचा समुद्र
जळसेन[2] करीन म्हणे नरींद्र[3] : सभेचे लोक १५

आदि-कवीचें बोलणें : वेदांवरि रचिलीं स्मृति[4]-पुराणें
परि सरि न पवेति[5] पवित्रपणें : श्रीकृष्णकथेसीं १६

आणिकें काव्यें नाटकें कथा : आख्यानें प्रबंध चित्र-गाथा
परि सरि न [5]पवेति सर्वथा : देवाचेया[6] पवाडेयासीं १७

श्रीकृष्णू परब्रह्म निरवधी[7] : येर अवतार ते प्रतिनिधि
अंशकळा अवतरती हे प्रसिद्धी : देव बोलती १८

या कारणें देवकी-नंदनेंसीं : आणिक देव न [5]पवेति सरिसीं
म्हणौनि[8] श्रीप्रभूचीं चरित्रें गोडसीं[9] : सकळ शास्त्रें [10]पोंतां १९

याचि कारणें शुकादिकीं आपण : ज्ञानाचें करूनि मेळवण
शब्द-ब्रह्म दुहिलें अदुहन[11] : काढिलें लीळामृत २०

तया[12] रस-कवींचे शब्द : चंद्र-कळेसी बोलती[13] वीद[14]
ते आइकतां निगे दोंद : क्षीर-सागरासी २१

कुंकुमांची वेलि लांबी : तिया[15] मुक्ताफळांचिया तुरंबी
तैसिया अक्षेरांचिया लोंबी : कविता-लते[16] २२

१ द. रस २ म जळ-शयन. ३ म. नरेंद्र. ४ क. अमृतापासौनि रसाळ ५ कखम. पवति. ६ ख. चीया. ७ द. निर्वधी. ८ खद * ९ कख. गोडिसीं. १० द. पाहातां. ११ म आदुमन. १२ क. तेया. १३ म. बोलती. १४ क. चीया. म. चीए. १५ कख. तिए. १६ क. लतेसी.

प्रबंधिचा झळके परिमळु : तेथ खांचनां होय मळयानिळु
सराउ दे पदाचा ढाळु : कामिनीं-कटाक्षांसी २३

साहित्य-सेवंतियांचां घाटौलीं : जे ग्रंथ-देवते वाति लाखोली
विणेया पासौनि तयाचां बोलीं : वोतो रंगु दिसे २४

उन्मेख-चंद्राचां तुषारीं : कथा-कापुरकेळीचां उदरीं
प्रमयांचा पोतास कवणे परी : निफजे जाणांलागी २५

कविता-कामिनीयेचा धरूनि हातु : भावो दोहीं आंगीं मळपतु
चाले साहित्य-साबरेयां आंतु : रसु खेडकुळिये २६

ऐसे आदि-कवीचे बोल : अमृता-पासौनि बहुगे रसाळ
वाढवीति आनंद दौंदिल : ब्रह्म-सुखातें २७

## ५

## वेदादि सकळ शास्त्रांना ईश्वरज्ञान नाही

तें महाकवीं मानिलें : जें जाणौनि देवां वाळमेले
तेथ येरां काइ बोलें : जे नेणौनि जाणते २८

जो श्रीकृष्णु वेदां नव्हे ठाउका : निरूता नेणवे तिहीं लोकां
तेथ काइ पाटा फुटे आणिका : फुलीएचेनि ज्ञानें २९

वेदां पायाळपणें आपुलेन : न देखवे कैवल्याचें निधान
तेयां निरूतें न चटेचि अंजन : सदैवां पर-ज्ञानाचें ३०

१ क. जेउता. ख. वोत २ ख. कर्पूर ३ कख पदरीं. ४ म. सुजाणां. ५ क. दोहा. ६ कखद * ७ क. देवासी. ८ ख. वेदां आगमां. ९ कद. फुळीचेनि. १० खद. तया. ११ क. सदैव.

शास्त्रें अभिमानाचां हाथियेरीं : रिगों न ल्हाति परब्रह्म-नगरी
तियें राहिलीं आखरीं : आनानि मार्गीं ३१

नांव--निकेया वक्तेयासी : नुमानेचि देवाचिया गुणांची रासी
ते काइ मवेवे मनस्यासीं : येकें मुखें ३२

## ६

## कवित्वाची रंकवृत्ति.

काइ पूर्ण चंद्र-मंडळ : पाहुनि सोळांके मुक्ताफळ
कीं अमृताचें हातजोळ : कुपी चरणोदकाची ३३

तैसें वेदज्ञा कवीसीं : मज प्राकृता केउती सरिसी
पुन सुख नाहीं आणिके कथेसी : मुरारी-वांचौनिया ३४

श्रीकृष्णांचां गुणीं जीविनला : माझा जिउ श्रीचक्रधरीं विनटला
तो आंतुल आनंदु वोसंडला : कवितेचेनि मिसें ३५

जें विरहिणींचां मनीं वसें : तें बोलतां होए आनारिसें
जें वाचितां ये रस-डोळसें : भाव-लिखित ३६

तैसें देवाचां गुणीं विसंवतां : मि बियाळ वोलें उसणंतां
भावो वोळखावा श्रोतां : प्रेम-गर्भ ३७

१ म. ह्राति २ द. आनान मार्गांनी. ३ ख. सोळवकें म. मोळवकें. क. सोळवालें. ४ द. म्हणौनि ५ द. वेदज्ञान ख. ज्ञानें ६ द. परि. ७ क.ख. धरामि. ८ क.ख. मिसें. ९ द. हो १० क. धर्ता ११ क.ख. आतां.

## ७

## श्रोते जाणते असले तर कवित्वाचें चीज होतें

जाण अवधारितु स्थानिचे : जे भावरीय शब्द–ग्रहीचे
ते नाणें पारखीतु यां बोलांचें : जें देशीं सरतें ३८
जैसें मेघांचिये जवळिके : जरि बापिये नव्हेति बोलिके
तरि भू–गोळकाची पव्हे उदकें : कवण भरिते ? ३९
तैसें कळाविदाचेनि रितु–राजें : सुरंग शद्ब कोकिळ कुजे
तया सुखाचिये सेजे : विसंवतिये रस–राजहंसें ४०
जाणिवेचेनि चंद्र-मंडळें : रस-समुद्रा भरितें चढें आगळें
यऱ्हवीं उपेखे वडवानळें : नेणिवेचेनी ४१
जरि रखु वोडवे शद्बवेधी : तरि नेणिवेचिया लोहातें वेधी
तेवीचि अमरा होति देहसिद्धी : कवितेसी ४२

## ८

## श्रीकृष्णचरित्र, मराठी भाषा व भागवत यांची प्रशंसा

आतां सुमन देतु अवधान : धुमकुसें साहित्याचेन
जग भोजें नाचवीन : आनंदाचां ४३
आधींचि जगा चंदन आवडे : वारि देवाचें अनुलेपन जोडे
तरि कवणां वालभ न पडे : तया सुखाचें ? ४४

१ द अस्था २ क. भाव–ग्राहीक. ३ दख. पाराखिति ४ द. बापये. ख. बापीए. ५ म. नव्हति. ६ द. सुरंगा शब्दीं. ७ क तैंचि. ८ क. होए. ९ द जरि १० क कवणांसि.

तेसें आइकतां श्रीकृष्ण-चरित्र : होय सकळ सुखाचें क्षेत्र[१]
वरि जोडे ब्रह्म-सुख पवित्र : ते मऱ्हाटी बोलैन ४५

जिये भाषेचिये रसवृत्ती : सा भाषांचे कुपे कीजेति[२] निगुती
ते मऱ्हाटी कवण[३] जाणे निरूती : जे रसांचें जीवन ४६

ते मऱ्हाटे बोल रसिक : वरि दावीन देशियेचें बिक
म्हणैन सव्याख्यान श्लोक : मिसें वोवियेचेनि ४७

चौदा विद्यांचीं रसायनें : असेखां धर्माचीं जीवनें
काढुनि ब्रह्म-सुखाचें वोनें : सुकें केलें भागवत ४८

तो[४] पुराणांतुल[६] आनंद-समुद्र : तेथ[७] दशम स्कंदु तोचि चंद्र
तें[५] चांदिणें सांधेन म्हणे नरिंद्र[८] : रुक्मीणि-सैंवर ४९

९

## कथामहत्त्व.

जे कथा साहित्याचें खिरार[९] : नवां रसांचें कुऱ्हेर
अनेगां भावांचें[१०] भांडार : कीर्ति उदार कैवल्याची[११] ५०

जे सकळ कळांची निधी : नानाविध्दां फळांची सिधी
सोपान-वल्ली प्रसिद्धी : सुख-स्वर्गाची[१२] ५१

१ म. सत्र. २ म. कीजति. ३ ख. कोण. ४ द. * ५ कख. तें. ६ म. °णांत. ७ द. तेथें. ८ म. नरेंद्र. ९ दकख. क्षिरार. १० दम. भाषांचें. ११ द. °ल्याचें. १२ मक. स्वर्गाची.

## १०

### भीमक-गुण-वर्णन.

सप्त दीपें धरणीं द्वापरीं : नव-खंड जंबू-दिपांचां परिसरीं
भारतवर्षीं राज्य करी : भीमकु वैदर्भ-देशीं ५२

तो सोम-वंस-शृंघारू : त्रिभुवनकीर्तीचा कुमरू
भीमकु राणीव करी उदारू : कौंडण्यापुरीं ५३

तो रावो तरि वैदर्भ-देशीं : पर प्रसिद्धी न माय दाहीं दिशीं
तैयाचेनि एकैकें गुणें सरिसी : कव्हणीं नव्हे ५४

धरणीचें धैर्य वानिजे : समुद्रही आगाधु म्हणिजे
जवं तों रावो न देखिजे : भीमसेनु ५५

बरवेपणें अनंगा न लोटे : नितीं तरि ब्रह्मेया नुल्हाटे
प्रतापें हीयें फुटे : वैरियांचें ५६

काइ सांघों तैयाचें भांडार : राँजभरा आले रत्नांचे डोंगर
भू-तळीं जालें सरोवर : दानोदकाचें ५७

रायाची संपति सांघों केसी : आँठे महासिद्धी जियेचिया दासी
ते लक्षुमीं उपनली जयासी : कुमारिपणें ५८

भीमांचियाँ गुणांचा मेळावा : खीर-समुद्रेंसीं करी चढावा
तो माणुंसपणें अधिकु जाणावा : सागरापासौनि ५९

१ **क.** °करीं. २ **द.** वर्षा. ३ **द.** तयाचिया येकें गुणेसीं : कव्हणांचि सरि न पवे. ४ **द.** आन° ५ **कद.** सांगों. ६ **कदम.** तयाचें ७ **मद.** राज्य° ८ **द.** सांगं. ९ **कखद.** अष्ट° १० **म.** °चेया.

जयाचा जावांइ श्रीचक्रधरू : कुमारि लक्ष्मियेचा अवतारू
नो भीमकु कैसा सांघों सुंदरू : मदनु नातु जयाचा ६०
तो भूपाळु तरि येके देशीचा : पुन कैसा नवलावो आइेचा
जें रावो आफाविलेयां ये चौदा भूवनांचा : जयांचेनि लेकरूवें ६१
हें चराचर जयाचां उदरीं : तो मुरारी पुजिला स्वेंयें करी
तया भीमकाची थोरी[3] : कवण जाणे ! ६२
जयाचिया यशाची थोरी : चोजवीतां चंद्र न पवे सरी
जऱ्ही कांटाळी घातली वरी : नक्षेत्रांची ६३

## ११

### भीमकाचा गृह-परिवार

ऐसी कौंडिन्यापुर नगरी : तेथ भीमकु रात्रो राणिवे करी
तया पाटाची अंतौरी : सुद्धामती ६४
तिये उपनले कुमर : रुक्मिया रुक्मबाहो रुक्मरथु वीर
रुक्मकेशु रुक्ममाळी सुंदर : हे पांचै जण ६५
या पांचां धाकुली : देवी रुक्मिणि उपनली
जैसी अमृताची पुतळी निगाली : चंद्र-बिंबौनि ६६

## १२

### रुक्मिणीचें वर्णन

ते तवं लक्ष्मीमीं जन्मली : वरि माणूस-पणां आली
तें रूप सांघों कवणीं बोलीं : श्रृष्टि आंतु ६७

१ खद्म. क्षीर. २ दम. स्वयं. ३ द. दान देतां थोरी. ४ क. राज्य. ५ द. अंतुरी. ६ द. ते° ७ द. °निया. ८ खम. लक्ष्मीचि. ९ क. °पणासि १० कख. सांघावें.

सुकु म्हणे "आइकैं परिक्षिता : रुक्मिणी आउवेचें रूप पांतां[1]
ते लावण्याची वेधवंती[2] अव्यक्त मज पांतां : व्यक्तीसि आली ६८

ते हृदय क्षीर–सागराचें : ध्यान करीत होतें देवाचें
तेंचि मूर्तीसि आलें साचें : माणूसपणांचिये[3] ६९

जो देवो धाला ब्रह्मरसीं : तो मानु दे जेथचेया अधरांसी[4]
तें मुख वानुं कवणेंसीं सरिसी : विस्वा–माझारि[5] ७०

पांतां डोळेयांचे भाव : ते मृगी[6]–कमळासि नाहीं बरव
ब्रह्म–सुख भोगावया दैव : कवणांसि असे ? ७१

रुक्मिणीचें राजसपण : जगीं वानीतसे कवण
परब्रह्म गार्हस्थ्य[7] करी आपण : जेणें रूपेंसी ७२

येकेका अवेवाचें बरवेपण : बोलतां विषया होइल मांजवण[8]
पुन साधूंचें घडैल दुशण : जऱ्हीं मुनी जाले ७३

ते जगद्वंद्याची अंतौरी[9] : आनिका वाइलांचिया परी
[10]उमेठां बोलीं सांघैन तरी : जाणतां कोपावें ना ! ७४

## १२

### कथेची शोधनी व रुक्मिणीचें सभेंत आगमन

भागवता–पासौनि पद्मपुराणीं : जें सैंवरें[11] बोलिजे रुक्मिणी
तेथ देवातें कीनरू वाखाणी : तें सांघैल नरींद्र ७५

१ ह. पाहातां. २. क.* ३ क. °पणाचें. ४ खह. अधर–निर्यासी. ५ हम. °माजी. ६ क. मृगीसि नाहीं. ७ ह. गारस्तै. ८ कखम. मेल्हावण. ९ ख. अंतोरी. १० ह. उमैठा. ११ कख. स्वयंवर.

जे सौंदर्ये श्रीकृष्णाचें घर रिगे : तें बरव बोलावीचि लागे
म्हणौनि भीमकीं[1] प्रसंगें : वानिन आतां ७६

ते रूपस भीमकी : अवसरीं[2] कन्हणीं येकी
सभे येताय कवतिकीं : भीमसेनांजवळी ७७

# १४

## रुक्मिणीचिया सख्यांचें वर्णन

सवें धाकुटियांचा थोवा : जैसिया पुतळिया साजिवां
कीं कुळदेवता लेपिवां : रती-मदनांचिया ७८

कीं चंद्र-सरोवरिचिया[3] यक्षिणी : कीं अमृताचिया विनीं
कीं मूर्तीसि आलिया जिनी : डोळेयांचिया ७९

कीं लावण्य-लोकिचिया विद्याधरा : कीं सुख-स्वर्गीचिया अप्सरा
ना ना ते अवयेव निगाले हाथियेरा[4] : अनंगाचिया ८०

दीसती[5] मुखचंद्र गोरे : ते जैसे चंद्राचे भाउ[6] सावधारे
लक्षिमिये-सवें धाडिले क्षीरसागरें : आंगवळेया[7] ८१

तिया आंगभारें चालती राजसा : हांसेनि उजळति[8] दाहि दिसा
दाटेति डोळेयांचां वळसां : सभेचे लोक ८२

कास्मिराचिये करंडिये[9] जैसे : भीतरिल मूर्ति प्रकासे[10]
पातळां[11] लुगडेयांतुनि[12] तैसे : आवएव दीसताती ८३

१ द. भीमकीयेचेनि. २ म. सरीं. ३ द. तिया. ४ म. हाति. ५ द. दीसेति. ६ द. भाव. ७ द. आंगवळियांसी ८ द. ळेति. ९ कख. करंडी. १० कद. दिसे. ११ क. पातळेया. १२ कख. लुगडेयांतु.

आंगीं रत्नांचीं अळंकरणें : कळावियांसीं माल्हाडी[1] घाति कांकणें[2]
झळकत ताडवनांचें लेणें : बिंबत कपोळीं ८४

ऐसी धाकुटेयांची मांदी : ते चालत राजसा बिदीं[3]
बोभातिया[4] अंदुचिया नादीं : अस्थानी[5] माजवीति ८५

## १५

## रुक्मिणीचें वर्णन

तयांमाजि रुक्मिणीचें रूप : जैसें सिद्धरसाचे[6] लेप
कीं चंद्राचें पूडिव नीकोप[7] : कांडारिलें ८६

कीं ते सुखाची सैंभ[8] : कीं परिमळाची अक्षोभ
कीं रूपासि आली भांभ[9] : शृंघाराची ८७

कीं ते युवन-मदिची अंबिका : कीं सौंदर्य-लोकिची तारका
ना तरि जन्म-पत्रिका : मन्मथाची ८८

कीं ते सौभाग्याची निधी : कीं बरवेपणाची आवधी
कीं सांवेव[10] दिव्य औषधी : वस्यकरणांची ८९

कीं ते कुळदेवता क्षिराब्धिचीं : कीं अधिष्ठात्री अमृताची
ना ते चंद्रकुळाचार्याची[11] : कुळेश्वरी ९०

तया मुखाचें[12] पांतां सारिखें : लाजा चंद्र हिंवांचा होउनि[13] उरेख
निळोत्पळें हिरेमाणिकें न देखे : आपुलां ठाइं ९१

१ द. माल्हाटा. २ क. टीयांचा. ३ म. पदीं. ४ द. बोवा ५ म. स्थानां. ६ खद. सिद्धि° ७ ख. निःकोप. ८ क. सोभा. ९ कख. भाव. १० द. साव्यव. ११ कखम. चंद्रकोळा १२ म रूपाचे. १३ खदम.

पांतां दिठीचें अनियाळपण : कमळदळें होति साधारण
जे कां मन्मथाचे बाण : भरंवसेयाचे ९२

आधींचि रूप गोरें सावळें ऐसें : वरि तारुण्यें आंग उटतसे
तेणें सपिंवळ छाया येतसे : क्षिरोदकासी ९३

आंगाचेनि उजळपणें : भांसळत ठिकांचें लेणें
म्हणौनि मोतियांचीं अळंकरणें : भीम-कुमरियेसी ९४

हातकडगां-पुढां हातसर : गळां मोतियांचें लेणें सविकार
कानिचे झळंबुके करीति बिरार : कृत्तिकांसीं ९५

मुख-चंद्र तें मदन-संजिवनी : शुक्रु मार्गो आला जांसनी
तैसें मोतीं मिरवे वदनीं : रुक्मिणीयेचां ९६

मोतियांचा भांगु मनकरू : जैसा शृंगार-गंगेचा अवतारू
आला जीवउं अनंग-तरुवरू : वांदें चंद्र-मौळीसीं ९७

रूप सुपाणीं चोख केसें : मागां वेणी रुळत दीसे
ते रोमावळीयेचेनि मिसें : पुढां दिसत ९८

केसें सुकुमार रुडें : पांतां दीठि कुचंबैल फुडें
हातउवां कोमाइलें आवडें : अमृताचिया ९९

कवणि आंगाची बरव : वरि तारुण्याची उवांव
मनातें भ्रमिति ते भाव : अव्येवांचे १००

१ कद. दृष्टीचें. २ क. उमटत असे. ३ मद. येतिसे. ४ कख. कुमरीसी. ५ द. मार्गे. ६ द. तो अमृत ७ खम. णीचां. ८ द. मनोहरू. ९ कखद. सागरू. १० क. सरळ ११ म. विंवत. द. बिंवताये. १२ कखद. दृष्टि. १३ द. पुढें. १४ द. हातोवा. १५ दम. जावंड. १६ द. हृदय. १७ क. मार्जिनी.

तिया मदनांचा गोसांवी लाचाविला : सावेउ[1] अनंगु जिवविला
तेया रूपाचा उठावा पहिला : तो कैसा सांघों ? १०१

## १६

### रुक्मिणीच्या सेविका

सवें कर्पुरिका हडपिणी : चंद्रिका चवर-ढोळिनीं
सिरँगिरी[3] धरी[4] बारिणीं : मयूरिका १०२

सुभावती काऱ्हेरिणीं : सुलोचना सांवांसिणीं[5]
ते सारा[6] अखरांची जाणीं : उचितमालती १०३

रत्नावती शृंघारिणीं : चंद्रहंसा अवसरिणीं[8]
दृष्टी[9] ओळगे मंत्रिणीं : सिंधुमती १०४

ते मदनकळा मुखरणीं : चारुरेखा[10] नाचणीं
सवें गमक चाळिती गानीं : सरस्वती १०५

जवळि भावकळनां सखी : आंगवळेकारी[11] ससिलेखी
आळि बोलती परिमळ मुखी : धाकुटेपणें १०६

तेयां[12] धाकुटेया आंतु : उचित-चंद्रिकेचा धरूनि हातु
देवांचेयां[13] रूपाची करीत मातु : भीमकी सभे येती जाली १०७

१ क. सावंव. २ कख. धारिर्णा. ३ द. धरि ४ द. धरीति. ५ द. मांवा. ६ क. मराक्षेरांची. ७ दम. अक्षरांची ८ द. अवस्वरिणीं ९ द. दृष्टीपुढां. १० द. रेषा क. रूपरेखा. ११ क सांजवळे १२ कखम.* १३ द. ँवीया.

## १७

## रुक्मिणीचा सभाप्रवेश

मांदी वोसारिती वोळगिणीं[1] : स्थानि-आंतु आली रुक्मिणी
जैसी वैराग्याची घेत सोधणी : दिवी अनंगाची १०८

रुक्मिणी आली राया जवळी : देखौनि स्थानी कोल्हांरीचि जाली
सभा सर-पंजरीं रिगाली : कटाक्ष[2]-सरांचां १०९

कुमरि आली राया-जवळिके : दोहीं[3] हातीं उचलौनि[4] भीमकें
उसंगिये बैसवीली कवतुकें : आळिंगौनियां ११०

भीमें तांबुळ दीधले[5] बाळे : नखें सरिसीं केलीं कुरळें
भेटी आलीं कनक-जांबूळें : तियें हातीं वोपिलीं १११

रायाचिये पालखतीचिये पालकीं[6] : अस्थानि-आंतु बैसली भीमकी
सभा-मृग गोविलें[7] पासिकीं : लावण्याचां ११२

श्रीकृष्ण-कीर्तीचें होइल आइकवणें : म्हणौनि कालिंदिया[8] केलें उपेणें
कटाक्ष-तरंगाचीं वळणें : तैसीं दीसताती ११३

कटाक्ष-सरोवरीं[9] उलळत : देवीचे नयन-मासे तळपत
ते आडिविया कातरी भेदित : जिव्हार कामुकांचें[10] ११४

१ कख. ये २ क. कटाक्षाचां ३ क. दोहों. म. दो. ४ म. उचलिली ५ क. दीधलीं. ६ कम. पह्लकीं. ७ क. गोवित. ८ क. कालिंद्रिया. ख. काळंद्रिय. ९ क. वर. १० क. कामि म. जळ-कामुकांत.

## १८

## भीमकाची विवाह-चिंता

रायें रुक्मिणी देखिली : मुग्धावस्था[1] रिगाली
मग प्रधानाची वास पाहिली : बोलिला[2] ऐसें ११५
" कुमरि होतसे उपवर : तुम्ही म्हणाल मांडु सैंवर
पुन होउनि गांवार : मागिलां रायां ऐसे ११६
कैवाडु रचिती साबडें : विज्ञान-बळें उगविती कुआडें[3]
अरि-रायांचां तोंडीं सूनि खांडें : नेति स्त्रीरत्न ११७
मग येरां पडे अवकळा : पाठीं लागोनि जुझे रायांचा मेळा
मरेति आबुलियेचेया सळा[4] : रणीं काम-पिसें ११८
येक विज्ञान-बळें विजय होती : परि कळाविदे नव्हेती
ते राज-कुमरितें भोगुं नेणती : क्षेत्रि-वांचोनिया ११९
कुआडेयाची आरिख गोष्टी : तेवींचि क्षेत्रियां होये हाततुटी
हे मज न साहावे कुटि " : भीमकु म्हणे १२०
" आहो ! कैवाडें जेणें जे लाधली : ते कवण[5] सुख पावली[6] ?
पुन हे आम्हां उमसों[7] नैये बोलीं : ते देवांचि[8] म्हणिपती[9] " १२१
तवं मंत्री संतोषले[10] : येकमेकां प्रधानेंसीं[11] बोलिले
देवाचें चातुर्य देखिलें[12] : तें कवण ठावो-वेव्हीं १२२

१ **द.** मुग्धा अवस्ता प्रगटली. २ **द.** तो ३ **क.** उगवे कुवाडें ४ **क.** ळा. ५ **ग.** कोणां ६ **कम.** पातलां. ७ **द.** उमनूं नये. ८ **क.** देव. **म.** म्हणावे. १० **खद.** संतोसला. ११ **खद.** संप्रधारेसीं बोलिला. १२ **खद.** देखता जाला.

तंव्हेळीं प्रधानें विनवीलें . " जी ! देवें भलें बोलिलें ! "
मग गुतियें धाडुं म्हणितलें : पाहों राजकुमर १२३

तंव [1]बोलिला भीमकु : " आमतें जो असे कवी-पैकु
तो [2] देशा धाडुं येकेंयेकु : विचारूं क्षेत्रियांतें १२४

तयांतु कुळेंक्षेत्रें [3] बरवा : तारुण्य-गुणीं करी चढावा
ऐसा वरू जोडावा : जो देवांसि दैव १२५

हे वीरु न मनी कव्हणातें : आपुलां टाइं हांसे रायातें
येका यादव-नरिंद्रातें : वांचौनियां " १२६

## १९

## कल्याण-कीर्ति भाटाचें आगमन

ऐसें रावो प्रधानेंसीं बोले : तवं अवस्वरियें जूहारिलें
हांत जोडुनि विनवीलें : वैदर्भेश्वरातें १२७

" देवा ! माझे होते बाहीरी : तेहीं निशाण आइकिले दुरी
ऐसे बोलिजंताए नगरा-भीतरी : जें नागारी येकु येताये " १२८

तवं भीमकु म्हणतु आहे : " हें आम्हीं आधींचि आइकिलें आहे
हा काशीश्वराचा भाटु भेटों येताये : कल्याण-कीर्ति " १२९

रावो म्हणे " आम्हां आंति कीर्तीचा पांगु : हा महादानी मागधु चांगु
यातें आणावेया करा वेगु : न्येयां सोळासें चौदंता " १३०

१. द. तेथ २. क. तो एकएका. ३. खद. कुळें क्षेत्री ४. क. यादवें-द्रातें. ५. द. मग° ६. खद. बाहेरी. ७. खदम. बोलेति. ८. म. म्हणताए. ९. खद. काशेश्व १०. क. आधींचि. ११. खद. न्या.

राया धाकुटा नर-पुरंधरू : सरादी-संगीत-सुद्धाकरू
हे दोघै साउमे धाडिले आदरू : करूनियां १३१

चक्रवर्ति[1] मानें बहुतें : भेटों आणिलें भाटातें
तया कीर्ति-मळयानिळातें : रायांचेया १३२

कल्याण-कीर्ति येताये अस्थानी[2] : तेणें भीमकु देखिला सिंहासनीं
जैसा[3] नक्षेत्रां-माजि गगनीं : पूर्ण चंद्र १३३

बंदीजनु देखिला भीमकें : साउमां बोलाविला जवळिके
मग पर्वळेयाचें[4] सिंहासन कवतिकें : घातलें बैसावेया १३४

## २०

## स्वस्ति-वचन

बहुत देखौनि दान-मान : माँगतेयाचें* संतोसलें मन
मग केलें स्वस्ति-वचन : हात उचलौनियां[5] १३५

प्रसंगें सोम-वंसु सांघितला : रायाचा यश-प्रतापु वानिला
भेटीसवें आसी[6] पढिनला : भीम चक्रवतीवरी १३६

भूपाळें उचितीं वारिला भाटु : तो म्हणे ' पुरेतेयाचा[7] पाटु '[8]
मग राया भेटविला किन्नरू जिभटु : दिव्य-रत्नांचा १३७

## २१

## रुक्मिणीचें रूप पाहून भाटास वाटलेलें आश्चर्य

मग नागारी भीमकें : रत्नें-सिंहासनीं[9] बैसविला जवळिके
तेणें रुक्मिणीयेचें[10] रूप [12]रसिकें : देखियेलें[11] पुढां १३८

१ क. °व्रतीतें. २ द. अस्छानी. क. स्थानी. ३ द. तों° ४ क. प्रवाळे° ५ क. °लुनि. ६ खदम. प्रशस्ती. ७ खदम. तयाचा. ८ खदम. रायासी. ९ क. रत्नासनीं. म. आसनीं. १० खदम. °णीचें. ११ खद. देखिलें. १२ क. नेटकें. * टिपणी पहा.

बंदिजनें देखिली भीमकी : मुग्धावय[1]सा म[2]हुरैली मोटै[3]की
पुन चांदिणें न माय तिहीं लोकीं : लावण्याचें १३९
तो म्हणे 'हें काइ सा[4]चोकारें रूप : कीं गाळिवां सौंदर्याचें लेप
[5]कीं कुमारि-पणाची घेतली खोंप : अनंगें रुद्रा-भेण १४०
कीं येथिचा नांतुडे कल्पु : [6]नेणिजे पूजाविधान जपु
सभावीं वरि [7]वज्रलेपु : डोळेयांचा १४१
मियां देशाउर केलें रासु येक : पुन हे लावण्यें नाइकिजे प्र[8]वृत्तिक
म्हणे ये[9] सृष्टी-आंतु काइ येक : न [10]देखिजे ? १४२
रुक्मिणीचेनि रूपें-गुणें : ऐसें न [10]देखिजे तिहीं लोकीं नाणें
वरि इये ऐसी असति लक्षेणें : जे हो[11]ईल आदि-पुरुषा १४३
देखे रूप-तारुण्य वोतवर : म्हणे इयें आझुइं नाहीं सैंवर
हे पाहुनि राय हीन वर : त्रि[12]भुवनींचे १४४
देखौनि अवयेव येकुकु : ठ[13]कला न ठके कवणु येकु ?
हे[14] वरी ऐसा तिहीं लोकीं अधिकु : कवणु असे ? १४५
इये देव अयोग्ये विद्याधरी : मागधु मनीं ऐसा [15]विस्मो करी
[16]जरि मुरारी इयेतें स्वीकारी : तरि दैव इयेचें" १४६
भाटासि बहु चमत्कारू जाला : तो वोळग देखौनि दु[17]णावला
मग म्हणे "ऐसा समर्थु नाहीं देखिला : रावो आणिकु" १४७

१ कख. 'मध्या. २ ह. मोहरली. ख. महुरली. ३ म. नेटकी. ४ ख. साचौ' ५ कह. सुंद' ६ क. तो नत्रे. ७ ह. हा ८ कख. प्रवर्तिक ९ खदम. * १०. ख दीसे. ११ कख. होए. १२ द. क्षेत्री १३ ह. हटकला न टाके. १४ द. इयेतें. १५ कखम. विस्मयो १६ कखम. * १७ ख. हिणावला.

## २२

## पाहुणचार व राजाची पृच्छा

मग भीमें पाहुनरू धाडिला बंदिराजा : लेणीं-लुगडीं देउनि करविली पुजा
धुळ झाडि-वन देशु दीधला सेजा : जिंतलेयां रायांचा १४८
भूपाळ कल्याण-कीर्तीतें पुसे : "तुमचें कुटुंब निकेनि असे?"
येरु म्हणे "निकेयाची दिवाळी दिसे : देवाचां दर्शनीं" १४९
येथ बहुत दिन येसि क्षोणिशु म्हणे : देशौनि कें केलें निगणें?
दिठें देखिलीं कवण कवणें? : आन हें पाखिरूं काइसें? १५०
आम्ही आइकों निरंतर : तुवां बहुत केलें देशाउर
कवण देखिले राय राजकुमर : कवणिये देशिचे?" १५१

## २३

## भाटाचें उत्तर व किन्नराचें वर्णन

तो नागारी सिहाणा गुणें बहुतें : तेणें नृपाचें मन जाणिनलें निरुतें
उपायें वरु पुसताये मातें : कुमारी-अनुरूप १५२
मग म्हणे कल्याण-कीर्ति : "आइकें भीमा! चक्रवर्ती!
मियां देखिली सप्त-दीपांवती : राये तेथिचे १५३
परियसें प्रसिद्ध मधुवन : तेथ हा किन्नरु करी वेदाध्ययन
यर्थाचें सांघतां आख्यान : विचित्र असे १५४
वेदघोषें केला रंभेचा अव्हेरू : तियेचेनि शापें जाला किन्नरु
हा तिहीं लोकीं राहाटे चतुरू : बोलीं वेधी देवांतें १५५

१ म. केली. २ क. कवणें ख. कवणी. ३ कखम. : ४ म. जापा
५ द. वेदध्यान. ६ द. याचें. ७ द. देवांरागांत.

रंभा उसरापु केला ऋषीसी : म्हणे "अंबिका-भुवनीं रुक्मिणी कृष्णासी
माळ घालील मुरारीसी : तें फिटेल किन्नर-कवच " १५६
हा मधुवनीं मज देवें भेटला : सारस्वत-मंत्र येणें दीधला
तेणें गुरु-प्रसादें सरता जाला : स्थानीं रायाचिये १५७
यासि आळती सारदा न पुरे : गातां गंधर्वांतें सांतरी स्वरें
कोमळ-खतुरांची आइणि पुरे : यांचा गाइवां १५८
नारद--तुंबराचां सादीं : हे नाहीं गमक--स्वरांची मांदी
या गातां तरंगाचिया नदी : चढती ऐतारा पैं १५९
हा बोलीं ब्रह्मेया नुमाने : याचां ठाइं आति शब्द-श्रुष्टीचें नाणें
ऐसें पाखिरूं नाहीं सिहाणें : पांजरां भू--गोळकाचां " १६०
मागधु रायासीं बोले ऐसें : " हा पक्षिया गरुडा--पासौनि दीसे
ब्रह्मेयाचिया हंसातें हांसे : आगिळाचा म्हणौनिया १६१
पृथ्वीचे भूपाळ पांतां प्रवीण : स्वर्गिचिया देवांपासि जाण
तो येणें मानाविला श्रीकृष्ण : सांपे द्वारकेसी " १६२

## २४

## किन्नराविषयीं सभेंतील लोकांचे तर्क

ऐसें बंदीजनु बोलिला जवं : किन्नरू गरुयतीं राहिला तवं
एकें म्हणति " नव्हे साजिव : पाखिरूं नव-रत्नांचें " १६३

१ **कख.** उश्राप. **म.** उशाप. २ **खदम.** * ३ **क.** उपदेसिला. ४ **द.** अस्थानीं. ५ **कख.** कोकिळा न पुरति स्वरें. ६ **द.** गमकेश्वराची. ७ **कम.** चढती ८ **कद.** * ९ **द.** पाहातां. १० **क.** पासि. **दम.** पासौनि. ११ **क.** केचा. १२ **द.** *

हा पवळेयाचा सुरेखु : नां तरि रत्नांचा सु-वेखु
कीं सैंभ[1] निगाला सपक्षु : रातोत्पळैनियां १६४

समट संध्या-रागाचें आंग : आठुवांचें जोडें हिरेलग
सर्वांगीं सैंभ श्लोकांचें वानलेग[2] : देवाचिये मुद्रे-आंतुल[3] १६५

कचणि ह्वाव आंगिची : आघात पायतळें कर्नकाचीं[4]
डोळां कांति निळोत्पळांची : अधर पद्मरागाचे " १६६

येकमेका[5] बोलती जाण : " किन्नरा[6] हें कैचें बरवेंपण
रूपें वाताये आण : अस्थानिसी[7] " १६७

## २५

## किन्नराचें स्वरूप.

भीमें विहंगमाची वास पाहिली : तवं तेणें क्षोभाची बुंथि सांडिली
जीवीं देवो धरूनि दृष्टि घातली : विर्दावंतावरी[8] १६८

मग आवघी देखतां सभा : पाख फडकुनि[9] ठेला[10] उभा
मागधु म्हणे " परियेसीं वैदर्भा! : आइति खेचराची १६९

माथां पाचेचा मुकुटु : कानीं कुंडलांचा जवटु
गळां यज्ञोपवित-हारू चोखटु : देवाचिये माळेतळील १७०

हातसरां[11]-मागां हात-कडगें : मुदियांची जोडीं ठिकलगें
तोडरीं बाहुलीं काढती अनेगें : अंगिका नावें १७१

१ ख. स्वयंभचि. २ कख. वाणे ३ कख. आंत. ४ क. नखांची. ५ कख. एकैका. ६ क. किन्नरासि. ७ कख. स्थानी रायाचिये. ८ क. विया ९ म. फडकारुनि. १० द. राहिला. ११ द. हातकडसरा

सर्वांगीं रत्नांची सोभा : निडळीं चंदनाचा टिळा उभा
परिवंटु दाटिला राजवल्लभा : फुटेयाचा १७२

हातीं हरिचंदनाची आधाटी : माणिकांची उथाळी दोहीं[1] सेवटीं
तुंबेयां[2] तळीं नाभि मुघटी : वोतिवे चंद्रकळेची[3] १७३

## २६
### गायनाचा उपक्रम

उभयां[4] ठाकौनि रायापुढें : सिकार खुणाविले सवंगडे
हात उचलौनि आसी पडे : जे दुभे मनोरथु[5] १७४

तें देखौनि तोखला रावो : तवं तेथ जाला नवलावो
आसी अर्थौनि[6] किन्नरदेवो : आळती करिता जाला १७५

तेथ लावण्य-मृगाचीं पाडसें : तैसीं भाटाचीं कुमरें डोळसें
धुरीं[7] उभी ठेलीं रूपसें[8] : वेदघोपा मागां १७६

येका हातीं आधाटिया पहुरें : निबंध वीहो-जंतर सुसरें
वाति विणा[9] गमक आखरें : कंठीं दाउनि १७७

आंग-उपांग दाविती काहाळी : चौकीं[10] घालौनि मिळेति जंत्राचा[11] मेळीं
श्रुतिकार होती मांदळी : वशिकाराचे[12][13] १७८

जंत्रा-गात्राचिया मिळनीं : पडत सप्त-स्वरांची वेणी
किन्नरा गातां गमकाचिया सोवाणी : गगनीं चढत १७९

१ क. दोहो. २ द. कुंबया° ३ क. °कळेमाजी. ४ कख. उभा. ५ दम. °र्थौतें. ६ द. अर्थुनि. क. आंतौनि. ७ कख. धुर. ८ कख. सरसें. ९ क. किन्नरा° १० खद. मागें. ११ खद. वाजांत्रें. १२ ख. कंठीं. १३ द. वैस्यकरणाचे.

## २७

## त्रैलोक्यांतील गायन-प्रकार

निसांदाचिए श्रुति वरी तारी : जयाचिया सादाची दिसे थोरी
तो वेदघोषु रूप करी : सुधेयासीं १८०

जे दोहीं लोकीं आइकिजे गाइवें : ते येथ आणिलें किन्नरदेवें
तैं लागोनि जाणती मानवें : भरत मृत्य-लोकीं १८१

दावित सुधेयाचें आंग : ताळ--प्रबंध--चोडव षडांग
ग्रामजाति मूर्छना राग : गाति निर्दोषपणें १८२

पाताळीं कमळ--स्वतरा गीतें : मदळसा जिववीली निरुतें
तें संकीर्ण गाइलें निगुतें : पन्नकें वर्धमान १८३

मग मृत्य--लोकिचेया आंगा : कैसें रूप केलें साळांगा
राग-रागांग-उपांग-देशांग : भाषांगेसीं १८४

सात ताळ च्यारि सौळांगे : पन्नास रूपकें आठांगें
तीनि वर्ण दोनि धृपदांगें : च्यारि अभंग १८५

ऐसा सौळांक मार्ग दाविला : तिहीं मार्गीं गीत-सुड म्हणितला
मग छंद गाउनि ताळ ठेविला : धृव-पदावरी १८६

पांतां सपोत आकासीं : कुंकुमाची वावडी वेल्हावे जैसी
किन्नरू आळती करिताय तैसी : मागिलां धूरांवरी १८७

१ द. निसानांदाचि. क. निसाणांचिए. २ द. गायत्रें. ३ क. सुधे°
४ म. शुद्ध ५ ख. खडांग. ६ द. नृत्यें. ७ द. निरुतें. ८ कख.
पाणिके. द. पानकें वर्धमानें. ९ क. साळंगा. १० क. साळंगें.
११ क. साळंक. १२ द. मागिलां धूरांवरी.

भीमें भूपाळ पुसिलें मागधातें : ते वेदघोषु सांघेल रागत्वें
तो वोवी-प्रबंधु आइकतु श्रोते : म्हणे नरींद्र १८८

## २८

## ग्रंथ-माहिमा व रुक्मिणीचें सौंदर्य-वर्णन

दाळिंबाचिये बियेप्रति जैसें : फळीं वेगळों रसु दिसे
ग्रंथिचीं अक्षरें पाहावीं सुरसें : नेणोंचि पाडें १८९

श्री-रागासि रूप करूनि : मग देशांक राग आळौनि
"राजिंद्रा! परियेसीं" म्हणौनि : पाहे देवी-येउतें १९०

म्हणे "ये श्रृष्टी जियेचें रूप : ते ब्रह्म-शक्ति केसी सांघों सरूप
परि भीमकियेची न पवे वोप : ते आरीख अपाडें १९१

रूपाचेनि जाइलेंपणें : संकराची अंतौरी वाखाणे
पुनु वारिली रागीटपणें : ते कुंमरि पर्वताची १९२

बहुतां बाइलांतु लक्षुमी रूपस : परि तिये-पासौनि हे डोळस
आन चातुर्य-गुणींही बहुवस : रती-पासौनियां १९३

सता यागाचें देज दिजे : मग तें रूप सहस्रां डोळां भोगिजे
ते इंद्रायणिही इयेपुढां न सुजे : जे मोलावली म्हणौनि १९४

जे सार्‍रा अखरांची गोसावीणि : रूपें पूरवी कंदर्पाची आइणि
तिये सौंरदेतें जींके रुक्मिणी : सुंदरपणें १९५

१ **कख.** वेगळाला. २ **खदम.** आळउनि. ३ **कखम.** विचारिली. ४ **द.** कुमारि. ५ **म.** सहश्री. **द.** रूपश्री डोळां. ६ **कख.** सराखरांची. **द.** सारा अक्षेरांची. ७ **ख.** शार°

आइकिजे दमयंती रूपसें : देव-नळ केले तणा-सरिसे
पुनु आंगा आलें अपेस : जे प्रियें सांडिली १९६

## २९

### रुक्मिणीला योग्य वर म्हणून देवांची अपात्रता

रुक्मिणीचीं पाहुनि सर्वांगें : जरि देवांची वरव सांगें
तरि तियें हाता-तोंडाचीं उपाळिगें : वीवसीये सारिखीं १९७

येकेका अंगा बहुतें तोंडें : हाताचीं फडतरें दोहींकडे
डोळे भूत--संचारा सांगडे : नाहीं निमिषोन्मिषें १९८

सारविलया दाराची पांति वास : उंबरेया वरिला सिताची करिती आस
तोंड सूंनि घेति घांस : आगि--आंतुल १९९

तोंडीं तृण-दर्भ सविजडें : तिळें-तुपें आंगें विसडे
देखिलेंयां वमन होये रोकडें : तेथ भोग काह्याचे ! २००

देव दीक्षितातें चाळविती : पोटभरी लागि सेरडुवें मारविती
चांग यागीं पशुवें मनुष्यें न म्हणती : तरि ते देवचि म्हणावे !

सुरां-पासौनि मानवी चांग गुणें बहुतें : देवकन्या वरिती माणुसातें
पुन यथिची नें टकेति घरवातें : अमराचिये " २०२

कैसेनि नोवरिये साजिवे : स्वर्गीं सासुरें सांघावें ?
तेणें पापें कें रिगावें ? " : म्हणे वेदघोषु २०३

१ **म.** °ळिंगें. २ **द.** वीवसियां सांगडीं. ३ **कख.** पाहाति. ४ **द.** वासूनि
५ **दम.** °लियां. ६ **मद.** *. ७ **कख.** पशू-माणुस. ८ **म.** न ठकेति.

## ३०

### पाताळांतील वरांची अपात्रता

“[1]जरि पाताळ-लोक सांघें : तरि तियें विखारें पन्नगें
आन आधी नाहींत आंगें : वोंविये--तळौटीं २०४

माथां फ[2]डेचीं जूंवाडें : विखाचिया ज्वाळा वमीति तोंडें
दोन्ही कान ना[3]हींत मुडें : आइकेति डोळांहुनि[4] २०५

पांतां गरळ चढे दृष्टी-सवें : त[5]यासी कवणें विखो[6] भोगावे
का[7]ळियानें पाटीं बैसावें : काइ राज--कन्येचां ? २०६

पाहुनि पाताळिंचे पन्नग : आन स्वर्गीचेही देव-संभोगं[8]
तया-पासौनि मानवी चांग : मर्त्य-लोकिंचे २०७

## ३१

### सप्त-द्वीपांतील वरांची अयोग्यता

मग संचरौनि धानाश्री[9] : रां[10]जेयातें म्हणे “ अवधारीं
भीम चक्रवर्ती विचारीं : भू[11]पाळ भू-मंडळिंचे २०८

भवताळे सप्त-दिपींचे राजे : ते सांघतां तुजपुढां लाजिजे
तेथ कांहीं घेपे ना दीजे[12] : रूपें ताडा--येसैनीं[13] २०९

१ क प्रतींत ही ओंवी नाहीं. २ द. फडेचीं. ३ कख. नाहीं. ४ द. डुळांहुनि. ५ क. तयासि विषय-सूख कोणें भोगावें. द. तेणेसी° ६ खम. विषय. ७ द. काळ°. ८ ख. सभोग. ९ द. °सिरी. १० कख. रायातें. ११ क. आतां° १२ क. ते तूं कांहीं घेइजे ना देइजे. १३ कखम. एवढी.

## ३२

### जंबु–द्वीपांतील राजे. उत्तरेकडील.

राया! सवाये[1] लक्ष जंबु-द्वीप परियस : दक्षणे वसती सोळा सहास[2]
  येरि उत्तरे स्वर्गभूमि वहुवस : सहश्र चौरासी २१०
वस्तिचां सेवटीं स्वर्गांचे[3] दारवठे : आरौते[4] गंधर्वांचे वसैठे
  तेथ देशें[5]--नगरें तेजिठें : किन्नर-विद्याधरांचीं २११
तेथ तिर्तर[6]-वर्ण तेजी वरवे[7] : ते संपतीं कैसें सांघावे
  पुन रूप–गुणें नव्हेति सुहावे : माणुंसां ऐसे २१२
आइकैं उत्तरे मानि[8]–सरोवरू : तेथिचा रावो गीत-संकरू
  जयाचा न व्हाति अवस्वरू : वटकी गंधर्वांचिया २१३
हटक[9]-देशिचा गुहिकु[10] : की पुरुशोत्तमाचा टंकु
  जयातळीं वोळगे देशकु : देवाचेया विदा[11]वंताचा २१४
दुरंद कंभोज भूपाळु : जयाचे वारू[12] सपक्ष अग्नि–ज्वाळु[13]
  रीखींचे[14] घोडे घन-नीळु : पोटीं वर्ण पुंसयाचे २१५
सींहपुरीचा चित्रायुधु : दधीचा कोसल[15] प्रसिध्दु
  जे काळेंसीं करीती उरोधु : समर-संहारीं २१६
जयाच्चिये धाडिचा धाकु यमा : जो त्रिगर्त देशिचा सुश्रमा
  जयाचेयां[16] प्रतापा नाहीं उपमा : तो रावो[17] उत्तर-कुमरू २१७

१ **ख.** सवावो. २ **ख.** साहस. **द.** सहश्र. ३ **द.** स्वर्गाचे. ४ **द.** आरुतं. ५ **क.** देश° ६ **क.** तींतीर. ७ **कख.** वरवे. **द.** स्वभावे. ८ **ख.** मानस. ९ **ख.** हाटक. १० **क.** गुह्यकु. ११ **कद.** विद्या १२ **द.** घोडे. १३ **मद.** जाळु. १४ **द.** रुषीचे. १५ **द.** कोशल्ु. **क.** कोशल्य. १६ **दम.** °चीया. १७ **क.** ते राये उत्तर कूळींचे.

जयाचे गंगे- पासि पवित्र ग्वांडें : उत्तमा आधोगती जो नइं बुडे
पतिता सर्ग होति रोकडे : जो पडे खड्गधारे २१८
कास्मिरीचा नादमूर्ती : जो संगित-रावो चक्रवर्ती
तेणें गुंपितें सेळ्द्री धाडिली होती : रुक्मिणीतें पाहावया
लोहित देशें-मंडळिचा : सेनाधिपु दीव्यप्रस्तिचा
जयातें कोंकसू पडे हातिएर्रांचा : मीपें प्रळयग्निचेनि २२०
वहीरगिरीचे बहु नरींद्र : हीमवंतीचे राजे सुंदर
जयांसीं सरिसे नव्हति रुद्र : सर्वदळें येकांकीं २२१
जेथ भद्रजाति[11] सारसीं : निहे[12] विसंवति आकासीं
ते गाजनेयांचेनि मिसें दाहीं दिसीं : मेघ ढेंकरू देताति
भौमांचा भगदंत सांवों केसा : क्षेत्री वेंझ वेति खांडेयाचा धारसा
जयाचा जाणोनि भरवसा : इंद्र आसन सांडी २२३
सप्त-मंडळिचे क्षेत्री : सूर्य कांपे जयांचा शस्त्रीं
वींध्य राजा भेण भूतधात्री : रत्नें वोपी राज्यभरा[13] २२४
वाहींळिकु पर्वतरावो : नेपाळिचा कीर्तिदेवो
ते दोघे देति सरावो : गरूडीं कस्तुरीचिए २२५
म्लेंछ-मंडळिचा काळयवनु : जो दक्षिण-रावो काळदमनु
तुडकानिचा वज्रादि-गहनु : असिवार-सिंधू २२९

१ म. पासाव. २ म. स्वर्ग. ३ द. गुर्ती. ४ कख. देश. ५ क. प्रस्तुतीचा. ६ द. खांडियाचा. ७ ख. नरेंद्र. ८ क. हेम ९ द. सरि नव्हे. १० द. सर्वदळेसीं. ११ कख. °देती १२ कख. नेहे. द. निहा. १३ क. राज १४ कख. आहा १५ द. कस्तुरियेचिये. १६ द. मल्लयळ.. १७ क. °सार्या.

जयाचेनि प्रतापें खरागलें : देवाचें हाथियेर आटलें
तया लोहाचें तळें बांधलें : खुरासनांसी २२७
लोकपाळां जयाचा पवाडा : तो दंतवक्र कैसा सांघों बळियाडा
कोपें काळाचा सवंगडा : भोगें इंद्रकारिका देसीं २२८
रश्मिजाळिचा कुंतिभोजू : जयाचा रथु सूर्यतेजू
महिष्मावतियेचा हैहय-राजू : नांवें महानिळ २२९
जया राजाचेया बाण-नयनां : धाडि घालोनि नंदनवनां
पूजा करीति अत्रिचेया नंदनां : दिव्य पूस्पीं दत्तात्रेया २३०
त्रिपुराचा प्रताप-लोचनु : जेणें बाहु-बळें जिंतिला इशान्यू
धृतराष्ट्राचा दुर्योधनू : तो रूपें हांसे श्रृंघारियातें २३१
तयां कौरव-रायाचें खांडें : तोडी रण-देवतांचे झगडे
नर-तुरंग-गज-सिंहाचे फुडे : संवाद सांघों न २३२
उजनियेचेनि वींदांनवींदें : समुद्रानें झाडा घेतला खोदें
येक अखंड-रत्नांचे नांदिये विनोदें : ठेविले महाकाळीं २३३

## ३२
## पूर्व आणि इशान्य दिशेचे राजे

उत्तरे हे राय प्रसिद्ध : सोम-सूर्य-वंसीं नानाविद्ध
आतां पूर्वेचे परियसें प्रसिद्ध : इस्यान्येसीं " २३४

१ **क.** खुरुसानांसी. २ **कम.** इंद्रकारदेसी. ३ **मद.** कौंति. ४ **कख.** महिष्या **म.** माहिष्मवतीचा. ५ **द.** करी. ६ **क.** °रारिचा. ७ **कख.** जया. ८ **द.** दडे. ९ **द.** स्वाद सांवेन. १० **मद.** वृंदानवृंदें. **क.** विधावृंदानदें. ११ **द.** खंड°

मग पडिघाउनि[1] मल्हारातें : “ अवधारीं ” किन्नरू म्हणे भीमातें
“ दिसांचे राय आइकैं निरूतें : साउमिल आतां २३५
इशान्ये वज्रकेतु क्षेत्री : जयाचा ज्ञानभैरउं मंत्री
तो रावो–वांचौनि नेणिजे धरत्रीं : कैळासा आरुता[2] २३६
कैळासाचां ऐलि[3] कंदरीं : विरा महेशाची[4] शोणितापुरी[5]
तेथ वाण विरिदें बोले सहश्र–करीं : भूतळीं सूर्यावरी २३७
सागर–संगमिचा अतिक्षेतृ : कांति–मंडळिचा राजपुतृ
जेहीं प्रतापें जिंतिला शतृ[6] : पाणियांतुल २३८
समूद्र–सेनु वंग देशीं : चंद्रायूधू रत्नकोशी
जयाचे रथ न माति आकाशीं : दाहीं दिशीं द्यावापृथ्वीयेचां
कोसें–देशिचा गरुडध्वजू : पौंड्रिकु–वासुदेवो चतुर्भुजू
जयाचेया दांडुगेपणाचा[12] माजू : घुमवी भूपाळांतें २४०
जयाचा बापु जगावरि तपे : राय रेवुळे दानाचेनि[13] वडपें
तो कर्णू कैसा सांघों स्वरूपें : जे विर्ये सूर्याचें २४१
राजगृहिचा जरासंदु : जेणें वैरियांचा झाडिला मदु
समुद्रीं वसविला मुकुंदु : यांदवेसीं २४२
निवटितां हस्तीची कुंभस्थळें : खड्गधारे बैसती मूक्ताफळें
तैसें मागधातें [16]प्रजितां उजळे : पाणिपद खांडेयाचें २४३

१ **क.** पडिघालोनि. २ **द.** कैळासारूता. ३ **क.** ऐलिए. ४ **कख.** महेश्वराची ५ **कद,** श्रोणिता ६ **द.** जातृ. ७ **क.** तपे ८ **क.** इती ९ **म.** अवकासीं १० **क.** कोशिक. ११ **कख.** पौन्ड्रीकु १२ **कख.** देवपणाचा. १३ **द.** दानोदकाचेनि. १४ **मद.** वांसीं. १५ **ख.** वीती. १६ **क.** पराजितां.

मणिपुरिचा रत्न-सेखरू : जयाचा वज्रबाहो कुमरू
तेणें कीर्ति-कळांचा राजभरू : घेतला चंद्रातें २४४

झाड-मंडळिचे क्षत्री सबळ : निखाड-दिपिचे पृथ्वीपाळ
जयाचा प्रताप वनवी पावळ : अरिराय मिसियांचे २४५

स्वर्ण-भूमिचा नरनाथु : मल्लदेशिचा वैरी-मन्मथु
जयाचे हाती मदें सींपिति पथु : येतां धारा-तीर्थांनि २४६

अयोध्येचा विरह--धवळु सुर्यवंसीं : राज्य करी देसोदेसीं
जयाचिया रूपाची लागली पिसी : देवकन्यां २४७

मळय-देशिचा मेघध्वजू : जो अरिराय अकाळ--विजू
वाराणसीचा काशिराजू : सुवाहो कीर्ति--चंद्राचा २४८

जेणें कासेश्वरें आपुलेनि कोपें : मळयाचळ विभाडुनि साक्षेपें
बावनेयांचा प्रासादु केला सांपें : विश्वेश्वराचां २४९

चैद्य-देशिचा दमघोकु बरवा : तयाची अंतौरी सुतश्रवा
तयाचा कुमरू तो सर्वांग-सुहावा : शिशुपाळु २५०

लेख नाहीं जयाचीया क्षत्रीपणा : तया चैद्याचा खड्ग काळियाना
धुधुवीए तो घोषु तेसना : न माय पेटारां भूगोळकाचां २५१

तेणें विंदाणियां-करवि सांपें : आणविलीं राज-कन्यांचीं रूपें
पुण मना येकही नैए स्वरूपें : तयाचेया २५२

१ द. °भारू. २ कख. स्वर्ग. ३ मद. मल° ४ कख. जयातें. ५ द. राजदेवकन्यांसीं. ६ दम. °रणविजू. ७ कख. काशीश्वरें. ८ द. °रासा. ९ द. सुश्रवा. १० द. नांवें ११ द. तो धुधुवात घोपू केसना.

महा-क्षेत्रीयांचेनि[1] अश्वमेधीश्वरें : [2]विरहे केलीं देवांचीं अंतौरें
मिथळे वीर जनकाचेनि कुमरें : कीर्तिरूपें कामु जिंतिला २५३
दशार्णवीं सु[3]श्रमा महावाहो : जयाचिया प्रताप-सूर्या विहे राहो
पंचाळ-देशिचा द्रुपदु खांडे[4]बाहो : जयाचेया घाया नें[5]व्हे वज्र "

## ३४

### दक्षिण दिशेकडील प्रदेश व राजे

रामप्रियेची दाउनि आस : म्हणे " वैदर्भ-राया ! परियस
दक्षण-देशिचे प्रदेश : क्षेत्री तेथिचे २५५
[6]अग्नि-दिसेचा अंगरागु : जो रत्नध्वजू अरिरा[7]ये-भंगु
जयाचेनि साजिवें अनंगु : कीर्ति-चंद्रें २५६
समुद्र-देशिचा कीर्ति-धवळु : जो वीर-सागरिचा मंथाचळु
पागारी त्रिमूर्तिचा त्रिकाळु : जयातें साळा सिंहांचिया २५७
मेखळा रत्न-रथांचा चंडु : जेणें दानवांतें घेतला दंडु
तयाचा गाति गीत-सुडु : किन्नर [8]पर्वतीं २५८
द्राविड-देशिचा भास्वतु : मळि[9]वाळिचा विक्रम-केतु
जयाचिया दळाचा नेणेति अंतु : गुप्तिये रायाचे २५९
पांडिय देशिचा दंडपाळु : जो भू-मंडळिचा लोकपाळु
तयाचीं ब्रिदें बोले मळ[10]यानिळु : नंदनवनेंसीं २६०

१ **कख.** °क्षेत्रींचेनि. २ **मद.** त्रिरय. ३ **द.** सुश्रु. ४ **कम.** पवाडे-बाहो. **ख.** खांडे-पवाडे-बाहो. ५ **क.** न न्हाए ६ **दम.** अग्ने ७ **द.** अरिराय-रणभंगु ८ **द.** पर्वतांचे. ९ **ख.** मळवाळिचा. १० **द.** °याचळु.

चौड--देशिचा महिपाळु : जो संग्राम--समुद्रिचा वडवानळु
श्रीशैळिचा सिंह्--सार्धुळु : चंड--विक्रमु २६१

जेणें आपुलेनि भूजा--बळें : चौदंताचे दांत उपाडिले सळें
ज्योति सिद्ध--वटिका केलीं देउळें : त्रिपुरुषांचीं २६२

मत्स्य--देशिचा विराटु : जो कोपें भरी पंचाग्निचा घोंटु
कांतियेहुनि[3] बिभीषणा[4] भाटु : धाडिला खङ्गायुधें २६३

तया खड्गायुधाचा[5] उदोदासु : जूंझेंवीण आरिरायां करी नाशु
मुख–चंद्रातें समोर सुची पाउसु : डोळां वैरी-वधुचां २६४

कावेर कैरळ करनांटकु : वज्र-विजयो सौभद्द[6] सुभटु
जेहिं गगनां लोहें बांधोनि घाटु : घोडे आणिले खेचरांचे २६५

चंपावतियेचेनि रत्न–सेखरें : असुरांचीं आणोनि भांडारें
मागते केले वेव्हारे : देशोदेशिचे २६६

द्राक्ष[7]–रामिचा संक-सेखरू : जो गुणीं[8] इंद्र–देशिचा मेरू
महि-मंडळिचा भूपाळ-भारू : तेजें द्वादसे आदित्य[9] २६७

वोडियानांचेनि काळ-कोपें : पाताळिचे फणि-मंगीं[10] जिंतिले दापें
अंध्र-देशीं पुजा केली वीरदपें[11] : देवां मोतियां अरि-गजांचां २६८

कर्णिकेचेनि रत्न-तिळकें : पृथ्वी पैरोविलीं[12] कीर्तिचेनि क्षिरोदकें
भद्र–नंदीस्वराचेनि सशांकें : प्रजिलें राहुवरी २६९

१ **म.** केर्चीं २ **कद.** राउळें. ३ **कखम**. कांतिये येउनि. ४ **द.** विशेषणांचा. ५ **कखम.** जया खङ्ग–केतुचा. ६ **म.** सुभट्टु. ७ **द.** डाक–द्राक्षरामिचा. ८ **कख.** गुर्णींद्र ९ **द.** द्वादशादित्यू. १० **क.** फर्णींद्र. ११ **द.** वैदर्पे. १२ **क.** पैन्हा

जया वीराची खड्ग-विजू समरीं : ते गाजतिसे मेघ रुधिर-धारीं
वरिखति[1] मोतियांचिया गारा थोरी : कुंभस्थळिचिया २७०

दंडकी-दंभोळिची[2] सांघनीं : नवसियें पुरवी रण-जखिणीं
वैरियांचिया अंतौरियांचिया वेणी : वाय ताड-वनांसीं[3] २७१

पंडुचे पांचै राजधर : जेहीं प्रतापें जिंतिले अमर
तयाचे वियोग करिती हाथियेर : दैत्य देव-कन्यांसीं " २७२

## ३५

### पश्चिम दिशेचे राजे

कैसा राहावला अवस्वरू : तवं गुजरिये रूप[4] करी खेचरू
मग म्हणे " परियेसैं क्षेत्रि-भारू : पश्चिमेचा २७३

तया परौतीं चौदासें[5] सिंगळें[6] : पाणियांतुले वेलाउळें
तेथिचेयां[7] रायां नाहींत कुळें : तें काइ सांघों ? २७४

नैऋत्यें महींद्र महाबाहो : जो त्यागें कनक-धारा-प्रवाहो
तो रायांचा बोलिजे सनाहो : दक्षिणे महिमेचेयां[8] २७५

गंध सुगंध क्षेत्री कोंकणे : जेहीं वसंतु जिंतिला सुमनपणें
तयांचें आजि पाहे पडैल घालणें : मेरूवरी २७६

शृंगार कडिवळु जयाचेया सौंदर्याचा : तो श्रीमंतु सुवर्ण-पागोरियेचा[9]
चंद्र जिणे मांजि डोळेयांचेया येशाचा : तो भद्र कोळ-गिरीचा

१ **कदम.** वरुशेति. २ **क.** दाभो ३ **मद.** ° वनेंसीं. ४ **कखम.** रूपं.
५ **द.** चौदा. ६ **क.** गवळे. ७ **द.** तेथाचिया. ८ **क.** दाक्षिण मंडळिचेया.
९ **कख.** पागारीचा.

जंबू-खंडीं जयंताचिये गोटीं : रातली इंद्रायेणी[1] धाकुटी
विजयो वसे समुद्राचां गोठीं : कीर्ति-धवळु २७८

जयांचिये थोरिवे लेखु नाहीं : पर्वत बूडाले दानोदकाचां डोहीं
तयाचा आला होता संधि-विग्रहीं : भिमकिये लागी २७९

जयांचीं उदकावरि चालती घोडीं : तो चंद्रसेनु समुद्द भोगी दोहीं थडीं
तेणें कीर्तीची सारिली खडी : दिग्गजोंसी २८०

सिंधु-देशिचा मणिराज कैसा सांगे : जयाचीं रत्नां-सारिखीं सर्वांगें
जेणें घोडे न्हाणिले गगन-गंगे : तो विक्रांत ज्योति-गिरिचा

अभीर कार्तिकाचा रोहिंतकु : जेणें पैजा सांडविला मृगांकु
मेरू-मंडळीं बहु-धान्यकु : जयाचां काळु आंकणा २८२

सौरठीं ब्रह्म-वंशीं सौरें-वीरू : जो कामने-विन जिने कल्पतरू
सैल्य समुद्र-देशेश्वरू : गुणीं हांसे कळाविदांतें २८३

जो वैरी-वधु-आसुआंचा काजळीं : राजादेश जयाचा विलोळीं
लीहुनि धाडिजे[7] पर-मंडळीं : आणवि सप्तांगें २८४

पुस्करांचेनि खड्ग-विचित्रें : रायाचिया ललाटीं लीपीचीं पत्रें
फाडुनि वरि वानि दिजेति पत्रीत्रें : रणभूमि चतुर्विधें २८५

अरी-राय गज-दंतांचा कोदंडीं : बानि मेघांचीं मोतियें पाडी
मैत्रें[11] मुरारि-लागि पाउड धाडी : तो रत्नायुध महाराष्ट्रिचा २८६

१ खद. इंद्रायेणीची. २ क. वरी. ३ द. सिद्ध. ४ द. सौंदरू. म. सुंदरवीरू. ५ क. सुरल्य. ख. सरल्य. म. सल्य. ६ क.खद. * ७ कदम. धाडिती. ८ कदम. आणविति. ९ कख. रंचेनि. १० क.ख. भुंजं. ११ द. मैत्रियें.

शोभाचें[1] सैन्य न माय भूतळीं : म्हणौनि तो [2]रावो वसे अंतराळीं
जयाचीये थोरिवे नव्हति कांटाळीं : नव-ग्रहांची " २८७
ऐसे सांघतां भूपाळु : परि देवींचिया मना न येतीचि अळुमाळु
तेव्हेळिं[3] कीन्नर-राजें देखिला ढाळु : डोळेयाचा २८८

## ३६

## यादववीर बळराम व श्रीकृष्ण यांचें वर्णन

मग म्हणे "परियेसें[4] क्षत्रि आणिकु : जो मांझा[5] जीवीं वसताये येकु
तो श्रीकृष्ण[6]रावो यादव-तीलकु : द्वारकेसी " २८९
तवं सभा जाली सन्मुख : भीमकी राहिली अभिमुख
वैष्णवित्रियें[7] रूप केलें सविशेख : गौडिया अन्येर्गा[8]-विधां २९०
"भीमा ! परियेसीं सोम-वंशीं रावो : यदुकुळीं सूरसेनाचा वसुदेवो
जयाचा जन्मीं मंगळाचा उच्छावो : जाला तीहीं लोकीं २९१
तया वसुदेवाचे कुमर : राम-कृष्ण लावण्य-उदार[9]
जेहीं अडखुले केले असुर : धाकुटेपणीं २९२
ऐसे तीहीं लोकीं नाहींत क्षत्री : गगन कांटाळ जयाचा शस्त्रीं
तयातें रात्रि-दीसुं[10] नेणिजे छत्रीं : ओळगनेयाचां २९३
तेथ श्रीकृष्णा-वडिल बळिभद्र : जो प्रतापें बोलिजे महा-रुद्र
तयाचा बखळी[11] मुख-चंद्र : आंधार सांतीयाचां २९४

१ ख. सांभाचें. २ कख. वीर. ३ क. तेथ. द. मग. ४ द. परियेसीं. ५ द. मांझीये. ६ ख. चक्रवर्ती. ७ द. वैष्णवें. ८ कख. अनेक. ९ द. सुंदर. १० द. देव. ११ द. जयाचा बखोली.

जो नागराचेनि दांतें : उखळौनि[1] घाली भू–गोळकातें
तया बळभद्राचें बळ निरुतें : कवण जाणे ? २९५

जयाचेनि प्रतापाचेनि तेजें : हीमवंतीचें हीम वोथिजे[2]
तया पाझराची गंगा बोलिजे . भूतळीं भागीरथी २९६

बळभद्रा धाकुटा श्रीकृष्ण-रावो : जयाचा कडिवळु मदन–देवो
तयाचेया हातियराचा अनुजावो[3] : ढुलवी अमरांतें २९७

तया श्रीकृष्ण-चक्रव्रतिची थोरी : वानिते[4] वेदें[5] जाले नागारी
पुन कांहि-एक भीमा ! अवधारीं : सांघैन तुज २९८

## ३७

### श्रीकृष्णाची थोरवी

तो राणिव करी समुद्राचां गोटीं : पुन आज्ञा वसे अमरांचां मुकुटीं
देवाचा अवस्वरू[6] न ल्हाति भेटी : ब्रह्मादिक २९९

देवाचें दादुलेपन सांघों केतुकें : श्रीकृष्णें काळ गीळिले असिके
महाकाळ बांधिला पासिकें : एका गुणाचेनि ३००

तया प्रभूची राणिव काइ बोलें : तीन्हि लोक जीयचे घरकुलें
तीय नोळखवे बाइले : जयाचें[7] थोरपन[8] ३०१

आपण भोगी समुद्राची गडे थोडी : पुन राय ओळगति संपन्न कोडी
सुरवर तेतीस कोडी : चाळक जयाचे ३०२

१ द. उचलौनि. क. उळथौनि. २ क. उथिजे. ३ द. वावा. क. चिवो.
४ कख. वानितां. ५ कख. देव. ६ द. °सर. ७ मद. तयाचें.
८ मद. रूपन.

जयाचेनि प्रतापें खरागलें : हों[1] कां गगन काजळैलें
सूर्यासि तीव्रपण आलें : तेणें तापें ३०३
कवण बळ जाणे श्रीकृष्णाचीया बाहु : जयाचेया खांडेया बिहे राहु
रायांचे प्रताप-सूर्य [2]गिळिले बहु : कीर्ति-चंद्रेसीं ३०४
तया पर्वाचां सर्वग्रासीं : पीडा होताय अरी-रायाचां वंसीं
आलें दैत्यांचिया अंतौरियांचि[3] रासी : तिथें व्राति[4] ताडवनीं
श्रीकृष्णाचेनि नांवें अविधा[5] सळे : तेथ कें पुतनेचा पाडु अबळे
जयाचेनि प्रपंचाचें डांग[6] उन्मळे[7] : तेथ काइसे यमळार्जून ३०६
जयाची वोसाइली गिळी[8] ब्रह्म-गोळकु : तिये ठाइं केउते काग-बक
जो देवो अज्ञानाचें मारांक : तेथ कें अघ[9]-तृणावर्तू ३०७
जेणें श्रीकृष्णें जमुनेचां पोटीं : तोंड फाडूनि काळया सूदली घाटी
तो काळचि थडियाविलीं[10] पाटीं : तेणेंचि[11] मिसें ३०८
देवें खेळतां लागें येकें : ब्रह्मेयां डोळेलांसु लाविला नोकें
[12]गोवळें वांसरुवें दाविलीं मायकें : लिळा-लाघवीपणें ३०९
प्रभूचेया दादुलेपणाची सिग : देखौनि दाढैले दैत्य-पतंग[13]
कंसाचें उभयांचि फुटलें आंग : हात न लवितां ३१०
काइ-एक सांघों श्रीकृष्णाचें करणें : अंतकावरि घालुनि घालणें
बाळु दिधला गुरु-दक्षणें : संदिपनिचा ३११

१ ह. हं काज गगन कोळसेलें. २ ह. गीळी. ३ कखम. यासि. ४ कख. वाहाति. ५ क. अविसळे. ६ म. दांग. ह. डांक. ७ म. उमळे. ८ क. मोडी. ९ क. अंध १० क. थडिवां लाविला. ११ क. बोळेनि. १२ ह. मग १३ क. पनग.

देवाचेया दादुलेपणाचा उबारा : न साहेचि[1] सातांही सागरां
भेणें वोसरौनि राजभरा : दीधली द्वारावती ३१२

अशुकळा संखा दैत्यालागी : मीन-रूपें सागर लपविले आंगीं
तेथ श्रीकृष्णें जमुना केली दों भागीं : तें काइ सांघों ? ३१३

येके शक्तीचा खेळु : कांसव-वेषें धरिला भू-गोळु
तेथ सांवरी चेंडु गोपाळु : हें बोलतां लाजिजे ३१४

वाराहांची[2] घेउनि आवगेणी[3] : अशें येकें धरिली धरणी
तेथ काइ वानुं श्रीचक्रपाणी : उद्धरिला गोवर्धनू ३१५

प्रभू अवतरौनि कोडें : जे जे केले पवाडे
ते बोलतां परब्रह्म जोडे : म्हणौनि भक्तें[4] वानिती ३१६

तियें श्रीचक्रधराचीं चरित्रें : जरि सांघेन विचित्रें
तरि रस-भंगु होइल पवित्रे : साउंमीली[5] कथे ३१७

देवाचिया दानोदकाचिये धारे : राय सप्तांगेंसीं जाति पुरें
तियें कीर्तिचीं तारकाक्षेरें : सासिनी[6] गगनाचां " ३१८

ऐसा करितां अवस्वरू : रस-रंगें धाला गगन-सरोवरू
मग रूप करिताय खेचरू : नाटें चतुर्विधें ३१९

## ३८

### श्रीकृष्णाच्या सौंदर्याचें वर्णन

जैया[8] श्रीकृष्णाचेनि बरवेपणें : पांतां[7] ब्रह्म-सुख ठेंगणें
तेयिचें[9] लावण्य कवणां उमाणे : मापें भू-गोळकाचेनि ३२०

१ ह. साहावेचि २ ह. वऱ्हारार्चा. ३ ह. गवसणी. ४ म. मुक्त. ह. मुक्ति. ५ ह. साउमिले कथेसी. ६ क. सासीनलीं. ७ कद. पाहतां. ८ ह. तया. ९ कदम. तें.

सौंदर्ये चंद्रासारिखें मुख : कमळा–पासौनि डोळे सुलेख
आजानु–बाहु सुरेख : विशाळ वक्षस्थळ ३२१

उदरीं त्रिवळीचें लक्षण : कवण माजाचें मोटकेपण
घणवट कटिवा करिताए माजवण : मदन-सुखासी ३२२

सुवटा मांडिया भरिवां : कैसिया पोटरिया आटिवा
काइ सांगों चरणांचा मेळावा : जें जन्मस्थान तीर्थांचें ३२३

जो देवो संसारातें उसासी : महा–मोहाची ली पुसी
तो श्रीकृष्णू दानवांतें कासी : हें बोलतां साबडें ३२४

पांतां ठांण मांजोळें : पुन लावण्य श्रृष्टी–वेगळें
तिहीं लोकांतें माजविती डोळे : वेल्हाळपणें ३२५

कैसीं सावळीं सर्वांगें : तेजें इंद्रनिळातें म्हणेति उगे
आंगिचेनि प्रेमें लक्ष्मीं वोळगे : नीळोत्पळांची ३२६

देवरायाचें देखौनि मुखवटें : कृष्ण–पक्षीं चंद्र दिहीं–दिहा तुटे
तेवींचि लाजा हियें फुटे : मिसें कळांचेनि ३२७

श्रीकृष्णांचिया कटाक्ष-धारसां : पडत वेधांचा वळसा
तेथौनि निगावा नाहीं मानसा : मुनेश्वरांचिया ३२८

मुख प्रहसित कैसें : सुश्रीकें माधुर्ये रसें
कपोळ-प्रभे[13] कवळी होत असे : स्मित-चंद्रकेंसी ३२९

१ **द.** °पसि. २. **क.** निकं° ३ **द.** अजान ४ **दम.** करी. ५ **द.** सुभटा. **क.** एवेट. ६ **द.** लाजिजे. ७ **कख.** माजोळें. ८ **खम.** आंगीचें प्रेम. ९ **क.** °ळेसीं. १० **क.** दिहं दिहें. **द.** दिसा दिसा. ११ **ख.** मुनी° १२ **कदम.** सुस्मित. १३ **क.** पऱ्हे. १४ **द.** होतिसे.

आंगीं बाळ–वयसा असे : परि लावण्य तिहीं लोकांवरि दिसे
जयाचेया रूपाचेनि प्रकाशें : [1]भासळोते चंद्र-सूर्ये ३३०
तें देवाचें सौंदर्य वानुं कैसें : जें मदनु अपत्य लाहिला[2] आंपेसें
रूपाचा वेधु नारीसि असे : तैसाचि मुनेश्वरां[3] *३३१
की ते[4] सुखाची मूर्ति चोखडी : कैसी ते[5] जगीं तेजाची गोडी
अमृताची चवि होय ताटकाटी[6] : तें बोलणें पाहुनियां ३३२
रूप रत्नांतें[7] घे वरिवं : देखौनि पशु-पक्षियें होति लेपिवं
तें कवणां वाखाणे[8] बरव : जयाचां नामींचि वेधु ३३३
सौंदर्य देखौनि ऐतार : श्रीमूर्ती वेधले मुनीश्वर[9]
तिहीं लोकिंचिया रिगों पांति[10] घर : परि तो स्वीकरी ना ३३४
कुमारी तापसा दीक्षिणी : वेधें भूललिया चक्रपाणी
तेथ पाठीं धावति गौळणीं : हें काइं बोलों ३३५
लक्ष्मिये-पासोंव[11] बहुतें बरवी : चंद्राची कुमरी माधवी
ते सांपें सौभाग्य मीरवी : म्हणे ‘मी देवा दीजैन[12]’ ३३६
सीते-पासोनि सावियां[13] सुंदरी : सूर्याची कन्या कालंदी[14] कुमरी
ते तप करी जमुने-भितरीं : राया मुरारि–लागी ३३७
ते वेधाची मूर्ति सांघों[15] कैसी : कामिनीं रमतां प्राणेश्वरेंसी
हृषीकेशु न धरी मानसीं : ऐसी कवणि असे? ३३८

१ **खदम.** °ळति. २ **म.** जाला. ३ **म.** मुनी * **कख** प्रतींत ही ओवी नाही. ४ **कखम.** * ५ **दम.** * ६ **द.** तोकडी. ७ **~.** रत्नाचें. ८ **द.** वाखाणवें. ९ **क.** मुने° १० **कद.** पाहाति. ११ **कखम.** पासाोन. १२ **द.** देइजन. १३ **द.** सावेया. १४ **कम.** कालिंदी. १५ **कम.** साांगों.

तेसा वरवा नाहिं रूपें : आन कोण्हांची चाड नाहीं स्वरूपें
पुन देवीचीं विदावंनें गेलीं सांपें : तयां मानु केला ३३९
देवी रुक्मिणी-सवें : **मदन-मुद्रा** नांचौं सीकली नवें
तें बहुतें आदरें आइकीलें देवें : आम्हा असतां ३४०
वेळु एकु मुरारि-पुढां नारदें : देवीचा प्रवंध गाइला विनोदें
तैं लागौनि देव-रावो मानु दे : कविते भीमकीचिये ३४१
भीमकीचिया लावण्या उदारा : जरि सुंदरू जोडे नोवरा
तरि याचि एकि इश्वरा : केलें आराधना " ३४२

## ३९

## किन्नराची प्रशस्ति व बोळवण

ऐसें श्रीकृष्णातें कीन्नरें वानिलें : तेणें सभे सुखाचें भरितें चढलें
सर्वांगीं सात्त्विक दाटले : रुक्मिणीचां ३४३
चंदनाची आंवधि कुवारी : बाणें कांपली राहे वरिचावरि
तैसी ते राजकुमरी : देवाचीया अवस्था ३४४
भीमराजें देखौनि तो भावो : उचितीं वारिला किन्नर-देवो
मग म्हणे " सुघडपनाचा नवलावो : नाइकीजे तीहीं लोकीं
श्रुति-स्वर-ग्रामजाति-गमक : यकेकिसीं उपजेति अनेक
जैसें आंळवसावतक सशांक : गरूडीं संध्यारागाचिये ३४६

१ द. कव्ह्‌मा...। २ क. बहुत मानु. ३ कदम. नांचौं. ४ कद. कविता भी...ाचया. ५ क. केली. ६ म. कोवारी. ७ द. रस. ८ क. आळ सारकुट. ख. आळ सारस्वत. म. सारुवंत.

नवल राग[1]–रंगाची विनी : आणीचि[2] रंगीं रसाची जिनीं
वेगळीचि रसीं माधौर्याची[3] अक्षोणीं[4] : अनुपम्य हे ३४७

साधु सत्यलोकां–पासुनि दिसे : सुमेद गातें आंग कैसें
रस–रंगें ब्रह्म–कटाहो होतुसे : सपोत कुंकुमाचा ३४८

अवस्वरू सरला[5] कीन्नर–नायका : कैसी स्थानी[6] ठकली आइका
जैसि कां देवसभा आली या लोका : पायारी गगनाचां[7]" ३४९

ऐसें रावो सरादिसीं बोले : खेचराचें गातें अंग देखिलें[8]
तेवींचि बोलीं रूप दाविलें[9] : सुंदराचें[10] ३५०

रावो म्हणे "दैव आहे आम्हांसीं : जें वेदघोशा ! तुं यथ आलासी
तेवींचि रायां[11] जाणविसी : तिहीं लोकिचेया" ३५१

भीमें भाटासि दिधले हाथि–रथ–घोडे : देश नगरें भांडार चोखडें
बहुवेस[12] लेणें–लुगडें : नाना[13]–परिचीं ३५२

चौहाताचें छत्र[14] कापुरू : देउनि तोखवीला नागारी किन्नरू
भीमकिया त्यागा हातसरू हारू : दीधला मनोभावें ३५३

## ४०
## भाटाचा आशीर्वाद व निरोप

मुरारी वसे देविचां मनीं : तो वोळखिला हारें पूजौनि
हा भावो वेदघोशें जाणौनि : म्हणे "पावसी चिंतिले[15] मनोरथु

१ **द.** रागासी रंगाची. २ **द.** आन रागींचि. ३ **कखम.** माधु. ४ **कख.** आक्षोपणी. ५ **द.** सारिला. ६ **द.** अस्थानी. ७ **क.** पायरिए गगनाचिए. ८ **द.** अंग केसे. ९ **क.** दाखविलें. १० **ख.** सौंद. ११ **कखम.** रायांत. १२ **क.** बहुसाल. १३ **क.** अनेगे परींचे. १४ **द.** [illegible]. १५ **द.** चिंतिल्या मनोर्थातें.

देवी ! तझी देती आस कडे : घरी कल्पतरू कामधेनु बापुडें
चिंतामणि फडुं सिकला सांकडें : तुझेया हाता-तळीं ३५५

भीमा ! तुझीये हानसुटी : सर्व कनकाचळ उठी
भूतळींचे राय लागेति मुठी : तुझेया खांडेयाचिया ३५६

आपुलिया ठाया ये मागतें : असतां अव्हेरिती अदाते
अपकीर्तिचां डोहीं बुडेति ते : तोडिजेति कुटिचा–मांसा

जे मानाचां सिंहासनीं : पात्रें पुजिती प्रतदिनीं
तयांचेनि यशें सांर्दात गगनीं : कळा चंद्राचिया ३५८

राया ! तिहीं लोकिचीं मागतीं : तुवां अनार्त ”केलीसें हातीं”
यावरि वारिलें भीम–चक्रवर्ती : मागधातें ३५९

तेणें भाटा बहुत चमत्कारू जाला : मानु करूनि पक्षिया पाठविला
मग सर्व संप्रधारू केला : तो सांघेळ नरींद ३६०

## ४१

## रुक्मिणी श्रीकृष्णास देण्याचा भीमकाचा विचार

खेचराचा देखौनि अवस्वरू : स्थानीं विस्मो जाला थोरू
मग बोलिला वैदर्भेश्वरू : प्रधानेंसीं ३६१

“तुम्हां कुमरी-लागि न जोडे वरू : आमुचेनि पुण्यें आला कीन्नरू
तेणें सांघितला क्षेत्री-भारू : भू-मंडळिचा ३६२

१ **द.** [illegible] २ **कखम.** लागति. ३ **क.** माथां. ४ **क.** सांघति. ५ **द.** केलीस. **म.** करिसीस. ६ **कखम.** तया ७ **क.** आडा. **म.** डाव.

ते पृथ्वीपाळ सांघतां : कव्हणी न येचि देवींचेया चित्ता
परि श्रीकृष्ण-रावो वाणितां : उन्मेख जाली ३६३
जरि देवा देवों म्हणिजे : तरि तो करील कीं न करी हें नेणिजे
आणीक तो कहींचि न पविजे : कव्हणी-परीं" ३६४

## ४२

### रुक्मीने केलेली कृष्ण-निंदा व शिशुपाल-प्रशंसा

ऐसें भीमकु बोलें स्थानीसि : तवं रुक्मिया होता रायापासीं
तो प्रदीप्त हृदये-कमळासि : रुक्मिणीचिया ३६५
जो रुक्मिया मुकेया एका : उचितीं महा-मेरू वेची आसिका
तो कल्याण-कीर्तिसि त्याग नेदीचि कां : जें कृष्ण नावडे पाखंडीया
तो हांसौनि रुक्मिया बोलिला : म्हणे "वेदघोशु रुशी शापिला
तैं लागौनि हा विथानकेला : जल्पे भलतेउतें ३६७
किन्नरू जें झकवी पिसेंपणें : तें तुम्ही मानां ऐसें सिहाणें
श्रीकृष्णांसि त्रिक चढवां वायांविणें : गोवळासी ३६८
तया जाति ना कुळ अनोखळीं : नेणों मायेबापु वाढविला गौळीं
वायांचि ठसा चढविला गोवळीं : माणूस-पणांचा ३६९
तो वेद-शास्त्रां वेगळा स्वरूपें : निर्गुणु काळा ऐसा रूपें
मामां येकु मारिला सांपें : घरिचां घरीं ३७०

१ कद. °चीया. २ द. अंगिकरील. ३ कखम. आणि. ४ कखम. *
५ द. बोलिला अस्थानीसि. ६ क. अग्रदोशु. ख. दोषु. ७ द. विथानकला. ख. विधानकेला. ८ क. झाकवे. म. झाकवे. ९ द. सेहाणे. १० कखम. वायाणें. ११ क. मायबापेंवीण वाढिनला गोवळीं. १२ द. गोकुळीं. १३ द. गोपाळीं.

अफ्रोटें त्रिदें पढवी सैंग : कव्हणांचिया खांडेया न मेळवी डांग
आणिक तया मोटें आंग : जे चाळवी रुशी-भार्यांतें ३७१

कव्हणींचि आबुली न ठके पासीं : विसडाउनि गोळनी देति त्रिवर्सा
तेव्हळिं सडिवा फेडिलें तुळसियेसी : अंठवरपणाचा ३७२

तो गुणांचा नव्हे गोवळु : तयां पासोनि नोवरा शिशुपाळु
जेणें तोडरीं वातला काळु ? आमोलेपणें ३७३

तो सिंहाणा स्वरूपें बहुता : कुळें क्षेत्री उदारू जाणता
तेणेंसा रावो नाहीं पराजिता : ये मेदिनी–माजि " ३७४

## ४३

### विवाहाचा निश्चय व आमंत्रणें.

ऐसा रुक्मियें शिशुपाळु बहुतु वानिला : तो भीमकें भिडाचि मानिला
मग दोघीं संप्रधारू केला : जैवळिकेंसीं ३७५

रुक्मिया पाटाचा कुमरू : तयाचिया बोलाचा करूं नेये अव्हेरू
भांडारी रत्न-सेखरू : आणूं धाडिला शिशुपाळातें ३७६

यावरि भू–तळिचेया रायांसि मुळें : पाठविलीं भीमें भूपाळें
आणविलीं रुशी–कुळें : आदरेंसीं ३७७

१ द. त्र्यफ्रुटें न. आपोंठें. २ **कम.** विसडानी. ३ **क.** छेदिला. ४ **म.** दंदें ५ **कख.** आमुले° ६ **द.** सेहाणा. ७ **कम.** * ८ **कद.** प्राजिता. ९ **नखम.** * १० **कख.** °लेसीं. **म.** लासी.

## ४४

### रुक्मिणीचा शीण

किन्नरासि श्रीकृष्णातें वानितां : भीमकी वेधली अनावस्था
    जैसी कोमाइली कल्पलता : जीवनें–वीण ३७८
जयानें जिवीं वाहे भीम–कुमरी : तो रुक्मियें वाळोनि मुरारी
    शिशुपाळु मानविला वेरी : तो सिनु कैसा सांघों ! ३७९
जैसी पद्मिनी उवा उकडे : वरि विटाळाची वोसोंइ पडे
    नां तरि जोहरीं सांपडे : तैसी ते रुक्मिणी ३८०

## ४५

### रुक्मिणीची विरहावस्था

रायें सूचना दीधली : म्हणे " लक्ष्मी चेंवा देउं केली "
    मग रुक्मिणी पाठविली : रांज–भूवना ३८१
देवी निगाली रांज–भुवना : सवेंचि आंग धरेचि ना
    मग सखियांतें टेंकौनि, सुंखासना : वेळघली ते ३८२
विरहावस्तेचा उठावा पहिला : कवणातें न ढुळवी वहिला
    आन श्रीकृष्ण हा दादुलेयांचा दादुला : मोल्हाती मुनेश्वरांतें
देवो असे जयाचां जिवीं : तो जरि जाणता अवतरवी
    ते अवस्था कवणातें न ढुळवी : कांइसा पाडु अबळेचा ३८४

१ द. किन्नरं. २ दम. वाळुनि. ३ कम. सांगों. ४ दम. वोसाईली. ५ खदम. जोहरीं. ६ द. तैसें झालें तिये रुक्मिणीसि. ७ द. भीमकी. ८ द. लक्ष्मी. ९ क. निज १० द. उठिली जावया. ११ [illegible] राउळगणा. १२ क. सोकासना. द. सुका १३ द. वळघली ते. १४ गद. मोलांची १५ ग अंतरवी. १६ द. तेथ

वारिणीं साति मेळवी आइका : धाकुटिया चढेति वारूवां वारिकां
विश्वास[2] विकार गाढिका : सवें चालताती ३८५

भिमकाची आण वाउनि बटिकी : येकमेकां हांसेति रायांचिया लेकी
तयांतें म्हणताये[3] भीमकी : राजगुरू कळाविदांचा ३८६

" उपरू लाहिजे जयाचें साचपण : तेणें कहीं न वाइजे आण
आणेचा तो वाटावो आपण : साहिजे माणूसपणांचा " ३८७

दांडिये चढौनि भीमकी : बनियेचा राउळा आणिली झडकी
तेथ सेज झाडिली बटकीं : सेजवळेचां[5] ३८८

## ४६

### रुक्मिणीला मूर्छा व सख्यांची गजबज

दांडिये वरौनि[6] उतरतां : पाइ पाउवा न लेतां
विकळ आंग न धरतां : भवंडि आली ३८९

गजबजली बाळा तेथें : येकी आंगेंसीं धरिती[7] माथें
डोळे झांकितां न झकती तेथें : पालवें वीजिती[8] ३९०

क्षेणु येकु स्वस्त जाली : आंतु माचेयावरि बैसविली
परियेळें वोवाळिली : राजनितीं[9] ३९१

विडे देवविले सकर्पुर : भोइ पाठविले सविकार
वांजिए[10] खंड सावासिए पढियार : ते राहिले दारवठां ३९२

१ क. °वीली. २ म. विश्वासकार. ३ म. वारि° ४ द. वाहिजे° ५ क. सेजवळां. ६ खदम. वरुनि. ७ क. धरौनि. ८ द. वीजिताति. ९ क. नदरत्नांचीं. १० द. अखंड वाजिय धांवत सावासी पढियार.

विदावंताचिया धाडिया : त्याग देउांने पाठविलिया
खुणां तांबूळें देवविलीं [1]सखियां : हडपिणीं करवीं ३९३

## ४७

### सावध करण्याचे उपचार

कवाडें घा[2]लौनि अर्ध उघडीं : चोळी ढि[3]लौनि आंग मोडी
पालउ सरिसा करौनि तांबूळ सांडी : बहु आ[4]ळोसु आंगीं

पाय धुनि दाटिले चिं[5]नांसुकें : मुख झळंबिलें कापुरोदकें
गु[6]ळळा करविला हंसोद्धकें : कर्‍हेरिणीं ३९५

मा[7]गां टेंकली मालती : वारा घाली गंधावती[8]
हडपीणि दुस्मरें विडिया देती : फोडी ओळगौनि ३९६

कापुराचें बुगवें केलें पुढारें : तंव आ[9]गळें अवस्थे जालें चेइरें
तेथ पडिमठें[10] गाइलें पंचम स्वरें : [11]तेणें आंग धरेचि ना ३९७

देवो आइकिला स्थानीं : तैसीचि वैदर्भिये लागली उन्मनीं
जैसी परब्रह्मींची [12]वियोगिनीं : नेणे रात्रि-दिवसु[13] ३९८

ते सेजेवरि लोटली बाळा : देखौनि धाकुटिया होति व्याकुळा
म्हणेति ' काइ इये वेळोवेळां : फोडि लागताये ' ३९९

१ क. दीधली स्वकीया. २ खदम. घालुनि. ३ क. ढिली होउनि. ४ क. आळसु. ख. आळस्य. ५ द. अचिनां ६ क. गुरळा. ७ द. आंगेसीं ८ द. म्हणौनिया. ९ द. आगळेंचि जालें अवस्थेचें चेहरें. १० द. पडवाविलें. ११ कखद. * १२ म. ते योगिनी. १३ कख. या प्रतींत ३९८ पूर्वी ३९९ वी ओवी आहे.

## ४८

### सख्यांचे तर्क

कीं इये काहि यकु जाला संचारू : कीं व्याधी उपनला अंतुरू[1]
कीं मागां[2] राउळें दीन्हला[3] कापुरू : तो तेला नुतरेचि[4] ४००

कीं इये पाइरउ जाला रुक्मिणी : कीं कुळ-देवतेची अक्षेपणीं
कीं दिठीचीं[5] जाली झडपणी : अस्थानिये आंतु ४०१

कीं सभे-आंतु जाला निरोधु : [6]कीं कन्हणाचा उपनला वेधु।
कीं रुक्मियें घेतला उरोधु : तेणें सिनली हे ४०२

धाकुटिया विचारू करिती ऐसा : म्हणेति "राउळातें त्रिनउं कवणिये भाषा
काइ भीतरि जाणउं आउसां : कीं सांघों सुवैद्या-पुढां" ४०३

## ४९

### रुक्मिणीचें निवारण

क्षेणु येकु स्वस्त जाली डोळस : मग वरौती पाहुनि वास
म्हणे "तुम्हां रोग लागले असोस[7] : तरि जा वैद्यापासीं ४०४

तुम्ही किरू सिंहाणिया मजपसी : परि वायां चाळवा नां रायासीं
नाथिलें असुक सुवाँ[8] नाँ[9] मातेसीं : सुधामतिये" ४०५

१ **ख.** आतुरू. २ **कख.** मघां. ३ **कखम.** दीधला. ४ **कखम.** उतरोचि
ना. ५ **कखद.** दृष्टीची. ६ **क.** नां तरि. ७ **कखम.** बहुवस. ८ **द.**
सेहा ९ **कद.** * १० **द.** आणाल.

## ५०

## भावकळनेचा तर्क व विरहोपचाराचा आरंभ

तवं भाव-कळना सुंदरी : कोपौनि[1] म्हणे " ठाका बाहिरी
देवियें येवों द्या वो वोहरी : सिनली असे " ४०६

अवएवीं सीरे ऐसा विल्हळु : तो फुटा पांगुरविला पातळु
जैसा कळिकेवरि परिमळु : कनक-कमळांचीये[2] ४०७

पाय चुरी चंद्रिका धाकुटी : पद्मावती हळु हळु थापटी
परि अवस्थेची न धरेचि चटपटी : गोविंदाचिये ४०८

देवीची देखौनि पीडा चढती : भावकळना कळिनलें[3] चित्तीं
इयेसि आणिकु बाधा नाहीं नीरुतीं : विपायें[4] अवस्था नव्हे

भीमका-जवळिके[5] आतां : किन्नरासि भूपाळ वाणितां
मन्मथ-नाथ आला ईयेचिया चित्ता : ऐसा भावो दीसतु[6] असे

जरि इयेतें पुसों म्हणे : तरि हे लाजैल मुग्धपणें
आणि आपुलेन सिहानपणें : आमतेंचि झांकवील[7] ४११

ऐसें भावकळना विचारी : म्हणे " हें जाणिजैल इयेचि परी
आपैसर्यांचि[8] विरह-उपचारीं : प्रकट होईल " ४१२

ते प्रधान-कुमरी सीहाणी : उचित-चंद्रिकेसी बोले खुणीं[9]
" तूं सरिसें करी पां साजणी : धारा-दामोधरें[10] " ४१३

१ **खदम.** कोपौनि निनिलिया बाहेरी. २ **क.** °ळांचा. ३ **क.** कल्पळोक चींती. ४ **क.** वाचे अवस्तेचेन. ५ **क.** जवळि. ६ **खदम.** देखिला. ७ **कद.** हासैल. ८ **कद.** आपसैयाचि. ९ **क.** क्षेणां एका १० **मद.** °दर.

दळवैनी दीधली सुचना : ते नरेंद्र सांघैल रचना
जेणें वेधु [1]लागैल मना : सुमनांचिया ४१४

## ५१
## धारा-दामोधराचें वर्णन.

तेथ चंद्रकांताचिये चौरसे[2] विहिरी : रत्नी खेडकुळीया सावरीं
हीमाचें दामोधर[3] रचियलें कवणी परी : उदकावरी ४१५
हीमावतीयेचें[4] आटीलें हींव : तें दळवाडें काढुनि चिरीव
दामोधर[3] केलें[5] कांतीव : हीमोदकाचें ४१६
तें हीमाचें काम चोखडें : माजि मळयजाचें दळवाडें
तयाचें [6]उभिलें हीमवंताचेनि पाडें : सोळ-खणें[7] ४१७
तेथ वोलेर्या[8] चंदनाचे खांब : चउकटी[9] फळेथर[10] निखंब
कीं बहु बाळांणा[11] घडली भांब : कळाशांखांची[12] ४१८
कैसीं गवाक्षें खणोखणीं : [13]तैसीचि विचित्रें बाळाणी
तेथ विसंवे[14] ते राणी : श्रीमंताची ४१९
एकैकी[15] भूमकेची बरव : अगराचे[16] उंबरे घडिव
दारवंठा दार-संकी[17] कांडारीव : कंदर्प[18]-केतकीचे ४२०

१ ख. उपजे. २ द. चोबारी. ३ कख. दर. ४ दम. हीमवंतीचें. ५ द. रचिलें. ६ द. उभाविलें. ७ कखम. सोळा खणांचें. ८ द. वोलें. ९ क. चौपटी. १० द. थरी. ११ द. बाळाणीं. १२ द. शाखांची. क. कळासांचिया. १३ कद. भवतीं. १४ क. विसांवे. १५ द. एकिकि. १६ ख. आगराचे. द. आंग-रागाचे. १७ कम. दार-वंड. १८ क. कर्पूर-केळीचे. म. °केळीचे.

आवघा खणीं आनानि कुसरी : वोळेया श्रीखंडाचीं[1] कवाडें दारीं
बाउलिया[2] वरी ठेविलिया सविकारी : नाटारंभीं ४२१
कमळ-कळिकांचिया गुंठिवाँ[3] : चहुंकडे मुँहुटिया[4] बहुळिवां
मदळसा पुतळिया सभोंवा[5] : कनक-जांबुचिया . ४२२
चौपसीं चंदन-शाखा-सल्लोली[6] : गोपुरीं ठेविली[7] पत्रवल्ली
सोळा खणांची आइत केली : जैसा मांचु कैळासिचा ४२३
अमुरियाँ[8] मोतियांची हिंवाळीं : आवघां खणीं झळकती सोवाळीं
ते[9] प्रभा देत असे कवळी : चंद्र-करेंसीं[10] ४२४
कापुर-कस्तुरी-कुंकुम-रंगें : काम-कळा चित्रें[11] अनेगें
[12]तिथें पाहावया अनंगें : सांडिलें दादुलेपण ४२५
फुलांचे वोवरे खणोखणीं : आंतु पाणि-तुळिया कवणीं
पाचिचां भिंत-भंगीं वाणीं : कुसुम-कळियांची ४२६
कंदर्प[13]--केतकीची विचित्रता वरी : चांदोवां सुमनांची कुसरी
कमळाचे झुळुंबुके चौमेरीं : येकेंचि पाडें ४२७
कैसीं पाणियाचीं कामें वोतिवें : साचा मुराली केदारिचेनि हिंवें
येकें वोडवलीं स्वभावें : सिद्ध--रसाचीं ४२८
तेथ भूमिका पायें दडपे : तेणें गर्भिची पाखाल चिरपे[14]
तें उदक वरौतें निगे चेपें : भरे पोकळे[15] रुपीं ४२९

१ द. चंदनाची. २ खदम. बाहुलीं. ३ दम. गुंफिवा. ४ द. मोहॅ.
५ खद. साजिवा. ६ ख. कल्लोळीं. क. सलोळीं. ७ क. कांडारिलिया.
८ द. अमुरिवा. ९ खम. तेथ. १० क. °कळेसीं. खम. °करासीं
११ खम. विचित्रें. १२ कखम. ते. १३ कख. कर्दम. १४ क. निरपे..
१५ द. पोकळी°

आंतु सोने-केतकीचें[1] आल्हातें : उदकाचे हाथी ठेविले तेथें
पाणियांचिया धारा सुटेति प[2]-हाते : सोंडीं[3] येकमेकांचिये ४३०

मृणाळ-सुता पासौनि[4] सपुरा : चहुंकडुनि सुटेति धारा
येरीचां वेंझां[5] येरी सुभरा : भरेति सुत्रें ४३१

धारांचे दाटेति सायार : परि झगटौनि[6] फुंटेति तुशार
जैसें भूमीं उदकाचे गुढर : तेसें तें धारा-दामोधर ४३२

वरि कमळ-कळिकांचे कळासे[8] : माजि सोने-केतकीचीं हंसें
माथां मोतियांचेनि कळसें : जिंतिलें[9] चंद्रातें ४३३

तिये वसंतिय रितुचें[10] भीमकें : कुमरीलागि केलें[11] कवतुकें
जैसें मंदाकिनीचें भोज असिकें : आनिलें या लोका ४३४

कीं हिमवंताचें लेणें कोरिव : कीं वरुणाचें विमान वोतिव
नां तें राउळ-गण कांतिव : जळधराचें ४३५

कीं तें पंच[12]-सरोवराचें[13] भांडार : कीं महानदीचें वसुवार
ना ना तें हों काज कऱ्हेर : सकळ-सुखाचें ४३६

कीं तें परिमळाचें देव्हारें : वरि मन्मथाचें चवरें
कीं ते सोळीखांचें[14] साबरें : चंद्राचिया ४३७

हिमांचें देखौनि दामोधर : सियें सूर्यो कांपे निरंतर
हों काज विजूसि वाजतुसे दांतौर : मिसें गांजनेयाचेनि[15] ४३८

१ द. अव्हातें. २ क. पाराहातें. द. परहातें. ३ खम. तांडीं. ४ द. पसि. ५ द. व्यक्षां. ६ कख. झगटना. ७ खम. न° ८ गद. कळसे. ९ क. जेहीं १० कखम. रितु. ११ द. करविलं. १२ द. पंचम. १३ क. °वरिचें. १४ क. सोळां खणांचें. म. °कळांचें. १५ कख. गज-राचेनि. म. गरजाचेनि.

ऐसें दामोधर सोळा खणांचें : वरि खांब कापुर-केळिचे
वरि मांडव चौंपसीं[1] द्राक्षींचे : जत्र दृष्टि फाके ४३९
ऐसी उचित-चंद्रिका चतुरा : आइति केरविली[2] दामोधरा
मग पाय धूनि[3] सेजारा : आंतु आली[4] ४४०

## ५२
## भावकळनेची विनंती

तेथ भावकळना म्हणे " सखिये : तुज काइसा सिनुः कां वो निज न ये
सर्वांगीं धगी काइसी माये ! : कां कोमाइलीसि ? ४४१
हें चंद्रकांताचें धवळार : जैसें हिमवंताचें हिंवार[5]
ते उबा वोतिजर्ताये[6] सेजार : तुझेनि तापें ४४२
इये सोमकांताचिये वसुवारीं : तुज बहु धगी वो सुंदरी !
तरि आतां उठिं जावों[7] बाहिरी : धारा-दामोधरीं[8] ४४३

## ५३
## उठतांना झालेली रुक्मिणीची अवस्था

तें भिमकिया मानिलें : तव पद्मावतिया डोळे वोल्हावल
मग आधार देउनि बैठियां केलें : आपुलेनि आंगेंसीं ४४४
नावेकु घालौनि[9] उसासू : बोलावया केला पैसुं[10]
म्हणे "हा वैरिया मिनला दिसु : केधवां स्तवैलें[11] " ४४५

१ क. चोंभवतीं. द. * २ कखम. धरिली. ३ द. धूउनि. ४ द. आणिली. ५ द. हिमार. ६ क. उततात. ख. उयजताए. ७ खम. जाउं. ८ द. धराचिया. ९ द. पुसिले. १० कखम. कसु. ११ म. अस्तवेल.

तवं सांजवेळ होतां[1] समिप : सेजारीं उजळेत रत्नांचे दीप
तिरीगीची न साहावे[4] झडप : दृष्टी विरहिणीचियें[5] ४४६
अवलंबिलें आंगिचें ताराण : भीमकी उठिली आपण
तेथ लागु दे अनंगाची[6] आंगवण : भावकळना ते ४४७
पाय न धरती वेंविळे : सवांगें जाति विकळें
आँधे उघडे केले डोळे : न धरे कंठ-नाळ ४४८
आंगेंसीं होती प्रधान--कुमरी : तिया धरिली वरिचां वरि
दोहीं हातें वारिताय चकोरी : गजंबु सखियांचा ४४९
ते मुर्छा वरिचां वरि राहिली : मग पाउलें दोनि[9] चालिली
चांचरी[8] जात जात आली : दारा सेजाराचेया ४५०
उंबरेया बाहीरि पावो न पडे : तेथ बाळे लागु देउनि दोहींकडे
बाहिरी आणिली उजियेडें : तवं दिमे आंग वोसावलें ४५१
विरह--ज्वरें पान ऐसी कांपे : पावो ठेवितां पाताळ पळिपे
तेथ स्फटिकांची भोयें[10] लासांवे[11] तापें : हें नवल काइ? ४५२
ऐसी श्रीकृष्णाची श्रतावस्था म्हणे : देविये होतें मोतियांचें लेणें
तियें[12] लाह्या जांलीं[13] तंतक्षेगें[15] : तो तापु कैसा सांघावा! ४५३
मोतियांचीं ढीलौनि अळंकरणें : मग ओळगविलीं पोतासाचीं भूपणें
तियें आंगीं पल्लिपलीं केधवां[14] नेणें[15] : मग लेइलीं कुळेकाम ४५४

१ ह्. होताय. २ ह्. ळिले. ३ ह्. तिरपीची. ४ कखम. साहे. ५ क. णीचां. ६ ख. अवळाची. ७ क. अर्ध. ह्. आधी. ८ ह्. चांचरी जाति मग आणिली. ९ ह्. दोनि च्यारि. १० म. भूमि. ११ ह्. लाख ऐसी. १२ खम. तिया. १३ म. जालिया. १४ ह्. केधवां नेणं. १५ म. ततक्षेणं.

सीनली देखोनि सकुमार : म्हणेति "इये न टके दामोधर"
म्हणौनि दांडी सुपुरें : साउमीं मेळविली ४५५
गुळ-उंसाची केली डोळी : पडवा विणिला केतकी-दळीं
असोकाची कोडेंकी कोवळीं : कुंटा कमळ-नळाची ४५६
चंपक-परागाची उसिसी : तेथ भीमकी बैसविली कैसी
नवल भूतळीं चंद्रिका जैसी : मृगी कुंकुमाची ४५७
वरि वज्र-पंजरू बाळेयाचा : तळीं वासू लवंग-कळिकांचा
मग कोंभ चाळिती दांडियेचा : बटकी भोइयांचिया ४५८
धाकुटिया चालती दोहीं आंगीं : डोळिकारितें म्हणेति "नीहाळू गे"
ऐसेनि दांडी आणिली वेगें : धारा-दामोधरा ४५९
तेथ कापुर-केळिचा डोल्हारा केला : तो मृणाळ-सुताचेनि पाटें विणिला
सोने-कमळांचां नळीं लांबिला : गोफ गुंफौनियां ४६०
वरि मकरंदाचीं पाणि-तुळी : पासवडा दाटिला कमळ-दळीं
तयावरि बैसविली ते बाळी : भीमकाची ४६१
दांडिये सिनली[13] सुकुमारा : म्हणौनि बैसविली कापुर-केळिचां डोल्हारां
जैसी चंद्रकळा विसंवली चोवरां : वडवानळाचां ४६२
जैसी मेघें-विन चानकी फुटे : तेवींचि आंगीं विजु उपटे
कीं रात्रीं चक्रवाकी वितुटे : तैसी[16] ते आगीं वनवे ४६३

१ द. सकर्पुर. २ द. केली. ३ क. कोडवी. ४ क. कुटी. ५ कखम. बैसलां. ६ खम. चंद्रकांति. ७ खदम. मांचां. ८ क. कुळिकाचा. ९ द. डोळिकरणीतें. १० द. थिर थिर. ११ क. आली. १२ खम. मृणाळाचेनि. १३ द. सिनल. १४ कखम. * १५ खद. बैसविलीं. १६ क. तेवींचि आंगीं वनवे.

जैसी क्षे[1] झिजे चंद्रकळा : वरि राहोचा आदक आगळा
का लोणीरीं धार [2] लोपे उन्हाळां : तेवीचि धाके मातांगा ४६४

तैसी ते वेहाळी चंद्रवदना : सुंदराचेनि वियोगें दीना
पाठीं मुर्साबे भेदरेन : शिशुपाळाचेनें ४६५

आंगीं आंतुली धगी उकडत : मुख सावेयीं सोखत
म्हणे मोर वोनिलें निभ्रांत : दिसें आजिचेनि ४६६

## ५४

## अस्ताचळावरील सूर्याचें वर्णन.

तवं उचित--चंद्रिका म्हणे : "सूर्या अस्ताचळीं होत उपेणें
जैसें तेजाचें सांटवेनें वोपणें : मढीं पवळेयाचां ४६७

कीं कुंकुम--वर्नी सराग : झेंपावत शृंगार--विहिंगू
कीं त्रिनेत्रें तातला अनंगू : रिगत पश्चम--समुद्रीं ४६८

कीं टेविला प्रकाशाचा मुडा : पाताळीं पेणें होत गरुडा
कीं श्रीकृष्णु आर्विलें पश्चिमिली कडां : कमळ कांतिचेनि

कीं संध्या--सरोवरीं सारासिचा गिवसू : करूं आला सोनेयाचा सारसु
तैसा सूर्या होताय प्रवेशु : अस्ताचेळीं ४७०

१ द. क्षेयें. २. क. धाकु. ख. अदकु. ३ कद. वेगळा. ४ द. °रांची ५ द. आटे. ६ कखम. भियाली. ७ क. योगें दीनवदना. ८ क. मुर्साबे. ९ द. चिया. १० द. आंगातिली. ११ दम. सावया. १२ द. धेतलें. १३ द. सांटवे. १४ द. झंपावे. १५ कम. अर्चिला.

## ५५
## सायंकालीन अंधःकार.

तेथ फुटले इंद्रानिळाचे खोरे : तैसा माथा उधविला आंधारे
कीं डोंगर उन्मेळीले गरुडोद्गारें : पांचिचे हे ४७१
कीं दाटत कस्तुरीयेचे मेघ माजिरे : कीं पिल्लीं पसरिलीं गगन-सागौरें
कीं ब्रह्म-गोळकु भरला पुरें : कृष्ण-गंगेचेनि ४७२
कीं बांबळैली तमाळाची वाडी : कीं महा-मोहाची धुपाडी
कीं चरत द्यावा-पृथ्वीयेचां पाँडीं : ठौळ कांति-लोहाचें ४७३
नां तरी कमळौनि अंसासितें : कंदर्पाचेनि दळवेंयें वसंतें
भवंरांचें घालणें घातलें अवचितें : विरहिणींवरी ४७४
कीं भू-गोळकाचां देउळीं : रतीं अनंगें पूजिली गगन-कौळी
ते पुजा दिसतसे निळी : निळोत्पळांचा ४७५

## ५६
## सायंकालीन कार्य

संकोचलीं कमळें : पक्षिये टाकिती अविसाळें
चक्रवाकें होति व्याकुळें : वीयोगें प्रियाचेनि ४७६
नानाविद्धा फुलांचां आमोदीं : सैग उधांति राज-बिदी
तेथ दाटत शृंघारियांची मांदी : पेठें फुल-सांतेचां ४७७

१ द. उभ° २ द उमळळे. ३ क. पाचीचेन. ४ कम. सगोर. ५ क. पाचिचेन. ६ द. बाबुळली. ७ द. पेडो. ८ क. हमा° ९ खद. °वक. १० कद. कमळीं. ११ द. काळी.

द्विजीं सारिलीं संध्या-वंदनें : शोडषोपचारीं देवता-पुजनें
अग्निहोत्रें केलीं उपासनें : मौनें विसर्जलीं ४७८

नगरीचां प्रासादीं : मंगळ तुरांचां शद्बीं
पेखनेकारांचां मांदीं : आकास अवतरलें ४७९

शृंघारू करौनि गणिका : उगाणा येत कामुकां
स्वैरिणीतें नेति दूतिका : खागेयासी ४८०

कैसी मेहळनी माजिरी : उजियेडातें आंधळेया करीं
दिवे नेइजति घरोघरीं : हातीं धरूनियां ४८१

## ५७

## दिव्यांचें वर्णन

नगरीं उजळले कुळैवे : ठाइं ठाइं अखंड लाखैवे[5]
जैसीं निधानें चेरति सदैवें : यादव-प्रतापाचीं। ४८२

कीं सहश्रकरें निगतां : आंधार सिंथिलाँ मातांइता
तीयें सळें टेविलीं मज पांतां : सतें सांकिँकाचीं ४८३

कीं आंधारें अंतुर-नायकें : सूर्याचिया धुरा धरिलिया तवंकें
कीं काळवखेयाचां समुद्रीं माणिकें : प्रथम-जातें ४८४

सांजवेळ जिणौनि मेहेळनी : आणि संध्या-रागाची वोपणी
कीं विजूचे गर्भ गळिनले धरणी : धाडि गंडदेचिया ४८५

१ कम. गज. २ द. विरहणींते. ३ क. उजिवडातें. ४ खदम. ळिळे. ५ क. लाखोवो. ६ द. सिंचिला. क. सितला. ७ द. सातेठियांचां. ८ द. प्रथम तेजाचीं. ९ द. गड्दिनिये.

## ५८

### नक्षत्रांची शोभा

तवं गगनीं नक्षत्रें उमटत : जैसी आकाशीं घाटौलि फुलत
ना तरि मेघ वीणि साधित : मोतियांची ४८६
कीं पाख--धुनि करीती चकोरें : तें सैग मंदाकिनीचे थेंब गोरे
कीं दीसति बाणलिंगें ऐतारें : गगन--नर्मदेचीं ४८७
तवं भारती म्हणे महुरैला चंद्र : तो प्रसंगें सांघैल कवि नरेंद्र
जो वाणितां रसाचां समुद्र : चढैल अठवां ४८८

## ५९

### चंद्रोदय

अवसे पुढिलीये बीजे : चांदणें निसवलें सहजें
मग पंचमीचें देखिजे : फुलौरा धुनीतें ४८९
तसीचि चोक--भरी होये अष्टमी : निमुरवत देखिजे दशमी
ते रसिं नवें फोडिजे विहंगमीं : चकोर--कुळीचां ४९०
ऐसा उदैयाचळिचा उपरवेळां : उपैडुडु जाला चंद्र--मंडळा
जैसी रासी जाली गगनाचां खळां : चकोरां पीकाची ४९१

१ खम. करिते. २ द. जैसे. क. तसे. ३ कख. तारे. म. सतारे. ४ द. गगनीं. ५ ख. रसाचा. ६ क. चढवील आठाउवां. ७ द. निळय. ख. चांदणेन निसविजे. ८ क. धुनिता. द. धनी उतरील. ९ द. मिमुरवचें. १० द. उदेचाळिचा. ११ क. मेखळा. १२ द. चकोर क. चद्रपीकाचां.

कीं चांदिणेयांचा समुद्र : तेथ निगित लक्ष्मीं--मुख--चंद्र
कीं कृष्णालागि घाडिताये इंद्र : पाउड़ अमृताचा ४९२

कीं गगन--मंडपीं चंद्रिका--वेली : नक्षेत्रांचीं फुलें लागलीं
कीं अमृताचेनि बिजें विरूढलीं : आकारें चंद्राचेनि ४९३

कीं आकाशाचिये वोपे--आंतु : कैलासु असे प्रतिबिंबतु
कीं मन्मथ--नाथाचा गुढरु स्वेतु : कापडिला खीरोदकें ४९४

कीं गगनाचिये गरुडीं : घातली कर्पुर--चुरी चोखडी
सरावो द्यावया चहुंबुडीं : अनंगें आचार्ये ४९५

कीं देवाचिये कीर्ति-हंसीं : मिळौनि ब्रह्म-हंसेसीं
सांकुवें गाँळिलें आकासीं : रूपें चंद्राचेनि ४९६

कीं क्षीराब्धिचें दूध उमप : सिंपावेया चौ-गांविचें रोप
गगनांचां राहाटीं माप : सुधांकराचें ४९७

कीं घेउनि सिद्ध-रसाची उटी : यकांकीं जिणांवया धूर्जेटी
कांस घालौनि गगनांचां हटीं : कुसुमायुधु हा ४९८

कीं आकासीं अमृताची अवधि : कीं अनंग-संजिवनी दिव्य--औषधि
कीं उगेमींची देवता प्रसिद्धी : चांदिणेयांची ४९९

कीं [illegible] नव्हे तें स्वेत-दीप : माझारि सांवळें तें श्रीकृष्णाचें रूप
वरि टाकौनि पाहों आले स्वरूप : श्रीचक्रधरोचें ५००

१ **क.** निगताए. २ **कख.** तियें. ३ **दम.** फुललीं. ४ **क.** गुन्हडु. ५ **द.** सारवावया ६ **कद.** चडुकडीं. ७ **कद.** गाळिलीं. ८ **खद.** घालुनि. ९ **खम.** गगनाहटीं. १० **म.** उगवलीं. **क.** उदय-गिरीची. ११ **खदम.** माजि. १२ **क.** चंद्रकराचें.

कीं भू-गोळकाचां प्रासादीं जैसा : गाळिवा अमृताचा आरिसा
तेथ श्रीकृष्णांचा बिंबला ठसा : कळंकु नव्हे[1] तो ५०१
कीं गोपि-नाथु जोडावेया नोवरा : स्वर्गिंचिया मिनलिया तारा
गगन-गंगे मोतियाचा वालु-सरा : पुजिला निळोत्पळीं ५०२

## ६०

## चंद्राच्या कळांचें कार्य.

कीं चंद्राचिया उघडिया[2] भूजा : कुमोद--कळेयांचेया[3] सेजा
बांधेति भवरांचिया पुजा : अमोर्द-देवते[4] ५०३
कळाविदु नाहीं चंद्रासारिखा : जो बाणेंविन विंधी दो लांखां
चंद्रकांतीं उदक वरिखा : जेणें दाविला ५०४
नेणों[5] ते कैसी चांदिणेयांची माधवी : जडा समुद्रातेंही माजवी
भरितेयाचेनि मिसें वोल्हावी : पृथ्वियेसी[7] ५०५
कुचि-टोळें[6] चंद्र-करांचें : उर्घडीति[8] मढ शूक्तिकांचे[9]
ठेवणें ठेविती मोतियांचें : मेघां[10] मिळौनि ५०६
चंद्र आपुलां सोळा कळीं : केळीचेया गाभेवनांचां नळीं
येशाचें बी पेरी[11] भूतळीं : मिसें कापुराचेनि ५०७
चंद्र-बिंबाचां पाणि-पात्रीं[12] : चंद्रिकेचिं[13] वारुणि पवित्र वक्त्रीं
पान करूनि रांत्रीं[14] : ढुलती[15] चकोरें ५०८

१ द. नव्हतां. २ कखम. उघडिती. ३ खदम. काळिकांचिया ४ द. अमोती देवतेसी. ५ कख. * ६ द. लोळे° ७ कख. पृथ्वीतें. ८ द. उघडले. ९ द. सुत्ती° १० द. मेघीं. ११ कद. पेरिले. १२ क. पानक्षेत्रीं. १३ ख. चंद्रिकेचेनि वारुनि पवित्र वक्त्रीं. १४ म. पात्रीं. १५ क. फळती.

जेणें चंद्रें आंगावरि संसारा : करूनि दीधला कळांचा चारा
तया उमाकांतें अभारा : धरिला सिरसां ५०९

## ६१

## चांदण्याच्या शुभ्रत्वाचें वर्णन.

भू-गोळकासीं सिद्धरसाची रजनीं : तैसी राति दीसताये चांदिणी
कीं गगना घातली गवसणी : कमळ-दळांची ५१०

कीं द्यावा-पृथ्वीयेचां पोकळीं : कापुराची सोवाळीं
कीं गगन लेइलें कडियाळीं : मृणाळींचीं ५११

कीं श्रीकृष्णाचा देखावया अवतारू : हरुषें आला क्षीर-सागरू
तैसा चांदिणेयाचा निडारू : जेथ रत्नें वर्तेंचीं ५१२

गगन-सरोवरिचे राजहंस : तैसे चांदिणेनि दिसती सारस
कीं ते वीनि साधिताय आकास : चंद्र-बिंबाची ५१३

चंद्रिकां चक्रवाकें गवसतें : राजहंसा सारिखीं दिसतें
म्हणौनि रात्रीं विघडतें : नोळखेति येकमेकांतें ५१४

चांदिणेया-सारिखा नाहीं लाघवी : जो चंद्रकांताचे डोंगर ळपवी
आंधारें-विण आंगीं थोकवी : क्षीर-सागरातें ५१५

नक्षेत्रां-सारिखीं आंगें गोरीं : तिया कामिनिया मांसळती चंद्रकरीं
चंद्रांचीये राणिवे-भीतरी : जग वेढी वाळिपेची ५१६

१ क. आजिवरी. २ द. °ळाचा. ३ म. न° द. विरमलीं. ख. वातिंचीं.
४ द. चंद्रिकाचिये. ५ द. °पेचें.

बहु बोलतां अति-प्रसंगु : कथे होइल रस-भंगु
  आतां करूं वेगु : म्हणों[1] विरहोपचारु ५१७

## ६२

## रुक्मिणीचा सख्यांना टोमणा

भारथीं चंद्रातें वाखाणी : तेणें बहिरेति[2] कां न विरहिणी ?
  म्हणे " उचित नेणेसि गे साजणी : माझिये जिविचें ५१८
पुढिलांचिये हृदइंचा भावो : नेणिजे[3] तें जिविताचि वावो
  म्हणौनि जाणिवेचा अपावो : झणें कव्हणीं ये ५१९
जया वरिचिला विकाराचिया वरपंकीं : तियेंचि सेहाणीं बोलिजेति लोकीं
  पुन तियेंही[6] चोरमोळीं म्हणौनि रसिकीं : वारिलीं वरदळाचीं

## ६३

## द्राक्ष-मंडपांतील चंद्रकिरणांची शोभा

धाकुटिया देखती समोर : द्राक्ष-मंडपीं सीरेति[7] चंद्रकर
  ते गळालिया घेति चकोर : वरिचां वरी ५२१
जे मांडवाचां[8] जंत्रीं सुलेखं[9] : चकोर चांचूचें कागमुख
  चांदिणेयांचिया सरिया सदमुख[10] : काढिताति ५२२
कीं द्राक्ष-मंडपु नव्हे मेहुडें : वरिखत[11] नवरसांचें वांकडें
  कीं अनंगाचीं सुटेति नळकांडें : विरहिणीं-वरी[12] ५२३

१ द. सांघों. २ दम. बाहिरिया होति विरहिणी. ३ द. नेणे तयाचें. ४ कखम. °णांसी. ५ द. विचारा° ६ कखम. * ७ क. संचरेति. ८ द. मंडपांचा. ९ द. सुरेख. १० द. सन्मख. ११ कखम. वरुषत. १२ खम. °णींसी.

कीं भीमाकिये सारिखिये[1] धुरे : कुसुम-बाणाचें हाथियेर गोरें
तया बांधले बांधेर : मदनें मैळैनि[2] पैं ५२४

## ६४

### चंद्रोदयामुळें झालेली रुक्मिणीची तगमग

समोर चांदिणें देखौनि दृष्टी : तेणें लक्षिमये सुटली चटपटी
म्हणे "हा वडवान्नळु न संडी पाठी[3] : आमचीये क्षीराब्धिचा

कीं नवल मेघें-विण अंतराळीं : अखंड चंद्राची विजू वाटोळी
हे अनिष्टं[5] करिताय शरिर-पोकळीं[6] : मज देवें वीण ५२६

कीं वसंतिय रुतुचां वेळीं : नवल अनंगें पाजळिली होळी
चांदिणेयांची धुळिवाडी[7] वेगळी : वनवित आंगातें" ५२७

आधींचि विरह-ज्वरें तेथें : गुसळत चंद्र-कराचे सांमथे
तवं जंत्रें वाजिनलीं[8] अनुहातें : वेळुवां-वरी ५२८

दामोधराचां खणोखणीं विचित्रें : वारेंनें वाजिनलीं जंत्रें
तियें सेलीतं[9] सप्त-स्वराचीं शब्दें : कानांचेनि[10] निरोपें ५२९

जंत्राचिये श्रुती-सवें आसुडें : गीतें कानांसि अनुघडे[11] पडे
वेळोवेळां आवघडे[12] : ध्वनि कळ-हंसांची[13] ५३०

रांजहंसु[14] देखौनि दचके : चकोरां[15] चक्रवाकां चवके
शद्धासवें विथानके : सोगौराचेयां[16] ५३१

१ द. सारिखे. २ द. मैळेनि. ३ द. माशी पाठी. ४ द. * ५ द. अरिष्ट. ६ द. कपोळीं. ७ क. धुळौडि. ८ क. वाजविली. ९ द. सेलीतां. ख. सेलीते. १० म. कामाचेनि. ११ खम. °घाडा. १२ द. आखुडे. १३ कख. °चिया. १४ क. हंसें देखौनि राजहंसी दचके. १५ कखम. चकोरी चकोरा. १६ क. सगौरा°.

कस्तुरी-मृगाचिये वोसाइलिये भांबावे : भवराचिये श्रुती आडवे
कोकिळा-कुंजनीं जिउ मुसावे : तेणें वेगें ५३२
तेथ साळैया राजसुक : पढताति भाका चित्रें श्लोकें
तिया भारणिया घूंमेति दाटिक : काम-कोळडंकाचे ५३३
मुखें दीर्घ स्वासु घालित : तेणें फुंकें विरहाग्नि पेटत
नंदनवन पाजळत : अवयेवांचें ५३४
विकळता बहु सर्वांगीं : दामोधर वोतिजताय धर्गी
तो विरहो-उपचारू रसिकां-लागी : म्हणैल नरींद ५३५

६५

## विरहोपचार.

(१)

तेथ भींमकियेची मैत्रिणी सुगंधा : ते मळयाचळ आकर्शी मंत्रसिद्धा
जैसा लक्ष्मणा-लागि द्रोणागिरि प्रसिद्धा : आणिला हनुमंतें
अमृत विरढलें अमोदेंसीं : मळयाचळींचीं झाडें तैसीं
तया वोखदाचा निर्यासीं : किजत प्रतिकारू ५३७
अस्विनींचेनि चांदें : मळयाचळु भरे वोदें
तेथ फुटेति कुमोदें : तिये बावनें बोलिजेति ५३८
काढौनि चांदिणेयाचें सत्त्व : निवंडौनि पोतासाचें तत्त्व
बावनेयांचेया दती यकत्व : भांजिजे पुंक्षरसें ५३९

१ कख. वोसाइये. २ क. मुर्छावे. ३ द. अलेक. ४ कख. चुमत.
५ द. कळा ६ कद. उतिज. ७ द. निर्धासी. ८ कख. स्फुटति.
९ कम. काढुनिया. १० द. निवडुनि. क. निवडिजे. ११ म. पुष्प.

या येक्षकर्दमाचां लेपु : आंगीं लावितां न धेरे संतापु
दुणावत[1] सिर-व्येथा कंपु : अती गात्रां भंगु ५४०

(२)

गांठिवेनां[2] मालती मृणाळें : असोख बावनें बकुळें
खड्गोदक मकरंद-जळें : देतां मुखीं पोळत ५४१

(३)

कुंकुम कस्तुरी चंदन-पालवी : गोळीमे[3] परतौनि नवीं
हा लेपु सिर-व्यथे लावितां देवी : डोळां झांपडी पडत ५४२

(४)

चांदिणेयाचें सत्व निगालें[4] : तें केळीचेया गाभेवनाचिये खोळे
मळयानिळाचेनि स्पर्शें आळे[6] : तो होए कर्पुरू ५४३
या पोतास-पुळिका : परिमळा[5] येति मासा येका
पुन कणु न बंधति आइका : जैसें चीकभरी चांदिणें ५४४
तें नमुरतें कर्पुर-नीर : वैस्वानरातें करी विज्वर
परि देवियें देतां त्रिपुर : पाजळत इंद्रियाचें ५४५

(५)

नेणों कैसें चंद्र-बिंब स्पर्शें : अमृत[8] कैरवांवरि दिसे
चौं पाहारीं हींव[9] आटतसे : जैसे कण साकरेचे ५४६
मधु-कर्पुरें चकोरी[7] अंजिजे : तेहीं आसुई कुमोदु--कंदु उगाळिजे
तें अंजन पाया-तळीं सुइजे : चंद्रिका-मंत्रें ५४७

१ द. दुणावतुसे. २ क. गांविवन. ३ द. गुल्में. क. गोळी. ४ क. निवळें. ५ म. परिमळें. ६ द. आळलें. ७ क. परिएसं. ८ क अमृत-कर वावरत दिसे. ९ ख. हींवं. द. *

( ६ )

जें दुमतें देखती चंद्र–कर : तें पाणि–पात्रीं धरूनि क्षीर
वरि घालिती पंचधार : कुमोदा आंतुली ५४८
मागां चंद्रचूडें विश घेतलें : तें येणें ओखदें धरिलें
तें देत्रिये देतां गरळ होउनि परतलें : नाकें धुं निगताये ५४९

( ७ )

कैसी उठितोए विरहागी : अगरू लाविता आंगीं
तिया धुपाडिया न परते वेगीं : सोसु विरहिणींचां ५५०

( ८ )

नानाविधां फुलांचिया दृर्ता उदारां : काढुनि भरिजेति कनकधारा
वरि तुषार घालिती विद्याधरा : जिया आंगें जाणिजेति ५५१

( ९ )

मुखश्रयाची खुडुनि पालवी : विजणें केलें सपल्लवीं
वरि वानि ठेविली नवी : कळे–कामाची ५५२
विजणें ओल्हाउनि हिमोदकें : वारा घालिजे भीम–कन्यके
तऱ्हीं मुर्छा न धरे अधिकें : सयनावरी ५५३

( १० )

पूर्ण–चंद्राचेनि अमृतें उतरे : स्वातिचां मेघीं धरे
तें पाउसासवें गर्भी भरे : माणिक–सिंपीचां ५५४

१ ख. घालिजे. २ खदम. * ३ द. नांकुनि. ४ क. उधातिये.
५ कद. स्वासु. ६ द. जाणातिया. ७ क. कळै ८ द. वारे घालिजेति.
९ द. मुर्छना.

जैसें दुध होय अधमुरी : तैसें संपुष्टाचां उदरीं
मोतियें होतिं आपमुरी : सातीं दिसां ५५५

तया मोतियांचें काढिती पाणी : मग हातांपायांचां संधानीं
माथां जिरंपिती विरहिणीं : पुन ताव न धेरे ५५६

(११)

द्रुती-विगळितें कुमोदें : तयाचेनि भरति मकरंदें
तेणें नसु देतां अमोदें : पुन भ्रमु न फिटे ५५७

कनकाची वेलि सपुर : पातळा मोतियांचा मुहुर
तैसा स्वेद-कणिकां-भर : दीसत भीमाकिये ५५८

(१२)

नानाविधा कमळांचे पराग : कंदर्प-केतकिचे रज सुरंग
तेणें उधळेनि दाटीति आंग : पुन स्वेदु न धेरे ५५९

(१३)

हिंवांचां करितां उपचारू : परिचारिकांचा घेत अवकरू
म्हणे हा नव्हे चंद्रु-चंदन-कापुरू : मारू पंचाग्निचा ५६०

उपचारें आंगिची तवचा उचलली : उबा दर्र ये जवळिलीं
अवस्था-भरें पिसीं जालीं : नेणे आंगिचें सुख ५६१

अधिकाधिक करितां उपचारू : तेणें धात-क्षेयो उपनला आतुरू
पाठीं कैसा केला प्रतिकारू : तो सांघैल नरेंद्र ५६२

१ **कखम.** तव. २ **कद.** भरतें. ३ **कद.** °कणिका° ४ **कख.** उधा°. ५ **कखद.** हिंवाळा. ६ **म.** अति° ७ **द.** * ८ **द.** वोदरयेली. ९ **कखद.** °रसें. १० **कद.** अतुर.

(१४)

खळीं अर्ध–चंद्राचां : पारञु शोधुनि चांदिणेयांचा
मारू केला मोतियांचा : नक्षेत्राचेया ५६३

तो संपूर्ण रसु जाला [1]पुन्हरें दीं : ‘ मृगांकु ’ नांव ठेविलें वैदीं[2]
मग [3]चोखें भरिला सेंदीं : कापुरू–केळीं खिरला जो ५६४

[4]अवस्थे तांबूळ–वनेंसीं देती : [5]मळयजाचे अनुपान वोपिती
विरह--ज्वरीं ढाळु करिती : [6]कवणी परी ५६५

(१५)

वोलेया हरिचंदनांचा सेजवटीं : जळदाचिये सुपवतिये वरिवंटीं
बाळा बैसविली[7] मुघटी : ढाळु करावया ५६६

देवीचा विदावंतु गगनरंगु : तो [8]दुरौनी आळवी मेघरागु
तेणें [9]रागें होय जळ–योगु : मेघ--[10]अर्कशणीं ५६७

[11]अवकाळें--जळदाचिया धारा : बहुत करूनि वरुषेति गारा
तया गारांचें पाणी धरीति चतुरा : [12]तैडसीं कमळ-दळाचां

चांदिणेयाचां [13]पाण्हांवनी : चंद्रकांत दुभती अदुभणीं
तैसें[14] [14]भूमी निगे [15]उगळेवणी : तें आणिती सखिया ५६९

तेणें उदकें विरहिणींवरी : ढाळीति काास्मिराचां कळसेवरी
तेणें भीमकाची कुमरी : अवग्रहण करित ५७०

१ क. पंधरे. २ मख. वेंधां. ३ द. चौक क. चोखुनि. ४ क. तो रसु ५ कद. °चोनि अनुपानें. ६ कद. कवणे° ७ क. बैसली. ८ खदम. दुरुनि. ९ खदम. रंगें. १० क. आकर्षूनिया. ११ कखम. अकाळ° १२ क. कळसीं. १३ कख. पाल्हा° १४ म. तें सैंम. १५ द. उदक°.

येकी पुष्प-रसें वोल्हाविती : येकी पद्मिणींचां पानीं विजिति
तेणें झडें ओकारे येती : प्रळय-पावकासी ५७१
परि अंगीं कांटाळा न फुटे : हिमोदकें दोमति ना बोटें
श्रीकृष्णाचेनि वियोगें क्षीराब्धि आटे : तेथ केउता उपचारू

## ६६

### विरहावस्थेचा चढ

देवीचिये अवस्थेचा दिसे चढु : तेणें सोंतांही समुद्रासि निघे कढु
तेथ काइसा उपचाराचा पाडु : परि जिवीं आस असे ५७३
भीमकियेसि मुरारिची अवस्था : वरि सिसुपाळ तडसाची वेथा
तो सिनु काइं ये अनुवाद-पथा : जेथ जिणेंचि नाहीं ५७४
किन्नरीसि श्रीकृष्ण वानितां अनुरागीं : क्षोभु उपनैला देविचां आंगीं
तया वेधाची जाली वज्रांगी : सीहे विरहो-उपचारू ५७५
वोजिता वारेयाचेनि फुकें : आंगिचें श्रीखंड सादुके
पाजळे आगियेलें उदकें : वियोग-वन्हिचेनि ५७६

## ६७

### रुक्मिणीला आपल्या शरीरावयवांमुळें आलेला वचक

तेथ "राहा वो राहा" भारथी म्हणे : "हे वैदर्भी आपणपें नेणे
आसों देया ढाळु करणें : नेया आंतुलिये सेजे ५७७

१ द. पुक्ष° २ क. तिंविजति. ३ द. देवि° ४ क. तापें° ५ द. किंनर श्रीकृष्णातें ६ द. क्षेदु. ७ ख. °जला ८ क. न साहे. द. तेणें साहे. ९ द न्या.

पैरातिलीए[1] कस्तुरियेचिये वोवरी[2] : तेथ कुंकुमाचा देव्हारसेरीं
चांदिणेयाचां अरुवारीं : सुतली ते ५७८

डावा हातु उसिसां घातला : उजवा हृदयावरि ठेविला
जैसा जिवेंसीं देवों धरिला : निसटैल[3] म्हणौनि ५७९

चुतांकुरु म्हणौनि चवकली : हातिचिया आंगुळियां अेंशंकली[4]
रातोत्पळें म्हणौनि बिहाली : कर--कमळासी ५८०

आपुलिया सादा संकें : कोकिळा कुंजति[5] म्हणौनि धाके
आपणेंया[6] आपण उसांसी[7] वितर्के : मळयानिळु म्हणौनिया

केळीचीं गाभेवनें सपुरें : कापुरोदकें पाखाळुनि[8] सुकुमारें
तेथें वानि ठेविलीं[9] अरुवारें : अमुंरिवां[10] मोतियांची ५८२

तो फुटा पांगुरविला सुंदरी[11] : तो हुरुपैला[12] वरिच्या वरी
जैसें तातलेया तेलावरी : पान फुटौनि जाये ५८३

तो दुजा कामाचा अवतारू : जाळुं पडकैला[13] वैस्वानरू
तैसा देहीं संतापु थोरू : विरहिणींचां ५८४

कीं रुक्मिणींचें रूप चोखाळ : पुनु सिशुपाळें वैरिलें[14] हें किडाळ
[15]तें विरहाग्नि सोधिताय दळें[16] : श्रीकृष्णरायालागी ५८५

१ कद्. घरांतुले. २ क. वोसींरी ख. सारी. ३ म. सुटेल. ४ कम. शंकली. ५ द. कुंजित. ६ क. आपुलेया. ७ क. उसासे. ८ क. पाख° ९ द. ठेविति. १० कखम. अमुरां. ११ द. सौंदरी. १२ द. हुरकुनि गेला. क. हरुकरु. १३ द. पडिकला. १४ द. वरिली. १५ द. की. १६ क. अदळ.

## ६८

## सख्यांनीं केलेलें रोगाचें निदान

प्रतिकारू करितां नानाविध : भिमकी आगळीचि जाली असावध
तेथ सखिया बोलती समुग्धा : “ हे अैसे विरहिणीं ५८६

इयेचेनि मधुर स्वरें येकें : सप्त स्वर जिंतिले असिके
तेहीं कोकिळा मोरें देउनि तवकें : खिळीलीं पंचम स्वरें

मुख-चंद्रें करूनि चढावा : चंद्रातें घेतला कळांचा नागोवा
तेणें चौ-मेरीं लाविला वणवा : चांदिणेयाचा ५८८

आंगिचेनि परिमळें : चंदन जिंतिलें कसा आगळें
तें यक्षकर्दमें बांधलें दळें : विरहिणीसी ५८९

हे आपुलिया नयनांचां सेवटीं : डोळसा मृगितें दळवटी
ते हरिणें येंक हींपुटी : किजत चंद्रा-करवीं ५९०

एकएका अवयवाचा मेळावा : जिणे मुग्धांचा थोवा
तियें करितातित रातिवा : शस्त्रें मन्मथाचीं ५९१

भोगाचा उपचारू करितां : अधिका नासु जाला जीविता
विशया प्रतिकारू करूं आतां ” : खुणीं बोलतांती ५९२

१ क. शब्द. २ द्. अशक्ये. ३ ख. दबकें. ४ द्. खिळविली. ५ द्. तेणें यक्षकर्दमा. ६ द्. हरीणि. ७ क. बोलती सखिया.

## ६९

## उपचारांचे प्रकार

हां वो ! हिमाचें[1] दामोधर : इये विरहिणीं[2] वोडवलें जौहर
इय अग्नि-स्तंभाचे अक्षेर : पुसां[3] कां सिद्धातें ५९३

यकाधा आना का मंत्रवादी : जो अनुहातें[4] जंत्रें खिळी आधी
आबुटाचें विष सुआ का सादीं : या कोकिळाचां ५९४

साळेया मांडवीति पांसे : नळिका-यंत्रीं[5] पाडविती पुंसे
तेथ चक्रवाकां कवण रूसे : जें[6] पांपें[7] विघडली[8] ५९५

आंधारियें घालवीति[9] चकोर[9] : खूडां पाडवीति सोगौरें[10]
राजहंसा आंणवीति[11] टापर : मदवियेचें ५९६

कस्तुरिया-मृगा चिरविती[12] वागुर : डालवीति जवादिय मांजर
वना आंतु नें[13] सीरावया भंवर : वरि जाळीं पांगवीती[14] ५९७

वनकरांचिया वटिकी श्रीमंती : कमळ-नळांचिया गोफणीं हातीं[15]
तियें वेउनि फळे वरि सोंकरिती : पक्षियांतें ५९८

हां वो ! यकाधा लाघवी न जोडे : जो लपवी वनिचीं झाडें
हा आधारें-विण हारवी कोडें : साबरी सरोवरें[16] ५९९

१ क. हिंवाचें. २ ख. °णीसी. ३ क. पुसी. ४ ख. आना° ५ क. °अंत्रीं. ६ द्. जिये. ७ क. सांपें. ८ म. विघडली ९ क. घालिती चकोरें. १० क. सगौरें. ११ क. बांधती. १२ द्. कर° १३ द्. निसिरावया. क. न रिगवे. ख. सिरावया. १४ कम. पांगुरवीति ख. जाळेया गोविती. १५ म. घेउनि° १६ द्. °वरीं.

यकाधा अभिचारकु आणावा : वसंत[1] रितु आकर्शावा
  या परिमळाची लूसि[2] घेववा : चंडवाता-करवीं ६००
मळ्याचळाचेया सापां : क्षीरसागराचा लांचु[3] बोला पां
  तया-करवि आसिकां[4] गिळवा पां : मळ्यानिळु" ६०१
येकि म्हणेति " राहोचिया सिसा : अमृताचें नवसियें नवसा
  या चांदातें गिळुनि हो कां कुंवासा[5] : ये विरहिणीचां ६०२
इंद्रनिळाचेनि रावणें : बोझा काढिविती चांदिणें
  कुमोदासि घालवीति घालणें : विरह-सुर्याचें ६०३

## ७०

## भावकळनेची चिंता

तेथ भाव-कळना सीहाणी[6] : आइकौनि धाकुटीयांचीं[7] बोलणीं
  म्हणे " हे यूक्ति[8] कोडिसवाणी : कांहीं घडतें न दीसे ६०४
देवी[9] निरुती लागली अवस्था : विरहो-उपचारीं सिनली सर्वथा
  आतां येक वेळु ये हाता : कवणिये[10] परी ? " ६०५

## ७१

## पक्षांचे शकुन

ऐसें प्रधानिका विचारी : जवळिलीतें हानें वारी
  तंव नवल देखिलें चतुरीं : देवीचेनि[11] दैवें ६०६

१ द. वसंतियेचा रितु वारिखीं. २ द. लासु. ३ द. आववीया. ४ द. निळातें. ५ द. कुंवसा. ६ द. सेहाणी. ७ द. टेयांचीं. ८ द. यूक्ति नव्हे गे° ९ द. देविये. १० खमम. कवणी. ११ द. येचेनि.

मग म्हणताये कळाविद : " हां वो ! या पक्षियांचे शब्द
कैसे करितातिं अनुवाद : सकुण पांतां ६०७
या पुंसेयांचे आइका बोल : [1]आमतें पांजरां घाला बोल
आतां जीवितनाथ मिळैल : रुक्मिणीचा ६०८
कैसे साळेयाचे शब्द चतुर : [2]म्हणेति आम्हा लांडेपण येवो वर
परि सिशुपाळाचें नेइलें[3] अंतौर : वल्लभू गोपिकांचा ६०९
कोकिळांचीं कुंजनें आइका कैसीं : येथ श्रीकृष्णु येइल पांचवां दिसीं
येन्हवीं झगे भेटि हो[4] बाळकेंसीं : सांघती पंचम-स्वरीं[5] ६१०
भवर बोलती [6]स्वयं वाचा : आमुचा घासु काढो अमोदाचा
जरि यथ गोसांवी न ये जिविताचा : भीमकीचेया ६११
मेघांची आण वाति आइका : षड्ज-स्वरें [7]भाषति मोराचिया केका
साहावां दिसीं दे[8]वा देइल अंबिका : रुक्मिणींतें ६१२
राजहंस बोलेति [9]स्वरितकें : झणे कमळाचें भाणें पुढां ठाके
जरि सिशुपाळु यादव-तिळकें : ठकिजे नां ६१३
मृग हरिणी[10] करीति कुरवाळें : इये [11]वर्णितां सकुण फळें
भीमकी हरिजैल यदुपाळें : चैद्यां देखतां ६१४
सरोवरें उदक-स्वादें सांघति : [12]झणें कमळ उसंगिये रिगती
जरि यथ न ये श्रीकृष्ण-चक्रवर्ती : हंसें[13] म्हणे मिळतु ६१५

१ द्. ते म्हणेति आमतें° २ द्. ते म्हणेति. ३ कख. नेइजैल. ४ ख. होइल. ५ द्. °स्वरेंसीं. ६ कद्. स्वयें. ७ द्. भाकिति. कम. भाषीत. ८ क. देवी देइजैल. ९ द्. कौतिकें. १० द्. °णींसी. ११ द् वर्तितां. १२ द्. मणी. १३ मख. तरी हंसें न मिळतु.

परिमळाचा सुरवद्रा मळयानिळु : हा कैसा वाजताये सुम्रंबाळु
तेणें धाकें नोवरा सिशुपाळु : पळैल मुरारी-भेण ६१६

मियां वारें वर्तिलें दिशांचें : परिमळ सांघंती फुलांचे
येथ गुढर पडती गोसावियांचे : कंदर्पाचेया ६१७

हा मदनाचा दळ्वै वसंतु : कैसा वनश्रीयेसीं घुणघुना बोलतु
रतीचे चुडे राखावया श्रीमंतु : येइल येथ ६१८

बावने बोलताये भरवसा : मीतें आगी लाउनि पुसा
गरुडध्वजु येइल या प्रदेशा : ऐसें स्पर्शें सांघती ६१९

चंद्रें खळें केलें विपरीत : हें वर्तितां ग्रह-गणित
येथ मेघु वोळैल त्वरित : आनंदाचा ६२०

नवल चांदिणेयाचा स्पर्शु : आणुंचि कापुराचा वासु
जाणविताय येइल हृषीकेशु : इंद्रियांपुढें ६२१

कैसीं वनचरांचीं सुचिकें बरवीं : आइकौनि सेकुण बांधावया पालवीं
झाडें पसरिताति पालवी : नवल कैसी ६२२

## ७२

### कारण सांगण्याविषयीं प्रधानिकेचा आग्रह

भावकळना वर्तुनि सांघे शब्द : तंव अळुमाळ भिमकी जाली सावध
जैसें वनवलें कुमोद : साजिवें चांदिणेनी ६२३

१ क. सांवितलें. २ द. बोलतसे. ३ द. आमतें. ४ द. स्परिसें. ५ अ. सकुण-गांठि° ख. सकुण फळें. ६ द. चालवी. ७ क. वर्णुनि.

तें प्रधानिकां देखिलें : डोळे कर-कमळें पुसिलें
मग येकांतीं म्हणों आदरिलें : विरहिणीतें ६२४

"हे कोण पां वो तुझें सिहाणेपण : जें मजपुढां न संगिजे कारण
तुझेया जीविताचें निमालें रमण : तें तुझियाचि बुद्धी ६२५

करूनि जीविताचा वोढा : आपणपें लोटीसि लाजेचां कडां
जें मजपुढां आणुं नै ये उघड : ऐसें गुपित काइ असे?

तुं मज जिविचें न राखसी : सदा अंतःकरणींचें सांगसी
आतां जीविताचां सेजारी समर्थासी : बिढार दिसताये ६२७

न मिळे तें मेळविन मंत्रें : बुधी आणीन गगनींचीं नक्षेत्रें
येँ तूं माझीं जाणतासि चरित्रें : आटक तें सांघे मज ६२८

## ७३

### रुक्मिणीचें हृद्गत

भावकळनेची बोली आइकौनि : क्षेणु येकु भीमकी उंसासौनी
बोलावेया हांव बांधौनी : वास पांतीये ६२९

" आवडिचां आवर्तीं पडत : सिहाणिवेचें तारूं तळु घेत
उत्कंठेचेनि पतंगें माल्हवत : कुळैवीं जाणिवेचा ६३०

चाडेचें आबूठ चढलें : तेणें चातुर्याचें चांदिणें लोपलें
तेणें प्रेमाचेनि पुरें आरव लोटलें : गरुवतियेचें " ६३१

१ द. येकांकीं. १ द. आपणेया लोटीति. ३ द. काइस वो. ४ कद. ऐसीं. ५ द. उसासु घालुनि. क. उसासु घालौनि. ६ द. पाहाताये. ७ द. माल्हात. ८ द. कुळिवा. ९ खद अबूठ.

ऐसी देवाचेनि वेधें भीम-कुमरी : लाज सांडौनि[1] सुंदरी
कंठीं प्राणु धरुनि[2] मन[3] करी : बोले प्रधानिकेसी[4] ६३२
भावकळनेतें म्हणे रुक्मिणी : "[5]तुं वांचौनि माझी प्राण-सखी कवणी
जें सदा वससी अंतष्करणीं : जाणसी जिवाचें ६३३
आपुलिया सि[6]हाणिवा : जे जाणे पुढिलांचेयाँ[7] मनोभावा
तयापुढां राखिजे या उणिवा : केवि[8] जीजे[9] ? ६३४
तुं तंव माझा जाणतासि मनोभावो : जे माझिया चित्ता न ये आणिकु देवो
मग के[10] भू-मंडळिचे रावो : राजकुमर ६३५
पुणु मागां भीमका जवळिके : पांखिरुवें क्षेत्री सांघितले आसिके
मग श्रीकृष्णुरावो वानिला कवतिकें[11] : वेधवंती दीक्षागुरु ६३६
वेदघोषें सूंदरू वानिला : तो कवणें[12] कैसा असे देखिला
पुण सभेसि रसांचा पुतळा : दाखविला शब्द-वेधियाँ[13] ६३७
ते श्रीमूर्ति सगुण सुहावी : प्रसादली[14] असे माझां जीवीं
ते कवणें अनुवादावी : प्राणसखिये[15] ! ६३८
तया मी शरण सर्वभावीं : तनु-मनु-प्राण [16]अर्पिले देवीं,
तो माझेयाँ[17] जीविताचा गोसांवीं : रावो यादवांचा ६३९
तो अनुसरलेयातें नुपेक्षी भक्तवत्सलु : हा मुनिचा बोलु कां जाली[18] विफळु
कीं माझेयाँ रूपासि[19] जाला विटाळु : जें आनिकीं[20] वरिलियें

१ म. सांडुनि. २ द. ठेवुनि. ३ कद. मनोहरी. ४ क. प्रधान-कन्येसी. ५ द. तुज° ६ द. सेहा° ७ मद. °चिया. ८ क. कैं. ९ द. कीजे. १० द. केउतें ११ म. कवतुकें. १२ क. कोणें १३ द. °वेदियाचा. क. वेधियासी. १४ क. प्रवेसली. १५ क. आवो° १६ कख. अर्पिला. १७ द. माझिया. १८ कम. * १९ खम, रूपाचा. २० क. मी नाकें.

जयातें आदि-लक्ष्मी ऐसिया[1] दासी : तो मातें स्वीकारिल हे[2] आस काईसी
परि दिसता तरि धरितियें जिवेंसीं : मग देह जीवो ६४१

पडियंतें दुरौनि[3] दिसे : ऐसें सामर्थ्यें मनांतें असे
तरि हे उपदेसु का तैसें : डोळियातें ६४२

बोलतां सिनु होतीए[4] आखरांचा : मज प्रस्थान चरणीं श्रीकृष्णाचा
वार सुळु चुकौनि[5] नांवाचा : शिशुपाळाचेया ६४३

देवें-विण देह न धरे निरुतें : आणीक उपावो नाहीं मातें
ऐसांही कांहीं देखसी मंत्रातें : तरि करुं लाग" ६४४

७४

## सुदेवाला बोलावण्याची कल्पना

इतुकें भीमकी बोलली सायासें : तव भावकळणा[6] विचारिलें मानसें
बुद्धि दुवासन[7] घेतलें कैसें : तिहीं लोकीं ६४५

तंव मंत्रिणि म्हणे "आमचा बापु भीमकु : तया-पसि[9] सलगि अधिकु
सुदेवो वांचौनि नाहीं[10] आणिकु : सोईरा[11] सांकडीचा ६४६

तया पासौनि तुज शास्त्र-अभ्यासु : आन सकळ-कळा जाला सौरसु
तो तुझा उपाध्या विद्वांसु : सुदेवो पिता आमचा ६४७

१ ह्. ऐसी. २ क. जातेंचि का. ३ क. दुरौनि. ह् दुरूनि. ४ ह्. होतुसे अक्षेराचा. ५ खह्. चुकवुनि. ६ ह्. भावकळने कळिनलें ७ ह्. दुणावलें. कख. दआसन. ८ ह्. * ९ कखम. पासौनि. १० क. सुपोता नाहीं ११ मह्. सोयरा.

तो कवि बोलों जाणे रसिकु : देविचा विश्वासिया पुराणिकु
तो वांचौनि संधाता नाहीं आणिकु : देवातें आणिता ६४८

७५

## सुदेवाजवळ विरहावस्थेवरील उपायाची विचारणा

जो मंत्रु देखिला भाव--कळनां : तो आला देविचिया मना
मग बोलाउं धाडिली कामसेना : सुदेवा कवेश्वरातें ६४९

देवीचेया निरोपासवें : द्विजराजु आला कवणें भावें
जैसा रामचंद्रालागि गरुडु पावे : लागलेया नाग-पासें ६५०

कल्पतरूचिये हिंदोळां कांतिवे : भीमकी देखिली सुदेवें
जैसी चंद्रकळा वोसांवे : कृष्ण-पक्षा-लागौनि ६५१

मुख-श्रियेची साखा कोमाय : पुण चौगुणां परिमळ उधाय
तैसें लावण्यें आंगीं तरंगाय : सिनलियेचां ६५२

तऱ्हीं अवस्था-वेचु जाला आंगा : तऱ्हीं लावण्ये वोपश्री होत अनंग
जे भाव परब्रह्मीं रीगेति भोगा : ते बहु बोलौं न येति ६५३

ऐसी भीमकी देखौनि जवळिके : स्वस्तिवचन केलें पुराणिकें
मग चाउरिये क्षीरोदकें : बैसविला मानेंसीं ६५४

सुदेवा आदरू करी सुंदरी : संभ्रमें उठिली राजकुमरी
सर्वांगीं विकळ विद्याधरी : आंग सावरे ना ६५५

१. कख. विश्वासु सिहाणा. २ द. सखा. ३ कद. कवं. ४ द. कृष्ण-पक्षीं. ५ म श्रयाची. ६ क. वोसीणली ७ कद. शिरीं ८ कमद. बोलों. ९ क. देखिली. १० द. विकळता. ११ द. अलंकार सावरूनि.

कामकळा लागु दे ती : देवी सेजे-तळौटीं उतरिती
विप्राचिया पाया लागविती : त्रिकळता सांडुनि[1] ६५६
तंव द्विजें असिर्वादु दिधला तेथ : म्हणे "पांवे[2] चिंतिला मनोरथ"
मग पुसे जोडौनि हात : "माते ! तुं कां वोसांवलिसी[3] ?"
तेथ बोले भावकळिका : जवळिलींतें म्हणे " बाहेरि उभियां ठाका
मग जाणविलीं[5] द्विज-तिळका : देविचा सिनु ६५८
म्हणे "आजि[6] भीमका जवळिके : भाटें येक पाखिरूं आणिलें बोलिवें
तेणें तिहिं लोकां रूप केलें निकें : गातेनि अंगें ६५९
तयां श्रृष्टीचे राय सांघतां प्रसंगें : देवीचिया मना कव्हणीचि न लगे
मग मुरारी वानिला तुळेंगे : किन्नराचेनि ६६०
तो आइकौनि गुण-रत्न-सागरू : वैदर्भिये वेधु उपनला थोरू
तें जाणौनि भीमकें मानिला वरू : रावो यादवांचा ६६१
तेव्हेळिं मैंदें[9] रुक्मियें मोडिलें : चांडाळा चैद्यातें देवों केलें
तेणें दुःखें देवीचें[11] देह आटलें : वरि विरहो देवाचा ६६२
जेणें उसांचिया सिंगणीं : पांचां फुलांचां वाणीं
पिनायकु-पाणी समरंगणीं : आधा केला ६६३
तया मदनांचा गोसांवीं काइ[12] सांगें : जयाचेनि नांवें महा--मोहो भंगे
तयाचेनि श्री[13] उपखे[14] वियोगें : हें नवल काइ ? ६६४

१ द. सावरूनि. २ द. पावसी चिंतिले मनोर्थ. ३ क. कोमाइलीसि. ४ कद. * ५ खद जाणविलें. ६ द. कालि. ७ द. तणें ८ क. लागला. ९ द. मदें. १० द. वारिलें ११ द. * १२ द. काय. १३ क. स्त्री. १४ कद. उपक्षे.

ईश्वराचेनिं आर्तपणें : देविं मांडिलें अवस्थेसीं धरणें
तें न सुटे विन सन्निधानें : श्रीकृष्णरायाचेनि ६६५

प्रायेवदें होति सिवना : तया उपहुडुचि जाला विजना
तैसें वोखद विरहिणीचेया प्राणां : फुंडी भेटि पढियंतेयाची

इयेचिये आंगीं अवस्था येवढी : सुदेवा ! तुं सोयरा ये सांकडीं
आतां मंत्रु देखैं जवं न संडी : भीमकी प्राणांतें" ६६७

## ७६

## सुदेवाने सुचवलेली युक्ति

द्विजापासौनि देखणें नाहीं आन : लक्ष्मीं बोलें तोखे जयाचेन
तेणें भीमकियेचें वोळखिलें मन : वोलीं भावकळनेचां ६६८

तेथ ब्राह्मणु संतोखला : म्हणे "आजि आमचेयां देवां उदो जाला
जें वदर्भिये वेधु उपनला : परब्रह्मांचा ६६९

मी सदा सर्वेस्वरातें वाग्वाणीं : तेणें तोखें विचारूनि अंतःकरणीं
मज उचित देवों पाताये रुक्मिणीं : देवाचिये भेटिचें" ६७०

द्विजु म्हणे "माते सिनु न धरी ऐकु : काइसा सिशुपाळु मसकु ?
श्रीकृष्णु त्रैलोक्य-नायकु : आणीन निभ्रांतें पैं ६७१

तो तुझेनचि नांवें भक्त-वत्सळु : आफाविलेयां येइल यदुपाळु
येऱ्हवीं अहंकाराचा विटाळु : न साहे तयाचां ठाईं ६७२

१ क. स्नेहपणें. म. अर्थियेपणें. २ क. सोचें. ३ कम. ओषध.
४ कखम. * ५ द. हे फडीं. ६ क भीमकीचें. ७ द. °कळेचां.
८ द. पाहाय. क. पाहातायें. ९ द. आइक. १० क. निरात्रें.

तुझेया भावाचिये विनती[1]-वरी : मी तोंड-निरूपें[2] मानवीन मुरारी
श्रीकृष्णु नाणीं चौं दिसां भितरीं : तरी देह सांडी ६७३
तरि आतां मातें पाठवीं चतुरे : आपुली विनती देई त्रिबाधरे
मियां कैसीं बोलावीं अक्षरें[3] : तो[4] निरोपु सांघैं" ६७४

## ७७

## रुक्मिणी-पत्रिका.

मग भूर्जपत्र घेतलें रुक्मिणीं : हातीं कमळ-नळाची लेखणीं
विनती लिहिली परी कवणी : आखरीं[5] परागाचां ६७५
"स्वस्ति श्रीसर्वज्ञनाथा[6] सर्वेश्वरा[7] : शरणांगत पक्षियाँ वज्र-पंजरा
श्रीकृष्णा किंकरीची विनती अवधारा : दंडवत-पुर्वक ६७६
देवा ! भीमकु रावो कौंडण्यपुरीं : तया मी रुक्मिणी कुमरी अवधारीं
तुं वांचौनि आन मुरारी : नेणें धाकुटेपणां लागौनि ६७७
सांपें वैसाखियेचां दिसीं : भीमका जवाळि किन्नरू आला भेटीसी
तेणें वाणौनियां[8] देवाचिया चरणांसीं : मंज लग्न लाविलें ६७८
मी चंद्र-कळा आनंद-गगन-रत : मीतें[9] सिशुपाळ-राहो गिळुं पांत
तयाचें तोंड फाडुनि त्वरित : मातें राखैं कृपानिधी ! ६७९
सिशुपाळ नांवाचेनि महारोगें : देवा ! दांढेलीं[11] माझीं सर्वांगें
तियें[10] नुपचारेति कव्हणे योगें : वैद्यनाथा ! तुवां[12]-विण ६८०

१ कख. विनतीयेवरी. २ कम. निरोपें. ३ द. उत्तरें. ४ द. तें साध वेगीं क. तो तोंड-निरोप सांघै ५ कखम. अक्षरीं ६ खम. सर्वज्ञराया चक्रधरा ७ कख. * ८ द. वानुनि. ९ द. * १० मद. तियेतें. ११ द. अडलीं. म. आटलीं. ख. अटलीं. १२ खम. तुज

आहो जी जीवित—नाथा ! : तुझिये अप्राप्तिची व्येथा
तो जिव्हारीं गुसळताय सामथा : मज अबळेचां ६८१

स्वामी ! तुमेतें वानितां किन्नरें : मज अवस्थेचें सुदलें भुरेंरें
तें कव्हणी धावणिया न धरे : देवाचिये दृष्टी-वीन ६८२

तुं परब्रह्म अमळु : सदा मीं जीवु समळु
परि तुं शरणागता देसी मेळु : इया आशा विनवितायें ६८३

सर्वज्ञ म्हणविसी विस्वामाजी : तरि भेटि देइं अवस्था जाणौनि माझी
येऱ्हवीं ब्रिदांची सांडावीं वोझीं : न म्हणेवीं अनाथ-नाथु ६८४

जेहीं शब्दीं सुखा रूप नव्हे : तेहीं बोलीं आवडि हिप्रावे
हे विनती मनीं वाचावी देवें : मुद्रित जाण-रायें" ६८५

## ७८

## सुदेवाची पाठवणी.

ऐसी देवी[6] लीहुनि विनती : दीधली द्विजराजाचां हातीं
मग विरहीणि विडा देताये झडती : पाठवणियेचा ६८६

जेंतुले विडे देवों लागे : तेतुलेयां पानां धूं निगे
हेंडपिणीतें म्हणे रागें : "पानें पळवा केली" ६८७

मग कापुर—विडा देवों आदरिला : तंव हातीं जाळु निगाला
तेणें हृदइंचा देवो वोवाळिला : मंगळ—मुर्ति म्हणौनिया ६८८

१ क. °ळत असे २ कख्ग. तुंतें. ३ क. महुरें खग. मोहेंर. ४ ह्. पुरे ५ ह्. म्हणावें. ६ ह्. दवीने. ७ लेहुनि. ८ ग जितुले. ९ ग. तितुकेया. १० क. मग° ह्. तेव्होळि° ११ ह्. हातींहुनि.

भीमकी म्हणे "माझिया[1] परी : काइ भोगा भेटि नेदिजेचि[2] मुरारी
म्हणौनि दाढैलें विरह-ज्वरीं : पाजळताति ६८९
मग लुगडीं-लेणीं नानाविधें : देवीं रत्नें वोपैवी[3] अगाधें[4]
पाउड़ घाडिला वेधें : श्रीकृष्ण-राया लागी ६९०

## ७९
## परिवारासहित सुदेवाचें मार्गक्रमण.

व जाला *पाहान-पटिचा पाहारू : देवीतें पुसौनि निगाला द्विजवरू
ठाइं ठाइं चढावणिचे वारू : ते पुढां केले[5][6] ६९१
निगतां वंकै[7]-द्वारां बाहीरी : येति भेटली मंगळार्ती करीं
तियें सकुणें[8]-फळें लेणें दिधलें सूंदरी : मग वारू नमस्करिला
पैवनवेगें[9] तेजियावरि चाढिनला : सुदेवो वेगेसीं[10] निगाला
जैसौ[11] वारा थडियात्रिला : आमोदें जातिचेनि[12] ६९२
ज़याचेनि रूपें रेवांतकु रेवे : तया तेजियांचा वेगु कवणां वानवे
जया सरिसा पवनु[13] न पवे : खांचना लक्ष्मियेचां ६९३
सर्व हडपु सागळिया सुआरू : देव्हारु-बडुवा दिवटा वेचकरू
भांडारी भोई मौंदुरी[14] चवरधरू : हे दाही जण ६९५
तयांहीं चढावणीचे घोडे : [15]देवी देवविले दळवाडें
ते द्विजेंद्रा [16]दोहोंकडे : चालताती ६९६

१ द माझिये. क. माझेया २ क. नेदी. ३ क. देवविली. द. वोपिली.
*खम. पाहात. ४ क. अनेगाविधें ५ क. पुढां उभे ६ म. घातले.
७ कख वाक ८ द दखिली. ९ द सकौतुक १० क. पवनुपातां रळिया
चढला. ११ क. वेगवन्तू १२ मद. तैसाचि वारू. १३ कखम. मनु.
१४ कख. मादरी. १५ द. देवाने. १६ खम. दोहीं

सुदेवो म्हणे सवैळातें : " कैसें तुमचें दैव पुरतें[1]
  जें परब्रह्म देखाल नांदतें : येहीं डोळां " ६९७

सेवक म्हणती " द्विज-तिलका ! : आम्हीं सदैवं तुम्हांचिया[2] जवळिक
  येऱ्हवीं केउती भेटि मसका : ईश्वरेंसीं ? " ६९८

उल्हासें[3] जात घोडेया-वरि : येक पेणें केलें माझारीं
  दुसरां दिसीं देखावयां[4] मुरारी : आण वाइली ६९९

वारू[5] नें[6] ऱ्हात निगाले : सोरट अतिक्रमिलें
  मग उग्रसेनांचा देशु पातले : तेथ[7] आइत श्रीप्रभूची ७००

तंव सुदेवो बोले सवैलासी : " देसिची वस्ति देखा कैसी
  मेरू उत्तर-वेंठ केली जैसी : तैसें डोंगर दिसताती ७०१

माणुसांची दाटि म्हणों केतुली : भूमिची काळिमां नगरीं फेडिली
  आन पाखिरूवें ठाकेति बिहाली : गगनीं येकेंचि पायें ७०२

सैग उसा--साळिचे गांव : आंबेयांचें लाखारव[8]
  जग करताय राणिव : अष्ट--भोगांची ७०३

भला वसताये प्रदेशु : वाणिया व्येव्हारा जियाला[9] बहुवसु
  दैल्यां नाहीं सौरसु : इये मंडळीं " ७०४

मार्गीं म्हणेति वाटसीरू[10] लोक : श्रीकृष्णु राणिव करीतुसे[11] अलौकिक
  येया सुखाचें न माय त्रिकें[12] : तिहीं लोकीं ७०५

१ ख. निरुतें. २ म. तुझिया. ३ क. उलेखी. ख. उल्हासी. ४ द्. देखावा मुरारी : ऐसी हात बांधली. ५ क. दामु एतां. ६ द्. टाकिते जाले. ७ द्. जेथ अज्ञां श्रीप्रभूची ८ द्. लाखारिव. ९ द्. ज्याला. १० ख. वाटसीरू. ११ क. करीताए. १२ क. पीक.

मागिला सा चक्रवर्तीचेया परी : जीजे[1] देशाचां कर-भारीं
तैसा नव्हे रावो मुरारी : हा आपुलेंचि दे		७०६

हा मायेबापु प्रजांचा : कुटुंबियो[2] देशाचा
पाळकु साधु[3]-जनांचा : होउनि असे		७०७

## ८०

## द्वारका-दर्शन व अभिवंदन

मार्गीं ऐसिया गोष्टी करीत : सुदेवो सेवकेंसीं विस्मो[4] पावत
तंव पव्हे पातले त्वरित : बळभद्र-देवाची		७०८

ते चंद्रकांताची पव्हे विचित्र : जेथ असे अष्ट[6]-भोगाचें सत्र[7]
तेथौनि तेज दिसे सर्वत्र : द्वारकेचें		७०९

द्विजू हात उभौनि[8] दावी द्वारका : जे वंद्य तिहीं लोकां
तेथचीया तेजाचिया झळका : भासळत सूर्ये[9]-तेज		७१०

उंचपणं देखौनि[10] तेजाचें : दांग उमळलें[11] प्रकाशाचें
कीं पाळेगण उभलें[12] अरुणाचें[13] : देवाचिये भेटीलागी[14]		७११

कीं आनंद-दिवाळियेचें तेज : कीं आकाशीं जोतिचें जौळ हों काज
कीं गगनासि वाइलें भोज : यादव-प्रतापाचें		७१२

१ द. जीजेति. २ क. कुटुंबनायेकु. ३ ख. सुमनाचा. ४ कखम. विस्मयो. ५ खदम. करीत. ६ खद. संभोगाचें. ७ कद. छेत्र. ८ द. उचलुनि. ९ म. चंद्रसूर्यें १० खम. उच्चपण देखिलें. ११ द. उन्मळे. १२ द. उभविलें. १३ क. वरुणाचें. १४ क. भेटीचें.

कीं राहो-भेण दिनकरें : समुद्रीं ठेविलीं तेजाचीं भांडारें
कीं गगन-डाउ डवरिला सेंदुरें : प्रकाशाचेनि ७१३
ऐसी देवाची नगरी देखौनि दृष्टी : उतरले घोडेया तळवटीं
मग दंडवतें[1] घातलीं पोठीं[2] : मुक्ति-क्षेत्र म्हणौनिया ७१४

## ८१

### द्वारकेभोंवतींचा खंदक.

मांघौतें[3] वळघौनि वारूवांवरी : हरित आरव देखिले चौमेरीं
कल्पवृक्ष-मांदार हे परी : नगरा आरूती ७१५
तेथ नगरा बाहीरि वाडीपुढां : चौमेरीं समुद्राचा वेढा
तो[4] पाताळौनि अगड़ गाढा : तो कैसा सांघों ७१६
ते जैसी वरुणाचिये सेजेची ताटी : कीं श्रीकृष्णा अवर्णोदक आलें भेटीं
प्रळये-मेघ करितानि घरटी : द्वारकेसी ७१७
गळाळे आवर्त उभड वळसे : उकाळिया उलाळे[5] धारसे
दापातेया सावजाचेनि रवसें : गार्जत[6] गगनेंसीं ७१८
तेथ बोहुर सुसर मगर मासे : नानाविधें जळचरें जळमाणुसें
तियें उडौनि गगनीं घेवों[7] पांति आविसें : नक्षेत्रांची ७१९
तेथ तरिया तारूवें दोनि प्रव्हाणें : नावा होडीं बेडिया जंगें[8] विस्तीर्णें[9]
जयाचेनि न दीसेति उंचपणें : मेघ अंतराळिचे ७२०

१ द. दंडवत घातलें. २ क. परिपाठी. ३ कम. मग. ४ द. *
५ क. उलाळत दाट ६ कद. गर्जत. ७ द. घेउं. ८ दखक. जुगे.
९ कख प्रतींत ही ओवी पुढीलप्रमाणें आहे. "तरिया तारुवें दोनी : प्रव्हाणे चिनी : जयाचेनि न दिसेति उंचपणीं : मेघ अंतराळीचे."

## ८२

## वनोपवनांचें वर्णन

ऐसा सुदेवें देखिला सागरू : सवेलातें दावी चमत्कारू
मग तारुवें[1] उतरौनि पैलपारू : पावलों[2] सेवकेंसीं ७२१

तेथ मेघांची वीनि साधिली गगनें : तैसीं चौमेरीं[3] दिसेति उद्यानें
कीं तें उपेणें केलें जळसयेनें[4] : भूवनीं आंधाराचिये ७२२

जिथें वनिचिया झाडळी : श्रीकृष्ण-कांति[5] पडप[6] लाधली सांवळी
तिया रंगाचिया बाहाळी : गगन बोसांवलें[7] ७२३

करूनि कस्तुरिचे वाफे : लाविंजति[8] इंद्रनीळाचीं रोपें
तैसीं वनांचीं निळीं मातुळपें[9] : परिमळेंसीं ७२४

कीं तें वसंताचें वेलाउळ : कीं मकरंदाचें जौळ
कीं देवाचिये वोळगे आलें पाउळ[10] : वनदेवतांचें ७२५

पुर्वे दिसे सुधावन : अग्ने मिरवत विळास-वन
दाक्षिणे[11] उभिले पाळेगण : राजवनांचें ७२६

नैरुत्ये क्रीडा-वन उदार : पश्चिमे लक्ष्मी-वन सुंदर
वाव्ये दिसे केलें बिढार : कंदर्प-वनें[12] ७२७

उत्तरे वसंत-वन अचाट : इशान्ये शृंगार-वन बरवंट
इयें देवातें ओळगावया बनें[13] आठ : धाडिलीं लोक-पाळीं

१ ख. ताकई. म. तारुवीं. २ कखम. पातला. ३ द. चोंपसीं ४ द. जळसेनें. ५ क. कांतीची. ६ म. पडिपळ. ७ खम. बोझा° ८ खद. लावीति. ९ खम. मातळपें. क. उमटत तळपें १० द. पहुळ. ११ द. उभविलें. १२ क. °वनाचें. १३ म. वनें.

[1]भंवते सोळा सहस्र उपवनें : तियें वनींची सांघतां रचना
ते आणिन श्रोतेयांचेया मनां : पुन होइल अती–प्रसंगु ७२९
छतीस गाउवें[2] द्वारका नगरी : भंवती बनांची दाटि छेत्राकारी[3]
रुंदीया सोळा गाउवें माझारी : अगडा आरौतीं[4] ७३०
कैळासीं मेरूचां वरिवंटीं : नंदनवनीं सत्येलोकीं वैकुंठीं
जया झाडांचिया नाइकिजेति[5] गोष्टी : तियें बनीं द्वारकेचां
मुरारीची जवळिके[6] जालेया झाडें : स्पर्शे परमानंदु जोडे
म्हणौनि देवचि अवँगले कोडें : वेप सुरतरूंचा ७३२

## ८३
## वनोपवनांतून वसंतऋतूचा विलास

तेथ रीतु–रावो वसंतु : आपुलेनि परिवारेंसीं मूर्तु
मन्मथ–नाथातें वोळगतु : अनंगु जीर्वावेया[8] ७३३
तो जैसा श्रृंघराचा साहानीं[9] : कीं रतीचा वरिकरनीं
कीं कामाची कीर्ति लिहिता श्रीकरणीं[10] : वहिये सुमनांचिये
कीं भव–राहाणिंचा मातावळु : कीं अष्ट–भोगांचा गोंदळु
कीं विषये–सुखा सुकाळु : नानाविधां तो ७३५
नां नां तें सूंदर्याचें राहाण : कीं संभोग–सुखाचें माजवण
कीं तें अनंगाचें पालाणलें साहाण : त्रिनेत्रावरि ७३६

१ दम. वनांभंवती. २ द. योजनें. म. गांवें. ३ ख. सता ४ कखद. आरुतीं. ५ क. नाइकेजति. ६ द. जवळिक ७ द. अवगले सपरिवारीं मूर्त्त कोडें : मन्मथनाथा वोळगावया. ८ ख. जीवत्वावेया. ९ क. राहाणी. १० द. श्रीचक्रपाणी. कखम. श्रीचरणी. ‘ श्रीकरणीं ’ पाठ टीप ग्रंथांतून घेतला आहे.

कीं तो काम-तत्त्वाचा सर्वदा : वित-रागातें आणीतुसे[1] दंदा
अखंड जैत दे प्रमदा : संप्रामीं सुरतेचा[2] ७३७

कीं ते संभोग-सुखाची दिवाळी : विरहिणीं धेंढवाळिया[3] होति काजळी
जित-इंद्रियें हारवीति तिये वेळीं : जूं वैराग्याचें ७३८

वसंतु ना ते रितु पाउसाळी : कोकिळांचेनि गाजें परागांचा जौळीं
वरिखत[4] मकरंदाचिया बरंगाळी : श्रीमंत चातकावरि ७३९

तो आगें चंद्र-गर्भू गोरा सांवळा : निळोत्पळें जितलीं डोळां
वेढिला पद्मरागु सोनेसळा : हातीं लीळा-कमळ ७४०

मदना-पुसि रूपें सविकारू : आंगीं चंदनाचा[6] ठकारू
विचित्र कळे-कामांचा अळंकारू : माथां फुटा आंबेपालवी

संभोगें फुलले भोग : मदें ढुलती डोळेयांचें आंग
आंधारीं हीं दान सराग : वर्नदिविचें[8] ७४२

ऐसा वसंतु मदन-कैवारी : मळयानिळा माताइतेया वरी
कवणि गाढिका[9] बनां भीतरीं : यत परिवारेंसीं ७४३

सवें चूत-चंदन साती-घरीं : पद्मिणीं विजिती मृणाळांचां चवरीं
जवळि सरोवर कऱ्हेरी : हडपु अनंगरागु[10] ७४४

पुढां चौंकुडते कस्तुरी-मृग : चवरियांचे पाडे उभसिंग
ते सडक्कि सींसा बळिये सैंगं : भारासिंग कोंतेकार[11] ७४५

१ कम. आणीत. २ द्. सुरतरूचा. ३ म. ढेंडे॰ क. ढेंढे॰ ४ कद्म. वरुशत. ५ क. रंगु. ६ क. हरि॰ ७ द्म. रूळले. ८ द्. वनदेविचें. ९ ख. गाढिया. १० कख. अनुरागु. म. अंगरागु. ११ क. कौतिकार.

बनकरींचे भाव जाइल[1] गडे : ते[2] चालते धनुवाडे
आडवागौनि[3] कापखंडे : लपवीति कटाक्षांची[4] ७४६
तेथ राजहंसाचिया झाका : ते संख-भेरी आढाउं आईका
चालती कुंचासीं गाढिका : दुकवळा[5] मयोरांचा ७४७
चक्रवाक चकोर फळेकार : दापाति जवादिये[6] लेकार
भारी बहु सावांयांचे[7] असिवार : ते चालती मोर्चे[8]-घसणी ७४८
तेथ साळेया पुंसे चर्बट : ते वसंतां कैवारू करिते भाट
पारवे घूमति[9] येकदट : ते येकि घाइ नीशाणांचीं ७४९
पक्षियांचे शद्ब सुरंग : तिये सेनां-वाधें वांजताति[10] सैग
मधुकर वाति काहाळी चांग : कळी[11] सुमनांचों[12] ७५०
इळदुवांचे[13] पिलुके : मुखें विन वाति रूपकें
कोकिळा मंगळ-रागु कवतिकें : गाति गाढिकासी ७५१
कैसें रितु-रायाचें राहाण : अबळां ये अनंगाचें अवतरण
भलेतेया चढताये माजवण : विषयाचें[14] ७५२
वसंतु माजिरा कैसा : सूर्यातें[15] करीं पद्मिणीं धरी दिसां[16]
दिनकरू भूलला तेया रसा : म्हणौनि वेगां न ढळे ७५३
तेथ सूमनें आलीं दसे : विस्वाचां मूखि नागवेलि वसे
जग आस करीतुसे : पाणि पोटीं सुआवेया ७५४

१ क. जाणे निजगडे. २ द. ते संग. म. तैसे. ३ द. अडवागुनि. ४ कख. °क्षाचे. ५ म. दुकुळा. ६ खम. °कातिए लेकार. ७ क. सावाचे. द. भावाचे. ८ कख. °ताचे. ९ क. घुमघुमति. १० ख. वाजेत. ११ द. * १२ द. °नांचेया. १३ म. °वांचीं. १४ कद. विषयसूखाचें. १५ द. सूर्या. १६ म. दिवसा.

तैं कस्तुरिया चांग मालाथिलें : कापुरें विश्वाचां मुखीं उरविलें
चंद्रें जग अळंकरिलें : आपुलां करीं ७५५

वालिप आंगेंसीं कीजत : चांदिणेया खेंव दिजत
चंदन राणिवे बैसत : स्पर्श-सुखाचिये ७५६

मदन--सुखा राणिव जाली : काम-शास्त्रा प्रधानिक आली
कटाक्षाचीं दळें खोळलीं : तरुणेया वरी ७५७

जालीं कुंकुम--कलोळें आंगें सुकुमारें : सिणेति रत्नांचेनि अळंकारें
म्हणौनि पोतासाचीं हळुवारें : लेणीं लेइजति ७५८

तेथ बिरू चढलें श्रींघारा : सिग वाढीनली विकारा
पाणकेळी जालिया रुचिकरा : अधिका अधिक ७५९

नानाविद्धें सिंपणीं होतें सैंग : परागाची धुळिवाडी सुरंग
वोलिसिलें दीसत वाणेलग : कुंकुम-कस्तुरिएचें ७६०

सिंपणारीं खेडकुळिया : चंदनाचे हिंदोळे पाणि--तुळियां
फुलांचीं सेजारें उसासिया : सेजा परागाचिया ७६१

तेथ कनक--मृणाळाचे वालिप : संध्यारागाची धुळिवाडी जगझांप
चांदिणेयांचें लेणें हिमरूप : हे मुरारि मेचु ७६२

कोकिळांचिये श्रृतीचेनि रंगें : अमृत पंचमें वसंत रागें
मन्मथ--नाथु गातां अनुरागें : दिसा होति सावगणी ७६३

१ मद्. क्षेम. २ क. खोलविली. ३ कख. °लोळं. म. कल्लोळं. ४ क. लेइलीं. ५ क. सिंपणें वरिशत. ६ मद्. °रीचे. ७ कख. °तुळेया. ८ कख. उसि° ९ क. धुळकली. १० द. °पंचमें. ११ द. गाती.

पान करूनि मकरंद-मदु : ढुले मळयानिळु मंदमंदु
तो सुमनें देखौनि कळाविदु : जाला हिंवाचा ७६४

मळयानिळाचें आकर्शण : मानिनियांतें मेळविति तुडताळेवीण
तेथ प्रेमें-कळहीं कवण : रुसत असे ? ७६५

तया रितुरायाचेनि रजें : कामिनियांचा वेधु कवणां नुपजे
झाडें डोहळैजताति माजें : स्त्री-सुख भोगावया ७६६

अनंगा केंउतें हातियेर : हातीं उंसाचा मेढा फुलांचे सर
दळीं वसंता ऐसे जुझार : म्हणौनि जिणे देवांतें ७६७

कैसे कुसुम कामाचे तिर : जया नळा सारिखे सर
पांतां बाणांचे आकार : बाचटु अमोदाचां ७६८

कैसीं कुसुम रजें माजिरी : भलेतेही जात चांचरी
तेथ विरहिणी गेलिया पामरी : तें काइं सांघों ! ७६९

ऐसा सुदेवें देखिला साटोपु : तो रितु-रावो मदन-प्रतापु
मरारिचा करीत निरोपु : चाळकु अनंगाचा ७७०

तो पालवी महुराची दे/सुती : फुलांचिया वोतां अवधीं स्वहस्तीं
अमोदाचे पाटे वोपीति वनस्पती : आंगसिकें देउनीं ७७१

१ **दम.** मकरंदु. २ **क.** डताळेवीण. **ख.** डडाळेवीण **द.** तुडताळपणें. ३ **द.** प्रेमकळाही कवण कवणे : पूसत असे. ४ **म.** केउता ५ **खदम.** आन. ६ **द.** दळातें. ७ **द.** बासट्ट. ८ **कखम.** वोपी. ९ **खद.** आंगसिकीं.

## ८४

### श्रीकृष्णाच्या स्वागतार्थ वनदेवतांची तयारी

वनदेवता दे सुचना : म्हणे " मन्मथ-नाथु यइल या वनां
जन्म देयावेया मदनां : रती कारणें " ७७२

वसंतु वन-देवतांशीं सांगे गोष्टी : तेणें उठीति[१] अनंगाचिया दाटी
म्हणौनि विषया जगजेठी : माल्हाडी नाचताती ७७३

तेणें तोखें सदाफळें झाडें : वनश्री सांसिनली चहुंकडे
जैसी रितुरायाचीं राउळें प्रचंडें : उभिलीं वोळिलगें ७७४

तेथ परागाचे सडे सुरंगे[२] : वरि फुलाचे चौक अनेग
गगनीं पडत वाणेलग[३] : सपल्लव गुढियांचें ७७५

महुराचीं तोरणें बहुवसें : फुलांचा चांदोवा फळांचे घोंसे
भीतरि कळियांचे[४] लाखोवे[५] कैसे : सोने-चांपयांचे ७७६

सकळ सुखांचा रावो श्रीरंगु : उद्यानीं करील संभोगु
म्हणौनि वनस्पति उछावो[६] चांगु : केला भेटावया ७७७

## ८५

### द्वारकेच्या वनोपवनांतील वृक्षांचें वर्णन

आनंदाचिया खेडकुळिया चोखी[७] : तैसा बोली देशीं सुमुखीं[८]
दाविन बहु वाणितां वारीखीं : साहित्य-रसाचां ७७८

१ **द.** उठी अनंगाची. २ **कख.** सैग. ३ **द.** वान° ४ **द.** कळिकांचं. ५ **द.** लाखवे. **ख.** लाखैवे. ६ **कख.** उत्सावो. **म.** उत्साह. ७ **कख.** चौखी. ८ **द.** सुद्धमुखी.

तेथ काम वसंत बनकरू : पाणी[1]-काढे साते सागरू
बोळी[2] धरी चंद्र पवनु चतुरू : श्रृंघारु लावणी[3] करी ७७९

पारमळें बासटौनि[4] रुद्रा-दोषें : अनंगें पेरियेलीं हातियेराचीं रोपें बहुवसें
बनां-भवते जित कुंप कैसे : कंदर्प-केतकीचे ७८०

आवधी आळी राखौनि चोखांडी[5] : ढाळिली चंद्रकांताची[6] पापडी
तें[7] पाणी सैंभ पडे पाखाडीं : मुख-चंद्रीं प्रमदाचां ७८१

येकें आळी भरिली मधा : येकें हिरविया दुधा
येकें गुळ उस रसा सावधा[8] : येकें मृगमदासि[9] ७८२

येकी आळां रसु घापे : येक वारुणिया भरिजेति वापे
येकें कामिनियां सिंपीति रोपें : गुंळळियावरी[10] ७८३

तया रूखांची उंची कवणु जाणे : फुलां-आंतु[11] भासळत तारागणें
साखां फळांची[12] दिसा देति वाणें : पालवीं झांकौनिया ७८४

वनांची थोरी सांघों कैसी : वारा उपलवी[13] परागाचिया[13] रासी
ते सैंभ सेज होताय जैसी : पडतेया[14] फळांलागी[15] ७८५

तिये वनीं दीपदीपांतरिचिया अवधी:स्वेत-द्विपिचिया नारियेळी नानाविधं
सांखि[16]-दिपिचिया प्रसिद्धी : वेली फळांचिया[17] ७८६

१ द. पाणि काढत सातही° २ द. दारें. ३ द. लावण्य. ४ द. बाषट्. ५ कम. चोखंडी. ६ द. कराची. ७ कख. जैसें. ८ द. गुळ उंसाची वधा. क. गुळ उसाचेया रसा सावधा. ९ द. मधासि. म. °मदाची. १० ख. गुळळीवरी. ११ खम. फुलांतु. १२ कख. फुलांची. १३ द. उपणवी परिमळाचिया १४ क. पडिलेया. १५ द. फुला° १६ क. संख १७ ख. फुलां.

वोळगावेया वनमाळी : स्वर्गिंचिया उतरलिया फळोवळी
तैसे घड दिसताति अंतराळीं : सुर-तरूंचे ७८७

पुजा करावेया गोपाळीं : राये-खजुरी सुर-पोफळी
घड बांधेति गगनांतराळीं : फुलौरा नक्षेत्रांचा ७८८

सदाफळां आंबेयाचे टंके : तेथ अम्र पंचमांचेनि अंशुकें
कोकिळा गाताति रूपकें : राया गोविंदाचीं ७८९

इंद्रा-भेण पाखिसीं पळाले : मळयाचळाचे गुढे द्वारके आले
तैसे चौ-मेऱ्हीं चंदन देखिले : परिमळें मोडत ७९०

साइ-पन्हेरें जालें सफळ : तैसे सोने-जांबुचे रूख सदाफळ
पिकलेयां फळां-रसाचे खळाळ : वाहात कनक-रसें ७९१

तेथ गरुडें वीणि साधिली : तैसीं सोने-वखेयांचीं पिलीं
मधु-केसरावरि बैसली : चारा वांटितें ७९२

मेघ वीणि साधिती बहुवस : आवळेयां ऐसे मोतियांचे घोंस
तैसे मांडवीं घड सुरस : क्षिर-द्राक्षीचे ७९३

माधवी-मंडपाचे विणे : तेथ पक्षिय सिकारपणें
देवाचीं रूपकें वाने : गाति बनकरीं-सर्वे ७९४

कीं तो चकोरा करावेया पाहुणरू : तेथ आणुं पांत चंद्र-सेखरू
म्हणोनि गगनीं बांधत सायारूः तिहीं लोकींचां ७९५

१ म. फळा २ कखम. गगनांतळीं. ३ ख. टंके. ४ क. असिके द. अंशें येकुं. ५ द. वोसंडत. ६ कद. * ७ ख. ओवीं. ८ द. सारिखे. ९ क. गात ख. गाते.

देवा भेटि देखावयालागीं : कनक फुलले [1]अनुरागीं
तैसिया दिसताति राय-मातुळंगी : कुंकुम-कल्लोळीं ७९६

ठाइं ठाइं मधुकेशरिया सुरंगी : उमां-वनिचिया नारंगी
संध्यारागा-सारिखिया सर्वांगीं : दाटि फळांची ७९७

मुरारिचे [2]दशन देखौनि साजिरे : हिंपुटीं जालीं पद्मरागाचीं भांडारें
तैसीं दाडिंबें [3]तडैलीं निडारें : [4]वनें दाडिंबिचीं ७९८

तेथ [5]राय-जंब्रीरिचिया वोळी : [6]सिंहीं वनिचिया सोनेकेळी
दिपांतरीचिया रितुपी सरळी : दुधावळिया ७९९

वैकुंठिचिया अवधी बहुवसा : कैळासिचे मधु-फणस
नक्षेत्रा सारिखे बोरिंचे [7]घोंस : बद्रिकाश्रमिचिया ८००

तेथ क्षिर-तरूचिया जाळी : आकाशा उमाणिति झाडळी
जैसा चढावा करित फळीं : नंदनवनेंसीं ८०१

तेथ नव-रत्नांचीं तळगें : तैसीं [8]वनीं पाखिरूवें अनेगें
आपुलालिया सादाचेनि [9]रंगें : जिणेति किन्नरातें ८०२

कल्प-तरू-पासौनि उदार : अमृता-पासौनि [10]वोतीं मधुर
ते रूख दीसती एकैं निरंतर : उद्यानीं द्वारकेचां ८०३

वनीं सौरसु नाहीं सूर्येकरा : तरि सुरतरू केवि दिसे[11] आंधारा
पुण उजियेड होय गोरा : आंग-कांतिचा ८०

१ द. रसें° २ द. दास्य. ३ क. तरडेलीं निढारें. ४ द. घडीं दाळिंबिंचा. ५ द. गज° ६ दम. सिहु° ७ खम. बांरांघांस. क. बोरियाचें° ८ म. वन° ९ द. योगें. १० द. * ११ द. दिसती.

## ८६

## उद्यानांतील इतर वनस्पति

भीतरि बारवा कास्मिर-बधा : रत्नांचिया वीहिरि नानाविधा
खातां प्रतिमां प्रसिद्धा : सहस्रनामांचिया ८०५

मेघ-मंडळीं धनुपाचिया हारी : तैसीया सुरंगा बनां-भितरी
वोंखदिया दिसताति चौमेरीं : कनक-जांबुचियां ८०६

मधुकरांचिया गोता : जो अमोदु दे सायोजेता
तया वेधँ-चांपेया-तळीं वनिता : त्रिसंवती रती-सिनलिया

भवर आंबेयाचा उपरवोळा : गाति मधुकरी रंग-बाहाळा
अनंगु जीववांवया जगदळा : वादें कमळा-स्वतुरासीं ८०८

लाविलीं कस्तुरियेचीं झाडें : तैसे पाडळीचे मांदाडे
सैंधें पाल्हैलीं जुंबाडें : कृष्णागराचीं ८०९

मकरंदाचे मेल्लिकार : तेसे आंळले रती-केशर
तेथ गोंदळु खेळेति मधुकर : मधुकरींसीं ८१०

वीक भरी मदनाचें हातियेर : तैसे फुलीं तळपति कर्णिकार
उघडलें मोतियांचें भांडार : तै सींधुवारें ८११

घाटौळीं सहश्रदळीं : कुंकुंम सेवतीं भ्रमरांची हाउळी
मकरंदें मनें व्याकुळें केलीं : मुनीश्वरांचीं ८१२

१ द. अंाशधिया. २ ख. जांबुळीचिया. ३ क.द. वेधु° ४ म. जीववाया. ५ द सैंभ. कख. सेंग. ६ कख. °गरुचीं. ७ द. ओळिले रतीचे केशर. ८ द. °पत. ९ क. सींदुवारं. द. °वारी. १० कख. कुंकुमकेसराचिया हाउळी. ११ क. मुने°

मधुकर रसाचां सेजारीं : कोकिळांचां श्रुतिसंचारीं
राहाण मांडिलें सोगौरीं : आळवीति [1]अनंग मेचु ८१३

ठाइं ठाइं कुंकुम केशरासम : असोक बकुळ पुंनाग उत्तम
बचकुंद कल्हार पराग दम : चारु-केशर ८१४

[2]वोरौनि वाटोगरी मल्लिका : मदन-मोगरे कर्पुर-कर्णिका
परिमळें भ्रमराचिया देशका : आन वाताति ८१५

[3]वसंताचीं नाणी नगरें : कीं कामांचीं बिजाक्षेरें
तैसीं मकरंद-भरें : फुलें लोटताती ८१६

तारुण्य-नगरिचिया [4]सांता : कीं नवया लावण्यांचिया चळथा
तैसिया मुग्धा मन्मथ-नाथा : भेटावया फुलें वेचिताति ८१७

चं[5]दनलता चं[6]दन-पुष्पीं : ऐरवतिया अनं[7]गचापीं
तेथ मधुकर फुलांचा मार्पीं : मविति मकरंदु ८१८

## ८७

## वनस्पति व वनदेवता यांचा संवाद

बनां भितारिली क्रिडा [8]येकेंकी : पाहों येति गंधर्वांचिया बटकी
ह[9]रिणातें वेधिती [10]सैराचां झांकीं : त्यागा कस्तुरी नेति ८१९

वनस्पती वनदेवता सप्रेम : येकमेकां बोलती निरुपम
म्हणेति "आरिखें असैल परब्रह्म : मुरारिचें रूप [11]पांहुनि ८२०

१ **म.** रंग° **क.** अनंगमेघु. २ **ख.** करूनि. ३ **द.** वसंताचेनि नागरें. ४ **ख.** साथा. ५ **कख.** चंद्र° ६ **खम.** चंद्र° ७ **द.** अनेग. ८ **क.** एकाकी. ९ **द.** हरिणींतें. १० **म.** स्वराचां. ११ **ख.** पावुनि.

पांतां श्रीचक्रधराचें रूप : चैतन्यातें झळंबी वोंप
तें लावण्य कवणां कळे उमप : कटाक्षीं क्षेवें[1] देतां" ८२१
येकी म्हणेति "सुंदरू पाहों निरूता : तरि देवोचि देखों भवता
कीं तिया बाहुलिया स्वरूपता : आमचिया डोळेयाचिया"
येकी म्हणेति "हां वो निरूतें : तुम्हां[2] दृष्टीं देखवे मुरारितें
आम्हां आनंदाचें चढैलें भरितें : श्रीचरण देखिलेयां ८२३
वैरुतें रूप पाहों सायासें : तरि दाटेति डोळेयांचे वळसे
मग माझा जिउ चरणीं समरसें : श्रीचक्रधराचां" ८२४
हा संवादु माळधरांचिया लेंकी : बोलती बनकरांचिया बटुकी
सरोवरीं गोष्टी करीति कवतुकीं : वनदेवता ८२५
हेंचि राजहंस सोगौरी सांघती : कोकिळा चातकीसी संवादती
साळैया व्यक्त बोलती : पुंसैयाचेया[11] वल्लभेंसीं ८२६
तेथ समुद्रीं मोकलिलें कटक : तैसे सैग सरोवर अनेक
तुंब वाहातां गादलें उदक : तो जाला क्षिरसमुद्र ८२७
येका कनकाचिया पाळी : येक बांधले रत्नांचां सिळीं
आंतु पद्मिणींचिया वोळी[12] : अनेकविधा ८२८
नवरत्नांचें विरुढलें बीं : तैसीं नानाविधें कमळें लांबीं
वरि खेळत हातलोंबी : मधुकर मधुकरिसीं ८२९

१ **कखम.** क्षेम. २ **कद.** तुम्हीं दृष्टी देखिलें° ३ **कखम.** चढे. ४ **द.** वरोतें. ५ **म.** पाहावें. ६ **म.** माळाधरांचिया **द.** मागिला धुरांचिया. ७ **क.** हांसतु. ८ **द.** °तांसीं. ९ **क.** °हंसी. १० **द.** चातकेसी. **क.** चातकी. ११ **खम.** पुंसेया. १२ **कम.** जाळी.

मृत्यलोकीं [1]क्षेणिकें अंबुजें : म्हणौनि अम्लानें [2]अंभोजें
ते द्वारके धाडिलीं वैकुंठराजें : देवदेवांलागी ८३०

जया कमळांचा परागु : माघौता जीवंवी अनंगु
बरवा आणिला लक्ष्मीयेचां अनुरागु : जाली कमळालया

कमळीं षड्पदांचियां रेखा : जैसी रतीची विनती आदि–पुरुखा
म्हणे मदनु होआवा देवासारिखा : मजलागी ८३२

८८

देवांनीं घेतलेल्या वृक्षावताराचें वर्णन

मुरारी वोळगावेयाचिये चाडें : वैकुंठरावो रुद्र कोडें
चतुराननु इंद्र जालीं झाडें : तेथ नवल काइसें? ८३३

येकां बुंढें संध्यारागाचीं : खांदिया डाहाळे इंद्रनिळाचीं
नक्षेत्रां ऐसीं फुलें फळें चंद्राचीं : तया नांवें इंद्रगगन ८३४

रसरजनां पाचिचें बुढ : सोनेयांचिया शाखा पालव दादड
फळें जैसे नक्षेत्रांचे घड : महुरू नव–रत्नांचा ८३५

काम–केशरां आंगें चंदना ऐसीं : कस्तुरियेचे डाहाळे पानें सातसीं
फुलें कर्पुराचीं कमळें जैसीं : फळें अनंग–जीवनें ८३६

येकां हरिचंदनाचें आंग : पारीजातांचीं पानें फुलें पराग
कल्पतरूचीं फळें अनेग : देव–वल्लभा ८३७

१ क. क्षौणिकें. २ क. आम्हा भोजें. ३ ह्. धाडिलें. ४ ह्. जिवाविला. क. जीववेया. ५ क. °पदाची रेषा. ६ कह्. जाला. ७ ह्. बुडें. ८ ह्. इंदुगगन. ९ ह्. जैसीं. १० क. जीवमणें. ११ कख. °जातकाचीं.

यां रूखांतें डोळां देखे : तयां वैकुंठिचीं होति सर्व[1] सुखें
विपायें[2] दैवें जो चाखे : तया रिधी उपजती ८३८
वनस्थळिचिये पेठे : भवर परिमळाचे उ[3]घटे
तेथ वनीज वाहाति चाटे : मळयानिळा ऐसे ८३९

## ८९

### यादव कुमारींचा वनविहार

तेंथ यादवांचिया कुमरी : मातांवळिया मदन-येक्षिणी खेचरी
सिंपणें खेळताति[4] सरोवरीं : वन-देवतांसीं ८४०
तया नानाविध श्रृंघार : केळियांचें[5] लेणें अठवार
मृनाळ वोलि सेले सपुर : चांदिणेया पाँसोनि[6] ८४१
साउले वेढुनि पोफळ-गांठी : वाखोरेया देउनि वाय-गांठी
येकी ताणूंनि कुचतटीं : खांदेसी अंशुक[7] आणिती ८४२
कैसे दीसताति अवयेव : एकमेकां प्रमदा उपजेति[8] भाव
मनां होतें[9] दादुलेपणाची हांव : जऱ्हीं नपुंसक जालें ८४३
नेणों कैसें हास्याचें चांदिणें : जेथ कर्पुर चुरिचें सिंपणें
भांसळे[10] रुपाचेनि गोरेपणें : मळनें परागाचें ८४४
करतळें रंगें कालौनि केसकें : रांविती सुगंधें उदकें
निळयाचे धोटे नव्हेति ठाउके : घसणीं कटाक्षाचिए ८४५

१ खदम. स्वर्गसुखें. २ द. फळें° ३ द. उपटे. ४ ख. खेळती. ५ दम. °कांचें ६ द. पासुनी. ७ ख. असुख द. असुक ८ म. उपजताति ९ मद. होतुसे. १० खम. भांसळलें.

मुख–चंद्राचें चांदिणें उपलवे : तेथ कनकधार[1] नोळखवे
सुटत जळ–जंत्र नेणवे : होति[2] केळि–गर्भा[3] ८४६

जळ–केळि खेळत[4] संभ्रमें : आवडिचीं[5] पाचारिती वमैं
तो सराउ करीति प्रेमें : देवातें सिंपावेया ८४७

सिंपणेयाचां रसीं[6] : लूगडीं सरूपता पावति[7] आगेसीं[8]
जैसीं रत्नांचां पुतळिसीं : कांति वेगळी नव्हे ८४८

येथ येदु–रायाचें सिंपणें : तें कवतिकीं प्रसंगें मीं म्हणें
तरि कथे ठाकैल वाहातपणें : रसु आवरेना ८४९

## ९०

## सुदेवाच्या द्वारकेंत प्रवेश.

भवतीं बहुवसें साळि–वनें : तिया साळिचे वानियां काइ म्हणे
जयाचां गुणीं होये पारणें : पांचां इंद्रियां ८५०

तेथिचेया[9] पानांचे आगर कोण जाणे : आनानी[10] जातिचीं उसरणें
गुळ–साकर–माळखंडांचे घाणे : दिसती बनां भवतें ८५१

ऐसी[11] उद्यान–रचना अनेगी : सुदेवो सेवकां[12]–दावी प्रसंगीं
मग द्वारके आंतु रिगताय वेगीं : देवो देखावया ८५२

१ कख. °धारा. २ क. हाति. ३ ह. °गर्भीं. क. °गर्भ. ४ क. खेळतां
५ कख. आवाचितींचि. ६ ह. रवसीं. ७ ह. पावतु. क. पावेति. ८ ह. °यासी. ९ कख. तेथ° १० क. आनाना. ११ ह. ऐसिया. १२ ह. °कातें. क. °कासीं.

तेथ राजकुमरां हांतिची[1] लळेवाडि[2] : पांतें[3] वारूवांचीं वैहाळी[4] कोडीं
येकमेकां[5] सरौंउ[6] करीति[7] गरुडीं : पांरिवां खेळत ८५३
श्रृष्टिचेया नगर-देवता : ठक लागे ब्राहिरील वाडी पांतां
तो गांवो सांधें कैसा आतां : म्हणे नरींद्र ८५४

## ९१

### द्वारका नगरीचें दृश्य

पश्चिम समुद्रा नांवि[8] भास्वतु[9] : पांचसे गांउवें[10] रत्नांचा पर्वतु
तेथें[11] सैंभ[12] लेणें रचलें आंतु : द्वारका छेतीस योजनें ८५५
तें जैसें आनंदाचें दीप उदार : कीं सुखाचें मळय-पांचौर
ना तरि वेलाउळ थोर : ब्रह्मविद्येचें ८५६
कीं समुद्रीं स्वर्ग प्रतिबिंबत : कीं ते नगराकार उदक मुरत
कीं देवो जळ-मांडवी खेळत : समुद्रा-वरी ८५७
कीं तारकासुराचिये वाहारे : नक्षेत्रें पोटीं सामाविलीं सागरें
कीं रुद्रा-भेण समुद्राचेनि आंधारें : कटक राहिलें कामाचें
कीं श्रीकृष्णांची वेष दिवाळी बरवंट : वोवांळु[13] ऑली[14] ज्योति चक्र तेजिठ
कीं नवै निधी चेंरेति[15] येकवट : चारा ब्रह्मसुखाचा ८५९
कीं क्षीरसागराचेनि बिरारें : परब्रह्म पुजावेया आदरें
आपुली राणिव आणिली रत्नाकरें : मिसें द्वारकेचेनि ८६०

१ क हस्तिचेया. २ द. दळवाडी क. लाळवडी. ३ द. पांतां ४ म. जे हाळी. ५ कख. °वंका. ६ क. सासरति ख. सारवती. ७ द. येक° ८ द. नांवें. ९ क. प्रभास्वतु. १० कख. गाउवा. ११ क. तें. १२ कख सत्तीस. १३ द. म्हणौनि° १४ खम. आलें. १५ कद. चरेति.

कैसी द्वारका घणवट : चोजक्तिां [1]यकवीस स्वर्गे हळुवट
जऱ्हीं चतुराननाची पेठ : वरि कांटाळा घातली ८६१

मुरारिचेया नगराची आइकौनि थोरी : कैळासु [2]गेरिला तिये अवसरीं
लाजा अमरावती अनुष्ठान करी : तिरीं मंदाकिनीचां ८६२

द्वारकेचें देखौनि पवित्रपण : नपुंसक जालें वैकुंठ आपण
स्वेत द्वीप रिगालें भेण : क्षीरसागरीं ८६३

## ९२

### नगराभोंवतीची पौळी

भवती चंद्र–कांताची पौळि कैसी : गगन–सरो[3]वराची पाळि जैसी
तेथ [4]उपलवत चंद्र–सूर्या–ऐसीं : कुमोद–कमळें ८६४

कीं चांदिणें उमाणितें आंडमांप : नां तरि नक्षेत्रांची खोंप
कीं मेखळा बाणली सदीप : [6]साळां गगनांचिये ८६५

कैसी साहान सुद्ध पौळि चोखडी : वोप[7] पांतां दृष्टि खेळे निसरबोटी
मन [8]उचलौनि पडे [9]आगडी : हा[10]टांडी तें दुर्ग कवणां टाके !

पवळिचें उंचपण कवणी सरी : सूर्यू भांसळे माणि[11]कांचा
तेथ इंद्रनिळांचेया हुडेयाची थोरी : जैसे गुढर पर्वताचे ८६७

१ क. सातै समुद्र २ द. घारैला. ३ कख. °रीची. ४ द. °बतें चंद्रसूर्यो° ५ द. अड° ६ द. श्वासे. ७ क. वेम. ८ ख. उचौनि. ९ म अगडी. १० द. * क. हटियाडीं ११ द. रत्नांचां १२ क. परी.

## ९३

### त्यांतील दरवाजे

तेथ पाणि बारेया नवसें साटे : कनक-जांबुचे चौसटि दारवठे
वरि कुसरींचीं माडें तेजिठें : सोळा खणांचीं ८६८
तिये ठाइं नानाविधां कुसरी सैंभी : साटोपा सिंहाडेयां[1]चिया उभी
पुतळिया षड्‌विधा नाटारंभीं : दाखवी द्वीजराजु ८६९
दारवठां ठिकांचीं कवाडें : घालितां गाजेति[2] मेघाचेनि पाडें
दारवठेकार लोकपाळा सांगडे : सुदर्शनी[3]-तळीं ८७०
कोंइ[4] सांघों ते दारवठे अचाट : लोकपाळां[5] रिगतां येकवटें[6]
दारीं आठां दिग्गजांची घांट : माये[7] येके वेळे ८७१

## ९४

### इतर पौळींचें वर्णन

ऐसिया नव रत्नांचिया पौळी : येकेकीं[8] काइं सांघों वेगळी
जैसीं बोळगताति वनमाळी : मंडळें नव-ग्रहांचीं ८७२
पौळी निहटीं[9] सात आगड : पाताळौनि बोडवले अवघड
जैसें अगस्ती-भेणें[10] देवां आड : पडिले सातै समुद्र ८७३
दों दों पौळि माझारि रुंदी क्रिती : तीनि तीनि गाउवें जाणावी[11] निरूतीं
जैसिया [12]नवै निधींचिया संपती : मुरारिसि पांउड[13] आलिया

१ कख. सिंहाचेया. २ खम. गाजती. ३ कद. सुद्र-सेनांतळीं. ४ द. काये. ५ क. मितरी° ६ खम. °वाट. ७ द. समाये. ८ ख. एकेक. ९ द. नेहेटी. १० द. भेणें. ११ मद. जाण. १२ द. नवां° १३ खम. पाउडा.

बाहिरिली दों पौळी आंतु : अनंताचा परिवारु अनंतु
तेथ पगड यातिचा व्यापारू बहुतु : दिसतु असे ८७५

माझारिली ती पौळी भितरी : राउळिचीं साहानें[1] आयुध्यें चारी
तेथ थोवेकाराचां आवारीं[2] : होत दिसां भूलि ८७६

आंतुली दों पवाळिचां रवणीं : सवाये[3] लक्ष ब्रह्मपुरिया कवणी
तिया व्येऱ्हाइलिया चक्रपाणी : ऋषी[4]-ब्राह्मणासीं ८७७

नवांविये[5] आंतुल पैसु : तो बारा गाउवांचा प्रदेशु
तेथ वसताय लक्ष्मी[6]-विळासु : यादवेंसीं[7] ८७८

तेथ[8] मुखांचा अंकणा चंद : त्यागें जितिला क्षीर-समुद
तें कटक वानिताये कवि नरिंद : यादवरायाचें[9] ८७९

( अपूर्ण )

१ क. सीहाणे २ क. अवस्वरी. ३ क. वोवाळुं आली लखु ब्रह्मपुरी कवणी. ४ द. ऋषी-देवादिकां.° ५ द. पौळीं° ६ कद. रुक्मिणी° ७ द. यादविसों ८ द. तो. ९ कख. यादवाचें.

# शब्द-कोश

## अ

**अकाळ**–भलतीच वेळ. ५६८.

**अकाळ-वीज**–वाटेल त्यावेळीं चमणारी वीज. २४८.

**अखर**–अक्षर १९५.

**अखंड**–सतत, एकसारखी ५२६.

**अगड**–खंदक. ७१६, ७३०. उ. १९०, शि. ३१२.

**अगर (रु)**–अगरु; चंदनाचा एक प्रकार. ४२०, ५५०.

**अंग–उपांग**–सर्व अवयव; सूक्ष्मभेद १७८.

**अंगसीक**–अंगावरील वस्त्र. ७७१; उ. १६०.

**अ (आ) गाध**–खोल, पुष्कळ. ५५, ६९०.

**अग्नि दिसा**–आग्नेय दिशा. २५६.

**अग्नि-स्तंभ**–अग्नि शांत करण्याचा मंत्र. ५९३.

**अग्नि-होत्री**–घरांत सतत विस्तव प्रज्वलित ठेवणारा. ४७८.

**अचाट**–थोर; मोठा. ७२८, ८७१

**अंजणें**–डोळ्यांत (अंजन) घालणें. ५४७.

**अठवरपणा**–आठ वर्षांचें वयोमान, उपवरपणा, ३७२, शि. २०८.

**अडखुळा**–भयभीत, भेदरलेला. २९२

**अडणें**–आखडणें, निष्क्रिय होणें. ६८०.

**अति-क्षेत्र**–अधिक पराक्रमी. २३८

**अंतक**–यम. ३१०.

**अंतराळ**–आकाश. २८७, ५२६, ७२०, ७८७.

**अति-प्रसंग**–एखाद्या गोष्टीचा अनिष्ट अतिरेक. ७२९.

**अ (आ) तुर**–अतिशय, थोर. ४००, ५६२.

**अंतुर नायक**–बलिष्ठ पुरुष. ४८४

**अंतोर**–स्त्री, भार्या. २५३, ६०९.

**अंतोरी**–स्त्री, भार्या. ६४, ७४, १९२, २५०, २७१, ३०५.

**अदाता**–दान न देणारा, ३५७.

**अदुभणी**–दोहलें न जाणारें. ५६९.

**अदुहन**–दोहतां न येण्यासारखें २०

**अंदु**–पायांतील सांखळ्या, स्त्रियांचें पादभूषण. ८५; शि. ७१६.

**अधमुरें**–अर्धवट मुरलेलें, विरजलेलें ५५५.

**अधर**–खालचा ओठ. १६६.

**अधर-नीर**–ओठावरील पाणी, अधरामृत. ७०.

**अधिक**–श्रेष्ठ, थोर. १४५.
**अनंग**–मदन. ५६, २५६, ४२५, ६५३, ७३३, ७३६, ७५२, ७६७
**अनंग-चापा**–मदन-चांफ्याचें फूल. ८१८.
**अनंग-जीवन**–मदनाला जागृत करणारें, उपभोगेच्छा निर्माण करणारें. ८३६.
**अनंग-मेच**–मदनाला प्रिय असलेलें ८१३.
**अनंत**–(१) श्रीकृष्ण, परमेश्वर ८७५ (२) पुष्कळ, अमर्याद ८७५
**अनार्त**–सुखी, पूर्णकाम. ३५९.
**अनाथ-नाथ**–गरिबांचा स्वामी ६८४
**अनियाळपण**–तीक्ष्णता, तिखटपणा ९२. उ. ३६५. शि. ७१०.
**अनुघाड**–कानठळी. ५३०.
**अनुपान**–औषधानंतर घेण्याचा पदार्थ. ५६५.
**अनुराग**–प्रेम, आवड. ५७५, ७६३, ७९६, ८३१.
**अनुलेपन**–उटी, उटणें. ४४, उ. १५९.
**अनुवाद**–भाषण, पुनरुच्चार, सांगणें. ५७४, ६०७.
**अनुवादणें**–सांगणें. ६३८, ज्ञा. १०–३५.
**अनुष्ठान**–तपश्चर्या. ८६२.
**अनुसरला**–शरण आलेला. ६४०.
**अना ( नु ) हात**–स्वभावतःच निर्माण झालेला, न मारलेला. ९, ५२८, ५९४.
**अने ( ने ) ग**–अनेक, एकाहून अधिक, पुष्कळ. ५०, १७१, ७७५, ८०२, ८५२. ज्ञा. ६-१२.
**अन्यग**–अनेक, पुष्कळ. २९०
**अनोखळी**- (१) ज्याचें लग्नच होऊं शकत नाहीं असा. (२) अनाकळित, स्वतंत्र. ३६९
**अपाडें**–तुलनारहित, अतुलनीय. १९१. ऋ. २९२. ज्ञाप्र. ५२३ ज्ञा. ६-१४०.
**अपाव**–अपाय, अनर्थ, विपत्ति. ५१९, ज्ञा. ७८२.
**अफावणें**–बोलावणें. ६१.
**अफौ (फु) ट**–न फुटणारा, अभंग. ३७१.
**अबळा**–स्त्री. ३८४, ६८१, ७५२
**अंबुज**–कमळ. ८३०.
**अंबिका**–अंबादेवी. ६१२.
**अभंग**–गायनांतील एक छंद. १८५ उ. ४६३.
**अभार**–आभार, कृतज्ञता. ५०९.
**अभिचारक**–जारण मारण करणारा, मांत्रिक. ६०० शि. ८४३.
**अभिमुख**–समोर. २९०.

**अंभोज**-कमळ. ८३०.
**अमर**-देव. ४२, २७२.
**अमळ**-मलहीन, निर्मळ. ६८३.
**अमुरिव**-पूर्णपणें न मुरलेलें. ५८२.
**अमोद**-आमोद, सुगंध. ४७७, ५५७, ६११, ७७१, ८०७.
**अम्लान**-कधीच न संकोचणारें; नेहमी टवटवीत असे. ८३०.
**अर्थौनि**-अर्थांतून. १७५.
**अरुवार**-कोमल, मृदु, कोवळा. ५७८, ५८२, ८४१. ज्ञा. १८-१४२.
**अवकर**-कंटाळा, तिरस्कार. ५६०.
**अवकळा**-निस्तेजता, हीन दशा. ११८. उ. २४, शि. २७.
**अवगणें**-सोंग घेणें, वेष धारण करणें. ६३२.
**अवग्रहण**-नाक मुरडणें, तिरस्कार. ५७०.
**अवचित**-अकस्मात, एकदम ४७४
**अवतरण**-वारें, संचार, अंगांत येणें. ७५२. उ. ३५. शि. ८१३. ऋ. ४०४. ज्ञा. ११-४२.
**अवतरणें**-खालीं येणें, अवतार घेणें ४७९.
**अवतरविणें**-खालीं आणणें, साक्षात् उभा करणें. ३८४.
**अवतार**-स्वरूप, वेष. ५८४.
**अवधान**-लक्ष. ४३.
**अवधारणें**-ऐकणें. ३८, २०८, २३५, २९८, ६७६.
**अवाधि**-वेल, लता. ४९९, ७७१, ७८६, ८००. शि. ४९४.
**अवर्णोदक**-ब्रह्मांडाभोंवती व्यापून असलेलें पाणी. ७१७.
**अवलंबणें**-धारण करणें. ४४७.
**अवस**-अमावस्या ४८९ ज्ञा. ११-५
**अवस (स्व) रिणी**-वेळ सांगणारी. १०४.
**अवस्वर**-वेळ, प्रसंग. ७७, २१३, २९९, ३११, ३४९, ३६१,
**अवसर**-वेळ. ८६२. उ. ४७५.
**अवस्वरी**-जासूद, हरकारा. १२७.
**अविसाळ**-खोपा, घरटें. ४७६, उ. ४९०. ज्ञा. ११-२५८.
**अवस्था**-वेध, दशा, विरहाची स्थिति ३८४, ३९७, ४०८, ४०९, ५६५, ५७४, ६५३, ६६५, ६६७, ६८२, ६८४. ज्ञा. ६-१३१. धपू. ३१. उ. १७२.
**अव्हेर**-नकार. १५५, २७६.
**अंशकळा**-परमेश्वराच्या गुणरूपादि कळांचा लहानसा भाग, परमेश्वराचा अंशावतार. ३१३.
**अशंकणें**-संशय घेणें. ५८०.

**अश्वमेध**-एक प्रकारचा यज्ञ. यांत दिग्विजयार्थ सर्वत्र निर्विघ्नपणें फिरवून आणलेल्या अश्वाची आहुति देतात. २५३.

**अश्विनी**-एक नक्षत्र. ५३८.

**अष्ट-भोग**-आठ उपभोग्य वस्तु, सुगंध, वनिता, वस्त्र, गीत. तांबूल, भोजन, शय्या व भुवन. ७०३, ७०९, ७३५.

**अस्थानी**-सभा. ८५, ११२, १३३, १५७, १६७, ३४९. उ. ६४९, ६७७.

**असासित**-त्वेषाने, आवेशाने. ४७४, उ. ३२५. शि. ९८९.

**अस्ताचळ**-सूर्य जेथे अस्तंगत झालेला दिसतो तो, पश्चिमेकडील पर्वत. ४६७, ४७०.

**असिका ( की-कें )**-सर्व, सगळें. ३००, ३६६, ४३४, ५८७, ६०१, ६३६. ज्ञा. १७-१८७. अमृ. ४-३६.

**असिवार**-घोडेस्वार, राउत. २२६ ७४८. शि. ९३२.

**असिर्वाद**-आशीर्वाद, कल्याणकारक वचन. ६५७.

**असेख**-अशेष, सर्व. ४८.

**असुख**-असुख, दुःख. ४०५.

**अंशुक**-तलम वस्त्र. ७८९, ८४२.

**असोक( ख )**-अशोक वृक्ष. ४५६, ८१४.

**असोस**-असह्य, पुष्कळ. ४०४. उ. १२०, ५१७, ज्ञाप्र. ३१२.

**अस्तवणें**-अस्ताला जाणें, ४४५.

**अळंकरण**-अलंकार, दागिना, भूषण, ८४, ४५४.

**अळंकरणें**-दागिने घालणें, शृंगारणें. ७५५.

**अळवणें**-आळवणें, आलाप काढणें. ८१३.

**अळुमाळ**-थोडा, किंचित्. २८८. ६२३, उ. ७९३. अमृ. २-३० ज्ञा. ६-१७५.

**अक्षेपणी**-क्षोभ, राग. ४०१

**अक्षेर**-अक्षर, वर्ण. ५९३.

**अक्षोणी**-समूह, ३४७.

**अक्षोभ**-लौकर क्षुब्ध न होणारा, गंभीर, अगाध, खोल. ८७.

**अग्न**-आग्नेय [ दिशा ] ७२६.

## आ

**आइकवणें**-श्रवण करवणें. ११३.

**आइणि**-कौशल्य, अभिमान, गर्व. १५८, १९५.

**आइती ( त )**-सिद्धता, रचना. १६९, ४२३, ४४०. ७००. शि. ९१०. ज्ञा. १३-५९२. गो. २७९.

**आउया**-माता, आई, श्रेष्ठ स्त्री. ६८.
**आउस**-आई, माता. ४०३.
**आंकणा**-पायांतील अलंकार. यावर जित व्यक्तींचीं चित्रें रेखाटलेलीं असतात, अकित. ९८२, ८७९.
**आकर्षण**-आपणाकडे इतरांस ओढून घेणें, वेध, ओढ. ७६५.
**आकर्षणें**-ओढून घेणें. ६००.
**आकाश**-पोकळी. २३९.
**आखर**-(१) अक्षर, वर्ण. १०३, ६४३, ७७५; उ. २७; ज्ञा. १७-४२; अमृ. ७-२७८.
(२) गावाबाहेरचा भाग. ३१. उ. १०७; शि. ४५३; ऋ ७१. वच्छ. ६७; गो. २५२.
**आखुडणें**-लहान होणें, अडखळणें. ५३०.
**आख्यान**-कथा, इतिहास. १५४. ज्ञा. १-४६.
**आंग**-(१) स्वतः आपण. ५०९.
(२) विभाग, प्रकार. १८२, १८४.
**आंगें**-आपणहून, स्वतःच. ५५१.
**आंग-कांति**-शरीराची शोभा. ८४४.
**आगड**-खंदक, अगड पहा. ८६६, ८७३.
**आंग-भारें**-डौलाने, ऐटीने. ८२.
**आगम**-शास्त्र. २९.
**आगर**-घर, वसतिस्थान, समूह. ८५१.
**आगरू**-अगरु; चंदनाचा एक प्रकार. ५५०.
**आंगवण**-पराक्रम, सामर्थ्य. ४४७. उ. २१४, २३९. ज्ञा. ७-९२.
**आंगवळा**-सेवक, चाकर. ८१. धपू. ७२.
**आंगवळेकारी**-सेवा करणारी दासी. १०६.
**आंगावरी**-तारण-मोबदला न घेतां. ५०९. उ. ६३४.
**आगळा (ळी-ळें)**-निराळा, अधिक विशेष. ४१, ३९७, ४६४, ५८६, ५८९. उ. ४४९; गो. २६, १८२; ज्ञा. १०-१३३.
**आगियेल**-घर्मोदक. ५७६.
**आघात**-कोपरापासून मनगटापर्यंतचा भाग. १६६; ली. च. भा. ४ पृ. ४.
**आजानबाहु**-गुडघ्या पर्यंत लांब हात असलेला. ३२१.
**आझुई**-अजून, अद्याप. १४४. शि. ७८; उ. १४७, १४८. द. ५३.
**आटकतें**-अडणारें; ज्यामुळे अडून बसलें आहे तें; अवघड. ६२८.
**आटणें**-(१) गोठणें, थिजणें. ५४६.
(२) क्षीण होणें, वाळणें. ६६२.
**आटीलें**-आटलेलें, थिजलेलें. ४१६.
**आटीव**-पीळदार, कसलेला. ३२३.

**आठुवा**-भुज, बाहु. १६५.
**आडंबर**-बाह्य लेप, देखवा, भपका. १.
**आड-मांप**-मोजण्याचें साधन. ८६५.
**आडवणें**-अडणें, दबणें ५३२.
**आडिविया**-आडव्या, तिरप्या. ११४.
**आढाउ**-शस्त्रधारी, सैनिक. ७४७.
**आण**-शपथ. ३८६, ३८७, ६१२, ६९९, ८१५. ज्ञा. १२-१९६.
**आणिता**-आणणारा. ६४८.
**आति**-आहे. १३०.
**आतुडणें**-सापडणें, कळणें. १४१.
**आतुर**-थोर, मोठा. ५६२.
**आंतुल**-आंतील, मधला. १९९. ह. २; ज्ञा. ११-३८८.
**आदक**-धाक, भीति. ४६४.
**आदर**-सन्मान. ६५५.
**आदि-पुरुष**-श्रीकृष्ण परमात्मा. १४३.
**आदि-लक्ष्मी**-श्रीविष्णूची पत्नी. ६४१.
**आधा करणें**-अर्धा-अर्धमेला करणें, जर्जर करणें. ६६३.
**आधाटी**-एका भोपळ्याचें तंतुवाद्य. १७३, १७७. उषा १८१३, शि ६९७.
**आधी**-अर्धी, निम्मे. २०४.
**आनान**-निरानिराळा. ३१, ८५१. उ. ७२८; ज्ञा. ७-२३.
**आनानी**-निरनिराळी. ४२१. ज्ञा. १८-८९५.
**आनारिसें**-वेगळें, मलतेंच. ३६.
**आनि (णि) क**-आणखी, इतर, दुसरा. ७४, ६४०, ६४४, ६४६, ६४८.
**आपणपें**-आपणाला. ५७७.
**आपमुरें**-पूर्ण टणक न झालेलें, पूर्णपणें न बनलेलें. ५५५.
**आपसैया (आपैसया)**- आपोआप. ४१२. ज्ञाप्र. ८१३, ८१४.
**आपेस**-अपयश, पराजय. १९६.
**आपैसें**-आपोआप. ३३१. अमृ. ७६५; ज्ञा. २-१४२. ज्ञाप्र. ७६३.
**आफावणें**-बोलावणें, हाक मारणें. ६७२. धपू. १०.
**आबुट (बूठ)**-मेघ, ढग, ५८४, ६३१. शि. ६१६.
**आबुली**-स्त्री. ११८, ३७२.
**आंबे-पालवी**-आंब्याच्या कोंवळ्या पानांच्या रंगासारखा. ७४१.
**आमोद**-सुगंध. ५०३, ५३०, ६९३
**आमोलेपण** शौर्य. ७७३. शि. ९७९.
**आयुध**-शस्त्र. ८७६.

**आरव**-वृक्ष-समूह, राई. ६३१, ७१५. शि. २४९; ऋ. ७२. ज्ञाप्र. १९९.
**आराधना**-प्रार्थना. ३४२.
**आरिख**-आर्ष, असंस्कृत, अव्यवस्थित, खडबडीत. १२०, १६१, १९१, ८२० ज्ञाप्र. ७९२.
**आरौ (रु) ता (ती-तें)**-अलीकडे, अलीकडचा. २११, २३६, ७१५, ७३०; उ. ६३७.
**आर्घिला**-अर्घ्य देऊन पूजा केली. ४६९.
**आर्तपण**-वियोग दुःख. ६६५.
**आल्हात**-पिचकारी. ४३०.
**आवगणी**-वेष, सोंग. ३१५.
**आवघडणें**-अडणें, अडखळणें. ५३०.
**आवधी**-(१) वेल, लता. ८९, ३४४, ७८१. (२) सीमा. ८९.
**आवर्त**-भोवरा. ६३०, ७१८. ज्ञा. ७७२.
**आवळा**-एक फळ, आमलक. ७९३
**आविस**-आमिष, लालूच. ७१९. उ. २५९, ४६९.
**आस**-आशा. १९९, २५५, ५७३, ६४१.
**आस-कडे**-इच्छेची सीमा ३५५.
**आसिका**-सगळा. ६०१.
**आसी**-आशीर्वाद. १७४.
**आसुइं**-आसवांत, अश्रूंच्या पाण्यांत
**आसुडणें**-झटका देणें, दचकणें, वचकणें. ५३०.
**आसुवें**-अश्रू. २८४.
**आळणें**-आवळणें, बांधलें जाणें. ५४२, ८१०; उ. २३४.
**आळती**-(१) गायन करणारी, गाइका. १५८; उ. ४४६. शि; ५१. (२) गायन, गीत. १७५.
**आळवणें**-आलाप घेणें, गायन करणें. ५६७.
**आळि**-(१) एक प्रकारचें लांब गाणें. (२) लडिवाळपणा १०६.
**आळें**-झाडाच्या बुंध्याशीं असलेला खोलगट भाग. ७८१, ७८२, ७८३. उ. ३, ३६३.
**आळोसु**-आळस. ३९४.

## इ

**इंदु**-एका वृक्षाचें नांव. ८३४.
**इंद्रनीळ**-एकमणी. ३२६, ४७१.
**इशान्य**-एकदिशा. २३१.

## उ

**उकडणें**-शिजणें, गुदमरणें. ३७९.
**उकळी**-उचंबळ. ७१८. ज्ञा. ७-७५.
**उखळणें**-मुळांसह उपटणें. २९५.
**उगळवणी**-पाझरून निघालेलें पाणी. ५६९.

**उगाणा**–समृद्धि, ऐश्वर्य. ४८०. उ. १०९, शि. ५७५, ८५५. ज्ञाप्र. ८३९; ज्ञा. ११–७१.
**उगे**–चूप, गप्प. ३२६; शि. १२८.
**उघट**–उक्ता माल विकत घेऊन तो किरकोळीने विकणारा. ८३९.
**उचलणें**–निघणें. ५६१.
**उचित**–(१)बक्षीस. १३७, ३४५, ३६६, ६७०. (२) योग्य, यथार्थ. ५१८.
**उछाव**–उत्सव. २९१.
**उजळ**–निर्मळ चकाकी. ९४.
**उजियेड**–उजेड, प्रकाश. ४८१, ८०४. ज्ञा. ६–३२.
**उठावा**–उत्कर्ष, बहर. २८३.
**उणीव**–न्यून, दोष. ६३४.
**उटतसे**–उठून दिसते. ९३.
**उठावा**–उत्कर्ष, बहर. १०१.
**उतिजणें**–द्रवणें, उतूं जाणें. ५३५.
**उत्कंठा**–उत्सुकता. ६३०.
**उत्तरवेठ**–उतारपेठ, माल उतरण्याची जागा; ७०१. ऋ. ५१. शि. ६१६; उ. १९४.
**उथ ( वोति ) जताए**–उतूं जातें, पाणी पाणी होतें ४४२.
**उथाळी**–खोलगट भाग, टोपणें. १७३.
**उदयाचळ**–सूर्य जेथे उगवलेला दिसतो तो-पूर्वेकडील पर्वत. ४९१
**उदार**–थोर, मोठा. ३४२, ५५१, ७२७, ८०३, ८५५. (२) औदार्ययुक्त, दाता. ३७४.
**उदो**–उदय. ६६९.
**उदोदासु**–जयजयकार २६४.
**उद्यान**–बगीचा. ७२२.
**उधळा**–भुकटी, चूर्ण. ५५९. उ. ३६२, ३८८.
**उद्भा(घा)णें**–उत्कर्ष पावणें, बहरणें, प्रकाशणें. ४७०. (२) दरवळणें. ६५२.
**उधवणें**–उचलणें, उठवणें ४७१. ज्ञा. १-९०.
**उन्मळणें**–उलथविणें. ४७१.
**उन्मनी**–जागृती, स्वप्न, सुषुप्ती व तुरीया यांच्या पलीकडील अवस्था. ३९८.
**उधळा**–पूड, चुरी, उटी. ५५९.
**उन्मेख**–उल्लसित, आनंदित, स्फूर्ति. २५, ३६३.
**उपखणें**–कमी होणें, क्षीण होणें. ६६४; उ. ६२४. ज्ञा. ११-९५.
**उपटणें**–पडणें, झगटणें. ४६३.
**उपदेसु**–उपदेश करो. ६४२.
**उपनणें**–निर्माण होणें. ५८, ६६, ४००, ४०२, ४६५, ६६१, ६६९. ज्ञा(रा) २-३२२.
**उपरवाळा**–वर. ४९१, ८०८.
**उपरु**–तर, स्पष्ट.

**उपलणें**–प्रकाशणें. ८४६.
**उपलवणें**–(१) उगवणें, फुलणें. ८६४. (२) उपणणें. ७८५. ज्ञा. ६–२९२. शि. २४. अमृ. ९-८.
**उपवन**–उद्यान, बगीचा. ७२९.
**उपवर**–विवाहयोग्य, ११६.
**उपहुड**–जागृति, उदय. ४९१, ६६६. गो. ५१.
**उपाय**–निमित्त, उपचार. १५२.
**उपासन**–पूजाविधि. ४७८.
**उपांग**–ग्रामजाती, पोटविभाग. १८४
**उपाध्या**- भटजी, ब्रह्मकर्म करणारा, ६४७.
**उपावो**–उपाय, इलाज. ६४४.
**उपाळिंग**–उपलिंग, अनिष्ट दृश्य. १९७.
**उपेखणें**–हीन होणें, निस्तेजणें ४१, ९१.
**उपेणें**–आगमन, वस्ति, मुक्काम. ११३, ४६७, ७२२; शि. ८५८; उ. २१४; ऋ. ३२०. ज्ञा. १८-१७४७.
**उबा**–उष्णतेने. ४४२, ५६१, उ. ३९३, अमृ. ५-६०, ज्ञाप्र. ९२०.
**उबारा**–उकाडा, उष्णता. ३१२. ज्ञा. ६-२२१.
**उंबरा**–दारवंठा. १९९, ४५१; ४२०.
**उभड**–खालून वर उसळणारा प्रवाह, पूर. ७१८. ज्ञा. १६-१३८; ७-८०.
**उभयांची**–उभें असतांनाच. ३१०.
**उभिणें**–उभवणें, रचणें, उभें करणें. ४१७, ७२६, ७७४. उभें राहणें. ७७१.
**उभासिंग**–उभ्या शिंगाचे. ७४५.
**उभौनि**–उभें करून, वर करून. ७१०.
**उमप**–न मोजतां येण्यासारखें, पुष्कळ. ४९७, ८२१. ज्ञा. १८-८७०.
**उमसणें**–प्रकट करणें, सांगणें. १२१
**उमटणें**–उठून दिसणें. ९३.
**उमळणें**-वर येणें. ७११.
**उमाणणें**–मोजणें. ३२, ३२०, ८०१, ८६५. ऋ. १०.
**उमाकांत**–शंकर. ५०९.
**उमा-वन**–पार्वतीचा बगीचा. ७९७.
**उमे ( मै ) ठा**–उत्कर्ष, रसभरित. ७४.
**उरोध**–स्पर्धा. २१६. (२) विरोध. ४०२.
**उलळणें**–उसळणें. ११४.
**उलाळ**–पाण्याची उसळी. ७१८. ज्ञा. ७-७५.

**उल्हाटणें**-बळाने पळाविणें. ५६
**उल्हास**-आनंद, उत्साह. ६९९.
**उवाव**-उत्कर्ष, भर, उसळी. १००.
**उसणणें**-स्वप्नांत बरळणें. ३७.
**उसरणें**-उसाचीं शेतें. ८५१.
**उसराप**-उःशाप. १५६.
**उसासणें**-( १ ) उच्छ्वास टाकणें. ६२९. ( २ ) टोंचणें, मारणें. ३२४. उ. ७६, १११.
**उसासु**-उच्छ्वास, श्वास सोडणें. ४४५, ५८१
**उसीसीं**-उशी. ४५७, ५७९, ७६१. द. ५३.
**उसंग**-मांडी. ११०, ४१५. उ. ११६, ऋ. ५.
**ऊब**-उष्णता. ३००.

## ए

**एकदट**-एकदम, गर्दीने. ७४९.
**एकवट**-एकत्रित होऊन. ८५९.
**ए (य) र**-दुसरा, इतर. १८.
**एरवती**-मालती, चित्रविचित्र फुलें. ८१८.
**एसनी**-एवढी, सारखी. २०९.
**ऐतार**-अधिकतर, उंच, उन्मत्त. १५९, ३३४, ४८७.
**ऐल**-अलिकडे. २३०.
**ऐसांही**-अशा स्थितींत.

## ओ

**ओखद**-औषध. ५४९.
**ओल्हावणें**-ओलें करणें. ५५३.
**ओसंडणें**-उचंबळून बाहेर पडणें. ३५.
**ओळगणी**-सेवेस असलेली देवता. २९३.
**ओळगणें**-सेवा करणें. १०४, ३०२, ७२८, ८७२.
**ओळगाविणें**-देणें, अर्पण करणें. ४५४. उ. १३०. गो. ३५.

## क

**कटक**-सैन्य. ८७९.
**कटाक्ष**-दृष्टिक्षेप. ७५७.
**कंठ-नाळ**-मान, गळा. ४४८.
**कडगें**-कडें. ९५.
**कडा**-काठ, क्षितिज. ४६९.
**कडिवळ**-बालक, सेवक. २७७, २९७. ऋ. ५८७.
**कढ**-उकळी. ५७३.
**कडियाळें**-कडें. ५११. ज्ञा. ९-५२९.
**कढिवा**-( १ ) कटि-मेखला. (२) नितंब. ३२२.
**कणव**-कृपा, दया. १२; ज्ञाप्र. ६. ज्ञा. ६-४११.
**कणिका**-बिंदु. ५५८.
**कंदर्प**-मदन. ६१७, ७२७.

**कंदर**-गुहा, दरी. २३७.
**कनक-जं (जां) बु**-सोन-जांभूळ. ८०६, ४२२.
**कनक**-सोनें. ७९१.
**कनधार**-पिचकारींतून बाहेर पडणारी बारीक धार. ८४६.
**कनकधार**-सुवर्ण कलश. ५५१.
**कपोळ**-गाल. ३२९.
**कमळ**-पाताळांतील एक गायक. १८३, ८०८.
**कमळ-दळ**-कमळाचें पान. ४६१.
**कमळ-नळ**-कमळाचा देठ. ६७५.
**कमळौनि**-कमळापासून. ४७४.
**कर**-किरण; हात. ७५५.
**करंडी**-पेटारी, कुंडी. ८३. ज्ञा. ६-२७३.
**कर-तळ**-तळहात. ८४५.
**कर-भार**-कर, वसूल, खंडणी. ७०६.
**करवीं**-कडून, हातून. २५२, ३९३
**कर्णिकार**-एक फुलझाड. ८११. उ. ५५०.
**कर्पुर-चुरी**-कापराचा चूर. ४९५. ८४४.
**कर्पूर-कर्णिका** एक फूल. ८१५.
**कऱ्हेर**-पाणपोई, 'पाण्याचें भांडें. ५०. ४३६.
**कऱ्हेरी**-पाणी देणारा सेवक. ७४४. ए. भा. १२ ५६१; शि. ५०.
**कऱ्हेरिणी**-पाणी देणारी दासी. १०३, ३९५.
**कलहंस**-हंसाची एक जात. ५३०.
**कला-शास्त्र**-शिल्पकला. ४१८.
**कल्प**-जमीनींत पुरून ठेवलेलें द्रव्य, ठेवा. १४१.
**कल्पतरु**-इच्छित वस्तु देणारा वृक्ष. ८३७.
**कल्लोळ**-गजबजाट, बाहुल्य, समूह. ४२३, ७५८, ७९६.
**कल्हार**-कमळ. ८१४.
**कवच**-आच्छादन. १५६.
**कवणी**-कशा ?, आश्चर्यकारक ! ४२६.
**कवति (तु) क**-कुतूहल, कौतुक. ११०, १३४, ६३६, ७५१, ८२५. ज्ञा (रा). १-९७.
**कवळी**-(१) झोंबी, कवटाळणें. ४२४. (२) भेट, आलिंगन. ३२९.
**कव्हणाची**-कोणाची. ३३९.
**कव्हणी**-कोणी. ५४.
**कव्हणी-परी**-कोणत्या प्रकारानें. ३६४.
**कवाड**-दरवाजाचें झाकण. ४२१, ८७०; अमृ. ७-१२३.
**कवि**-शहाणा; भाट. १२४.
**कवे (वी) श्वर**-कविश्रेष्ठ, विशेष ज्ञाता पुरुष. ६४९.

**कस**–(१) परीक्षा, शुद्धता. ५८९. (२) प्रयत्न, जोर. ४४५. ज्ञा. ६-२४२.
**कहीं**–कधीं. ३६४. उ. २३३. ज्ञा. २·८; ऋ. २८६.
**कळावि**–कोपरापासून मनगटापर्यंतचा भाग. ८४.
**कळंक**–काळिमा, डाग. ५०१.
**कळास**–डौलदार शिखर. ४३३.
**कळसेवरी**–कलशांनी. ५७०.
**कळावीद**–( १ ) कलावंत, कलेचा मार्मिक ज्ञाता. ४०, ११९, ५०४ (२) चंद्र. ७६०, २८३.
**कळिका**–कळी. ४०७.
**कळेकाम**–फुलांच्या कळ्यांची रचना. ५५२.
**कळेकाम**–(१)कलाकौशल्य. ५५२. ( २ ) पुष्पकलिकांचे अलंकार. ४५४, ७४०.
**काइ**–काय. ३०१. ऋ. ३२२.
**काइसा(सी)**–काय, किती, ३८४, ४४१, ६४१
**काग**–कावळा. ३०७.
**काजळणें**–काळें होणें. ३०३.
**कांटाळणें**–दचकणें. २५३. गो. २५३ ज्ञा. ६-४४२.
**कांटाळा**–(१) कांटा, शहारे. ५७२ ( २ ) पासंग, वजन. ८६१. अमृ. ७ २६६.
**कांटाळी**–पासंग, सारख्या वजनाचा पदार्थ. ६३, २८७.
**कांडारणें**–कोरणें. ८६ ज्ञाप्र. ७३१.
**कांडारीव**–कोरीव, नक्षीदार. ४२०.
**कातर**–कैची, कात्री. ११४. ज्ञा. १८-८२४.
**कांतिए**–कांती ( एक शस्त्र ) धारण करणारे. ७४८.
**कांति-लोह**–अत्यंत काळ्या रंगाचें लोखंड. ४७३.
**कांतीव**–कांतून तयार केलेलें, कोरून काढलेलें. ४१६, ४३५, ६५१.
**कापडणें**–कापड गुंडाळून शृंगारणें, आच्छादणें. ४९४.
**कापखंड**–बाण. ७४६.
**कापुरोदक**–कापराचें पाणी. ५८२.
**काम**–(१) कौशल्य. ४२८. (२) मदन. २५३, ५८४, ७८६.
**काम-कळा-चित्रें** शृंगारोप-भोगाचीं चित्रें-आसनें. ४२५.
**काम-पिसें**–मदनाचें वेड. ११८.
**काम-केशर**–एक वृक्ष. ८३६.
**कामुक**–विषयोपभोगी लोक. ११४. ज्ञा १-१८७.
**कामतत्त्व**–शृंगार. ७३७.
**कामना**-इच्छा. २८३.
**काम-शास्त्र**–संभोगाचें शास्त्र, कोकशास्त्र. ७५७.
**कालिंदी** यमुना. ११३.

**कालौनि**-मिश्रण करून. ८४५.
**कासणें**-एखाद्या बरोबर युद्ध करणें, युद्धासाठी सिद्ध होणें. ३२४. उ. २५.
**कांस घालणें**-कमर कसणें. ४९८.
**कास्मिर**-स्फटिक. ८३, ५७०, ८०५. मुक्ते. सभा. २-१४,५७.
**कास्मिरबधा**-स्फटिकांनी बांधलेली. ८०५.
**काहाळि**-(१) एक चर्मवाद्य.७५०. शि. १०२६. (२) काहाळ वाजविणारा. १७८.
**काह्याचे**-कशाचे, कुठले. २००. धपू. १९. ज्ञा. १८-२६४.
**काळडंक**-कृष्ण सर्प. ५३३.
**काळयाना**-एका शस्त्राचें नांव. २५१.
**काळवख**-काळोख, अंधार. ४८४. ज्ञा. १२-४९; अमृ. ४-३६; २-१०; ज्ञाप्र. ४६७.
**काळिमा**-काळसरपणा. ७०२.
**किंकरी**-सेविका, दासी. ६७६.
**किडाळ**-मलिनता, दोष. ५८५. ज्ञा. २-१७९. ज्ञाप्र. ५६५.
**किन्नर**-अश्वमुखी मनुष्य. ७५, १३७, २११, २५८, ८७२.
**कीकस**-स्फुल्लिंग. २२०.
**कीरु**-खरोखर. १२६, ४०५. ज्ञा. १-११९.
**कुआडा**-मांडण. ११७, १२०.
**कुंकुम**-केशर. ५७८, ७५८.
**कुंकुम-केसर**-केशराचे पराग. ८१२.
**कुच-तट**-स्तनाचा भाग. ८४२.
**कुचंबणें**-खुपणें.
**कुंचा**-मोरांच्या पिसांचा कुंचला, मोर्चेल. ७४७; ज्ञा. १३-६५९.
**कुंचासीं**-कुंच्यासहित. ७४७.
**कुंचि**-किल्ली, कुंजी. ५०६.
**कुंजन**-कूजन, कोकिळेचें गायन. ५३२, ६१०.
**कुटि**-दोष, हीनत्व. १२०, ३५८. उ. १४४, ६१३. अमृ. ७-१०५
**कुटुंबी**-कुटुंब पोसणारा. ७०७.
**कुंठी**-कुस्याचे दोर. ४५६.
**कुंप**-कुंपण. ७८०.
**कुपी**-शिशी, विहीर. ३३.
**कुपे**-विहिरी. ४६.
**कुंभस्थळ**-गंडस्थळ. २४३, २६०.
**कुमोद** (१) कोंब. ५३८. (२) कमळ (चंद्रविकासी). ५०३, ५४८, ५५७, ६०३, ६२३.
**कुमोद-कंद**-कमळाचा कांदा. ५४७
**कुमोद-कमळ**-चंद्रविकासी कमळ. ८६४.
**कुरवाळा**-गोंजारण्याची क्रिया. ६१४. उ. ३१९. वच्छ. १८६.
**कुरळें**-कुरळे केस. १११.

कु (को) खारी-कोबळी. ३४४.
कुवासा-कैवारी, आश्रय. ६०३, ज्ञाप्र. ४८. ज्ञा. १२-१७८.
कुसर(री)-कौशल्य. ८६८,८६९, ४२१, ४२७.
कुसुम-बाण-मदन.
कुसुमायुध-मदन. ४९८.
कुळ-देवता-कुळाची अधिष्ठात्री देवी. ९०.
कुळेश्वरी-कुळदेवता. ९०.
कुळैवा-दिवा. ६३०, ४८२.
कूजणें-गायन करणें. ४०, ५८०.
कें-कोठे, कोणीकडे. २८३, ३०६, ६३५. अमृ. ५-६३; उ. १२६. ऋ. ३२७. शि. १४१.
केउता-किती, कोणीकडे. ५७२. ऋ. २८७. ज्ञाप्र. ६६१.
केउती-कोठील. ३४, ६९८. ज्ञाप्र. ६५२. अमृ. २-३१.
केउतें-किती. ३०७, कसें. ७६७. अमृ. ६-१५.
केका-मोराचा शब्द. ६१२.
केतुकें-किती. ३००.
केदार-बद्रिकेदार. ४२८.
केधवा-केव्हां. ४४५.
केवि-कसें, कोणत्या प्रकारें. ६३४.
केशर-बकुल-पुंनाग-केसराचा वृक्ष. ८१४.
केसक-किंशुक, पळसाचें फूल. ८४५.
केळिगर्भा-केळीच्या गाभ्यासारखें. ८४६.
कैं-केव्हां. १५०. ब. २५७.
कैचें-कैसें. १६७.
कैरव-चंद्रविकासी शुभ्र कमळ.५४६.
कैलास-शंकराचें वसतिस्थान; एक पर्वत. ७३१.
कैवाड-कैवार. ११७. उ. २२८. धपू. ७६.
कैवार-एखाद्याचा पक्ष घेणें. ७४९.
कैवारी-बाजू-पक्ष घेणारा. ७४३.
कोड-कौतुक. ४, ५९९, ८३४.
कोडें-कौतुकाने, सहज. ३१६. ऋ. ३३७. ज्ञा. ६-२०४.
कोडीं-कौतुकाने. ८५३.
कोडी-कोटी. ३०२. धपू. १५; ज्ञा. ६-१५३.
कोंडकी-लोंबणारी कडी, हलगी. ४५६.
कोंतेकार-माले धरणारे, मालदार, भालेकरी. ७४५.
कोडिसवाणी-सुंदर, चांगली, कौतुक करण्याजोगी. ६०४.
कोदंड-धनुष्य. २८६.
कोंभ-पालखीचा वाकदार दांडा. ४५८.

**कोमाइणें**-कोमेजणें, सुकणें. ९९, ३७८, ४४१, ६५२. गो. १७४. ज्ञा. २-४.

**कोल्हौर**-मातीचें चित्र. १०९. अमृ. ७-४.

**कृत्तिका**-एक नक्षत्र-पुंज. ९५.

**कृपा-निधी**-कृपेचा साठा. ६७९.

**कृष्ण-पक्ष**-वद्य प्रातिपदेपासून तों अमावस्येपर्यंतचा पंधरवाडा. २२७, ६५१.

**कृष्णागरु**-कृष्णचंदन. ८०९.

## ख

**खड्गोदक**-सहा प्रकारचा रस. टीप पहा. ५४१.

**खडी**-माती. २००.

**खण**-चौक, ताल. ४१९.

**खल**-चूर्ण करण्याचें पात्र. ५६३.

**खरागणें**-जळणें, माजणें. २२७, ३०३, ज्ञाप्र. २१९.

**खळें**-कणसांतून धान्य तयार करण्याची जागा. ४९१, ६२०.

**खळाळ**-खळखळ आवाज करणारा पाण्याचा प्रवाह. ७९१. उ. ११० एमा. ७-५२२. ज्ञा. ७-७८.

**खागें**-एकांत स्थळ, संकेतस्थळ, चोरांचें गुप्त निवास-स्थळ. ४००; ली. च. भा. ४. पृ. १४.

**खांचना**-हीन, तुच्छ. २३, ६९४.

**खांडें**-एक शस्त्र, तरवार. ११७, २१८, २२३, २३१, २४३, ३०४, ३५६, ३७१.

**खांडें-बाहो**-हातांत तरवार धारण करणारा. २५४.

**खाता**-चौकोनी कोनाडा, देवळी, ८०५.

**खांदी**-मोठी डहाळी, फांदी. ८३४.

**खिरणें**-खाली गळणें. ५६४.

**खिळणें**-स्तंभित करणें, जागच्या-जागीं निश्चल करणें. ५८७, ५९४.

**खिरोदक**-क्षीरोद, शुभ्र रेशमी वस्त्र. ४९४.

**खुणां**-खुणेने, खूण करून. ३९३.

**खुणावणें**-खूण करणें. १७४.

**खुणीं**-खुणेने. ४१३.

**खूडें**-खुराडें. ५९६.

**खेडकुळी**-उद्यानांतील पाण्याचा पाट, कालवा, हौद. ४१५, ७६१, ७७७, शि. २६; (२) खिडकी. २६.

**खेचर**-आकाशगामी, किंनर. ३५०, ३६१.

**खेचरी**-आकाशांत विहार करणारी. ८४०.

**खेव**-आलिंगन. ७५६. गो. १५६. ज्ञा. ६-५९.

**खोप**-लपवण्याचें घर. ८६५. खोळ, गवसणी, वेष. १४०.

**खोदें**-शोधून, धुंडाळून. २३३.
**खोलणें**-उघडणें, चालून जाणें, ७५७.
**खोळ**-मध्यभाग, गवसणी. ५४३, उ. ७०७; ज्ञा. ७-१८७.

## ग

**गगन**-एका झाडाचें नांव. ८३४.
**गगन-काळी**-आकाश हीच कालिका देवी. ४७५.
**गगनांतराळीं**-आकाशांत, आकाशाच्या पोकळींत. ७८८.
**गडद**-दाट अंधःकार. ४८५. ज्ञा. ४-२०५.
**गडे**-समूह, मर्यादा. ७४६; उ. ६७, ३५९.
**गणिका**-वेश्या. ४८०.
**गजबजणें**-घाबरणें, धांदल उडणें. ३९०. ज्ञा. १-१५४.
**गजंबु**-गलबला. ४४९; धउ. ३२.
**गमक**-गायनांतील चढ-उतार; तान; स्वप्तस्वरांची ठेवण. १०५, १५९, १७९, ३४६.
**गरळ**-विष. ५४९.
**गरुड**-( १ ) तालिमखाना. २२५, ३४६, ४९५, ८५३. (२) पक्षि-विशेष. ४६९.
**गरुडोद्गार**-गरुडपक्ष्याचें वमन; एक रत्न. ४७१. उ. ५१६.
**गरुड-ध्वज**-विष्णु, श्रीकृष्ण. ६१९.
**गरुवती**-गहनता, गांभीर्य. १६३, ६३१. ज्ञा (रा). १-३३.
**गर्जे (रज)**-गर्जना. ४३८.
**गर्भ**-आंतील भाग. ४२९, ५५४.
**गवसणी**-खोळ, आच्छादन. ७, ५१०. उ. २९६. गो. १२२; ज्ञा. १०-२१६.
**गवसणें**-शोधणें, सापडणें. ५१४.
**गवाक्ष**- खिडकी. ४१९.
**गळाळा**-उसळी. ७१८. ज्ञा. ७-१८९.
**गळाळी**-घोट. ५२१.
**गाइवें**-गायन. १८१, १५८.
**गाइवां**-गाण्याने. १५८.
**गाज**-गर्जना. ७३९.
**गाजणें (नें)**-(१) गर्जना. २२२, ४३८. (२) गर्जना करणें. २७०, ७१८. ज्ञा. ११-११५.
**गांठीवन**-नागरमोतें; प्रियंगु. ५४१.
**गाढा**-गहन, खोल, गंभीर. ७१६.
**गाढिका**-(१) प्रौढी, ऐट, पुरुषार्थ, पराक्रम. ७४३, ७४७, ७५१. ज्ञा. ६-३६४. (२) थोर, पुष्कळ. ३८५.
**गात्र**-गायन. १७९.
**गाथा**-गीत समूह. १७.
**गादणें**-जमणें. ८२७.

**गाभेवन**-गर्भांतील पान, सूक्ष्म अंकुर. ५८२. ज्ञा. १०-७०.

**गारा**-बर्फाचे दगड. ५६८.

**गारैला**-थंड झाला. ८६२.

**गार्हस्थ्य**-गृहस्थाश्रम, संसार. ७२.

**गांव**-चार ते नऊ मैलांचें अंतर. ७३०, ८५५, ८७८. गो. १.

**गांवार**-मूर्ख, पामर. ११६.

**गिवसू**-शोध. ४७०.

**गीत**-गायन. ५३०.

**गीत-सूड**-पवाडा, गायन-वादन. १८६, २५८.

**गुजरी**-गायनांतील एक राग. यालाच गुजरी-तोडी असेंहि नांव आहे. २७३.

**गुठीव**-गुंफीव. ४२२.

**गुढर**-डेरा, तंबू. ४३२, ४९४, ६१७, ८६७. शि. २९०. धपू. ४७.

**गुढी**-पताका. ७७५. शि. ६०; ज्ञा. ६-५२.

**गुढें**-(१) पताका, शिखर. ७९०. (२) देशांतर करणारें-आपलें घरदार सोडून परागंदा होणारें कुटुंब. ७९०.

**गुपितें**-गुप्तपणानें. २१९.

**गुप्ती**-गुप्त हेर. १२३, २५९.

**गुण-रत्न-सागर**-गुण हींच रत्नें, त्यांचा समुद्र-असा. ६६१.

**गुसळणें**-घुसळणें, सलणें, आंत गरगर फिरणें. ५२८, ६८१.

**गुह्यक**-देवसदृश योनि. २१४.

**गुळळा**-गुळणा. ३९५. द. ३९.

**गुळुळा**-गुळणा. ७८३.

**गोट**-काठ, किनारा. २९९.

**गोठ**-आश्रयस्थान. २७८.

**गोडसें**-गोड. १९.

**गोत**-कूळ. ८०७.

**गोंदळ**-(१) गोंधळ, क्रीडा. ८१० (२) गोंधळी, ७३५.

**गोपाळ**-श्रीकृष्ण. ७८८.

**गोपी-नाथ**-श्रीकृष्ण. ५०२.

**गोपुर**-महाद्वारावरील उंच खोली-इमारत. ४२३.

**गोलाम**-पुष्प, कापुर. ५४२.

**गोसांवी**-स्वामी, नाथ. १०१, ६११, ६१७, ६३९, ६६४. अमृ. १-१०; ज्ञा. ६-४३०.

**गोसांविणी**-स्वामिनी, मालकीण. १९५. द. ८४.

**गौड**-एक राग. २९०.

**गौळणी**-गोपिका. ३३५.

**ग्रामजाती**-गायनाचा एक प्रकार. १८२, ३४६.

## घ

**घड**-घोस, झुबका. ७८७, ७८८, ७९३, ७९८, ८३५.

**घडिव**-घडलेलें. ४२०.

**घणवट**—दाट, भारी. ३२२, ८६१. ज्ञा. २-१३०; शि. ३९१.

**घन-नीळ**—मेघासारखे निळ्या रंगाचे. २१५.

**घरकुल**—लहानसें घर. ३०१.

**घरटी**—गस्त. ७१७. उ. ११९.

**घर रिघ (ग) णें**—आपणहून एखाद्याच्या घरांत जाणें, बळेंच आंत शिरणें, एखाद्याचा हात धरुन निघून जाणें. ७६, ३३४. ह. ४७. ज्ञा. ६-३५४.

**घरवात**—प्रपंच, लग्न. २०२. अमृ. १-१३. ह. ५२.

**घसण**—घर्षण, झगटणी. ८४५. ज्ञा. ७-१३९.

**घापणें**—घालणें. घातलें जाणें. ७, ७८३. अमृ. ७-८२. ज्ञाने. १८-२३. ज्ञाप्र. ६४८.

**घाट**—समूह, थवा. ८७१.

**घांट**—नदीकांठावर बांधून काढलेल्या पायऱ्या. २६५.

**घाटौली**—बटमोगऱ्याच्या कळ्या, पुष्पकालिका. २४, ४८६, ८१२.

**घाणा**—चरक. ८५१

**घाय**—घाव. २५४.

**घायेवट**—घाव लागलेला. ६६६.

**घालणें**—हल्ला. २७६, ३११, ४७४, ६०३.

**घिउर्दे**—एक पेय. ९.

**घुणघुण**—गुणगुण आवाज. ६१८.

**घुमणें**-पारव्यांचा आवाज. ७४९.

**घुमवणें**—डोलवणें, फिरवणें. २४०.

**घेपे**— घेणें ( घ्यावें लागतें ) २०९, अमृ. ५-६७, ७-५०, ५१, ज्ञा. २-२६०.

## च

**चउकटी**—चौकोनी. ४१८.

**चक्र-तेजिठ**—वर्तुलाकार व तेजःपुंज ८५९.

**चक्र-पाणी**—हातांत चक्र धारण करणारा, श्रीकृष्ण. ८७७.

**चक्र-वर्ती**—सर्व पृथ्वीवर ज्याच्या रथाचीं चाकें अविरोध फिरतात असा, सम्राट. ७०६.

**चटपट**—चुटपुट, सूक्ष्म वेदना, तगमग. ४०८, ५२५.

**चढती**—चढणारी, वाढती. ४०९.

**चढावा**—हल्ला, स्वारी; श्रेष्ठता. १२५, ५८८, ८०६. उ. २८. ज्ञा. ११-३८८. अमृ. ९-३०.

**चढावणीचा**—इतरांवर ताण करणारा, अधिक श्रेष्ठ. ६९१, ६९६.

**चढिनला**—चढला. ६९३.

**चंड-वात**—झंझावात, सोसाट्याचा वारा. ६००.

**चतुरानन**—ब्रह्मदेव. ८३३, ८६१.

**चंद्रकांत**-चंद्रकिरणांनी पाझरणारा मणी. ४१५, ४४२, ५०४, ७०९, ७८१.
**चंद्र-गर्भ**-चंद्राच्या गाभ्यासारखा. ७३९.
**चंद्र-चूड**-शंकर. ५४९.
**चंद्र-बिंबौनि**-चंद्रबिंबापासून.६६.
**चंद्र-मौळी**-शंकर. ९७.
**चंद्र-वदना**-चंद्रासारखें मुख असलेली. ४६५.
**चंद्र-सेखर**-शंकर. ७९५.
**चंद्रिका**-चंद्र-कांति, चंद्राचा प्रकाश ५०८, ५१४.
**चरणें**-(१) इतस्ततः फिरणें. ४७३, ४८२. (२) खाणें. ८५९.
**चराचर**-स्थावर जंगम. ६२.
**चरी**-वर्तुलाकार घुमट. ८६७.
**चर्बट**-बाचाळ, बडबड करणारा. ७४९.
**चवकणें**-चमकणें, चकित होणें. ५३१, ५८०. ज्ञाप्र. ७६७.
**चवर-धर**-चवरी धरणारा. ६९५.
**चवरी**-वनगाईच्या केसांचा झुबका. ७४४.
**चवरें**-बसावयाची जागा. ४३७. उ. २२५. शि. २६.
**चहुबुडीं**-चार प्रकारचें. ४९५.
**चळथ**-एकावर एक वस्तु ठेऊन झालेला समूह. उतरंड. ८१७.
**चाउरी**-आसन, चादर. ६५४. शि. ६४; ४२९; उ. ७०६.
**चांग**-चांगला, सुंदर. २०२, २०७ ७५०, ७५५. उ. ४४.
**चाचरी**-तिरपी, झुकांडी. ४५०.
**चाचरी जाणें**-अडखळत चालणें; बोबडी वळणें. ७६९. उ. ४४९. ज्ञाप्र. ८२७.
**चाटा**-व्यापारी. ८३९.
**चाड**-इच्छा, पर्वा. ३३९, ६३१, ८३४. उ. १६४. ऋ. ३३८. ज्ञा. ६-६४.
**चातक**-केवळ मेघांतून पडणारें पाणी पिणारा एक पक्षी. ७३९.
**चातुर्य**-नैपुण्य, हुशारी. ६३१.
**चांद**-चंद्र. ५३८, ६०२.
**चांदिणें**-चंद्राचा प्रकाश. ७६२.
**चांदोवा**-छत. ४२७, ७७६.
**चारु**-सुंदर. ८१४.
**चाळक**-(१)आज्ञा पाळणारा. ३०२. (२) चालना देणारा. ७७०.
**चाळणें**-हातांनी तोलून नेणें. ४५८.
**चाळवणें**-झकवणें, चंचल-चलित-चित्त करणें. ३७१, ४०५, २०१.
**चिनांसुक**-चीनांशुक, तलम रेशमी वस्त्र. ३९९. शाकुं. १-३४.
**चिरणें**-रचणें, तयार करणें. ५९७. उ. ३१८. शि. १८८.

## छ



## ज

**जड**- चेतनाहीन, निष्क्रिय. ५०५.

**जंत्र**-(१) वाद्य, वादन, यंत्र. १७९, ५२८, ५२९, ५३०. (२) छां छूं चा मंत्र.

**जल्पणें**-बडबडणें. ३६७.

**जवं**-जेव्हां. ज्यावेळीं. १६३,६६७.

**जवट**-वजनदार घोस, झुबका. १७०.

**जवळीक**-(१) सोयरीक. ३७५. (२) निकटपणा, जवळचा संबंध. ६९८, ७३२. शि. ४४. ज्ञा. १०-१२१.

**जवाळिके**-जवळ, संनिध १३८, ६५४, ६५९.

**जवळील**-जवळ असलेली, सेविका, दासी. ६५८.

**जवादि**-कस्तुरी. ७४९.

**जवादिय-मांजर**-ज्याच्या अंड्यांत कस्तुरी असते असें मांजर, ५९७.

**जळ-केळि**-जलक्रीडा. ८४७.

**जळ-चर**-पाण्यांतील प्राणी.७१९.

**जळ-जंत्र**-जल-यंत्र, कारंजें. ८४६.

**जळद**- ढग, मेघ. ५६६, ५६८.

**जळ-मांडवी**-जळक्रीडा. ८५७.

**जळ-से [सए] न**-(१)जळ-शयन, पाण्यांत शयन करणारा, पाण्यांत राहणारा. १५. ज्ञा. १०-२१. (२) शेष सर्प. ७२२. शि.११०.

**जाइल**-जाइचें फूल. ७४६. उ. ३८४.

**जाइलेंपण**-जन्मास आल्याचें सार्थक जिवंत असल्याची कृतकृत्यता, सर्व-श्रेष्ठत्व. १९२.

**जाण**-शहाणा. २५, ३८, १६२, १६७. उ. १०.

**जाणता**-जाणणारा, मर्मज्ञ, २८.

**जाणतासि**-जाणतेस, ओळखतेस. ६३५.

**जाणती**-शहाणी. ५५१.

**जाण-राय**-जाणत्यांचा राजा, सर्वज्ञ. ६८५.

**जाणवणें**-माहीत करणें, माहिती देणें. ३५१, ६२१.

**जाणी**-ज्ञानी. १०३.

**जाणीव**-ज्ञान, चेतना, सावधपणा. ४१, ६३०.

**जाति**-जाईचें फूल.

**जाळी**-समूह, वन. ८०१.

**जिणणें**-जिंकणें. ४४५.

**जिणी**-जिवंतपणा, टवटवी. ३४७. उ. ४४.

**जिणे**-जिंकतो. २८३.

**जित**- जिवंत, चैतन्ययुक्त. ७८०.

**जित-इंद्रिय**-जितेंद्रिय, ज्यांनी इंद्रियें जिंकलीं ते. ऋषी. ७३८.

**जिंतिलें**-जिंकलें. १४८.

जिनी-जिवंत करणारी. ७९.
जिभट-जीभ सैल सोडणारा, वाचाळ, बोलका. १३७.
जियाला-जिवंतपण, चैतन्य. ७०४.
जिव्हार-अंतःकरण. ११४, ६८१. उ. ८४. ज्ञा. १२-३०.
जीजे-जिवत रहावें. ६३४, ७०६. उ. ४०५.
जीवउं-जिवंत करण्यासाठी.
जीवन-पाणी. ३७८.
जीवावेया-जिवंत करण्यासाठी. ७३३.
जीवित-नाथ-प्राणांचा स्वामी, प्राणपती. ६८१.
जीविनला-जिवत राहिला. ३५.
जुग-एक प्रकारची होडी. ७२०.
जुझ-युद्ध. २६४. उ. ६९४.
जुझणें-युद्ध करणें. ११८.
जुझार-युद्ध करणारा. ७६७. उ. २४१.
जुंबाडा-समुदाय, झुबका. २०५.
जूं-जोखड, ओझें, बधन. ७३८.
जूहारणें-नमस्कार करणें. १२७.
जेतुला-जितका. ६८७.
जैत-विजय. ७३७. उ. २४०.
जोड-जोडी. १६५.
जोडणें-मिळणें, मिळविणें. ५०२, ७३२.
जोति-ज्योति, प्रकाश. ७१२.
जौहर-आग, आगीचें घर. ३८०, ५९३. ज्ञा. ११-६०.
जौळ-समूह. ७१२, ७२५, ७३९. उ. १८.

## झ

झ ( झां ) कवणें-मुलवणें, थापा-मारणें. ३६८, ४११. ज्ञा. २-३१६.
झगडा-भांडण. २३२.
झड-शीत, थंडी.
झडकी-झडकरी, लौकर. ३८८.
झडप-झेंप. ४४६.
झडपणी-बाधा. ४०१.
झणी ( णें )-निषेधार्थी अव्यय. ५१९, ६१०, ६१३, ६१५. ज्ञा. ६ ३९.
झणी ठाके-ठाकूं नये. ६१३.
झणें मिळतु-न मिळोत. ६१५.
झणें ये-येऊं नये. ५१९.
झणे हो-होऊं नये. ६१०.
झळक-चकाकी. ७१०.
झळंब (बुका)-झुबका, गुच्छ, बाळया, ९५, ४२७. धपू. ७०.
झळंबणें-स्पर्शणें, वर्मी लागणें. ८२१. ३९५, ऋ. ८०; ज्ञाप्र. १६५.
झाक-समूह. ७४७. ज्ञाप्र. ४१२.
झांक-झांपड, मोहनी. ८१९.

**झाडणें**-नाहींसें करणें, झटकून टाकणें. २४२.
**झाडळी**-झाडांचा समूह. ७२३, ८०१. ज्ञाप्र. २६६.
**झाडा**-झडती. २३३.
**झांपडी**-अंधारी ५४२.
**झेंपावणें**-उडी घालणें ४६८.

## ट

**टकणें**-प्राप्त होणें, लागणें, उभें राहणें. २०२, ४५५.
**टका**-निशाण, ध्वज, छत्र. ७८९.
**टाकणें**-प्राप्त करणें, जाणें, प्राप्त होणें. ४७६, ८६६, उ. १६५, १९०, २२५. ऋ. ७, १०५, १०६ ज्ञाप्र. १९७.
**टापर**-डोक्यावर पांघरण्याचें फडकें. ५९६.

## ठ

**ठकणें**-(१) ठाकणें, उभें राहणें-३७२. (२) थक्क होणें, आश्चर्यानें स्तब्ध राहणें. १४५, ३४९. (३) फसणें. ६१३.
**ठक लागणें** दृष्टि स्थिर होणें, टक लावून पाहणें. ८५४.
**ठकार**-सौंदर्य, ऐट. ७४१. ऋ. ४९५.
**ठसा**-मुद्रा, छाप,. ३६९.
**ठाइंठाइं**-जागजागीं. ७९७.
**ठाउक**-माहीत, ज्ञात. ८४५.
**ठाकणें**-राहणें. ६५८, ७०२.
**ठाण**-बांधा. शरीराची ठेवण. ३२५. ज्ञा. ११·२७४.
**ठिकलग**-रत्नजडित. १७१.
**ठीक**-मोत्यांचा झुबका. ९४, ८७०. उ. ५१६.
**ठेला**-राहिला. १६८.
**ठेवणें**-ठेव. ५०६.
**ठौळ**-समूह, खिल्लार. ४७३.

## ड

**डवरणें**-उटणें, बहरणें. ७१३.
**डहाळी**-लहान-कोंवळी फांदी ८३४.
**डाउ**-गणेश. ७१३.
**डांग**-बांकदार काठी. ३७१.
**डां ( दां ) ग**-अरण्य. ३०६. ज्ञा. ११-२१७.
**डालवणें**-डालीखाली झांकून ठेवावयास लावणें. ५९७.
**डुळें**-कानाचीं छिद्रें. २०६.
**डोल्हारा**-झोपाळा, हिंदोळा. ४६०, ४६२.
**डोहळणें**-इच्छा उत्पन्न होणें. ७६६. शि. २७४.
**डोळस**-चांगल्या डोळ्यांची, सुंदर. १९३, ४०४, ५९०.
**डोळिकार**-पालखी वाहून नेणारी. ४५८. गो. १०३.

**डोळी**-पालखी. ४५६.
**डोळेयाचें अंग**- कटाक्ष, दृष्टिक्षेप. ७४२.
**डोळेलांस**-दृष्टिबंधन, मोहनी. ३०९. उ. ३९. शि. १५६. ज्ञाप्र. ६३७.

ढ

**ढळणें**-दूर होणें, कलणें, विचलित होणें. ७५३.
**ढाळ**-(१) ढोल. २३, २८८. शि. २९; (२) न्हाण, स्नान. ५६५, ५६६, ५७७. ज्ञा. १८-५७५.
**ढीलौनि**-ढिली करून, सोडून, काढून. ३९४, ४५४.
**ढुलणें**-डोलणें. ५०८, ७४२, ७६४. उ. ६९२. शि. ३२०. ऋ. २१३.
**ढुलविणें**-डोलवणें, झुलवणें. २९७, ३८३, ३८४.

त

**तडस**-(१) कलश, पखाल. ५६८. (२) पोटशूळ. ५७४. शि. १०५६.
**तढणें**-उलणें, तडा जाणें. ७९८.
**तण**-गवत. १९६.
**ततक्षेणें**-तत्क्षणीं, तात्काळ. ४५३.
**तत्त्व**-सार, रस ५३९.
**तनु**-शरीर. ६३९.
**तमाळ**-ताडवृक्ष. ४७३.
**तरंग**-लाटा, लहरी. ११३.
**तरंगाय**-तरंगत आहे. ६५३.
**तरि**-होडी. ७२०.
**तवं**-तेव्हां. ७०१, ७०८, १६३.
**तव**-मूर्छा, घेरी. ५५६.
**तवक**-आवेश, जोर. ८८४, ५८७. ज्ञा. १२-४६.
**तवचा**-त्वचा, कातडी. ५६१.
**तलगें**-पिलूं. मूल. ८०२, ६६०.
**तळ घेणें**-बुडणें, तळाला जाणें. ६३०.
**तळपणें** शोभणें. ८११,
**ताटकाढी**-सेविका, दासी. ३३२.
**ताटी**-बिछाना, गादी. ७१७.
**ताडवन**-ताडपत्राचें स्त्रियांचें एक कर्ण भूषण. ८४, २७१, ३०५.
**तातणें**-तापणें, भाजणें. ४६८, ५८३. ऋ. ३८, ४०.
**तातलेया**-तापलेल्या. ५८३. ज्ञाप्र. ७०२.
**तापसा**-तपस्विनी, तपश्चर्या करणाऱ्या स्त्रिया. ३३५.
**तारकासुर**-तारक या नांवाचा राक्षस. ८५८.
**तारागण**-तारकांचा समूह. ७८४.
**तारकाक्षरें**-(१) तारकारूपी अक्षरें. (२) तारणारीं अक्षरें. ३१८.

ताराण–बळ, सामर्थ्य. ४४७. उ. ३०८, वच्छ. ३७९.
तारी–तारेचें वाद्य. १८०.
तारूं–जहाज. ६३०, ७२०.
ताल–टाळी, ठेका. १८२.
ताव–ताप. ५५६.
तांबुळ–विडा. १११.
तांबुळवन–विड्याचीं पानें. ५६५.
ताळ–ठेका, गायन करीत असतांना धरावयाचा ठेका. १८४.
तिरीबी–प्रकाश-किरण. ४४६.
तितर–तित्तीर पक्षी. त्याचा रंग लाल-काळसर असतो. २१२.
ती–तीन. ८७६.
तीर–बाण. ७६८.
तीव्रपण–तीक्ष्णता. ३०३.
तुडताळी–कुंटीण, दूतिका. ७६५. शि. ६३६.
तुरंग–घोडा. २३२.
तुरंबी–मंजिरी. २२.
तुरें–एक वाद्य. ४७९.
तुषार–बारीक थेंबाचा शिडकाव. ५५१.
तुंब–कांठोकांठ भरलेल्या पाण्याचा प्रवाह. ८२७. उ. ३० ऋ. ४१०,
तुंबा–भोपळा. १७३.
तेजिठ–तेजःपुंज. २११, ८६८.
तेजी–घोडा. २१२, ६९३, ६९४.
तेला उतरणें–साधणें, पुरणें. ४००.
तेसणा–तितका, त्यासारखा. २५१. ज्ञा. ९-९.
तैं–तेव्हां.
तोकडी–कमी, हीन. ३३२.
तोख–संतोष, आनंद. ६७०, ७७४.
तोखणें–संतुष्ट होणें. १७४, ६६७.
तोखवणें–संतुष्ट करणें. ३५३.
तोडर–पायांतील अलंकार. यावर जित व्यक्तींचीं चित्रें कोरलेलीं असतात. ३७३; १७१. धपू. ७०; शि. ३८८.
त्याग–दान, औदार्य. ३५३, ३६६, ३९३, ८१९, ८७९.
त्रिनेत्र–शंकर. ४६८, ७३६.
त्रिपुर–इडा, पिंगळा, सुषुम्ना या नाड्यांनी युक्त असें शरीर. ५४५.
त्रिवळी–ओटीपोटाजवळील तीन रेषा. ३२२.
त्रियंबक–त्र्यंबक, गोदावरी नदीचें उगम–स्थान तें त्र्यंबकेश्वर. ६.

## थ

थडी–काठ, किनारा. २८०. उ. ५०. ज्ञा. २-३४९.
थडियावणें–थापटणें ३०८, ६९३
थोकवणें–थांबवणें, दडवणें. ५१५.
थोबा–समूह. ७८, ५९१.
थोवेकार–सवंगडी, पथकाचे नाइक ८७६. शि. ५०२.

**थोरी**–श्रेष्ठता, मोठेपणा. १८०, ज्ञा. ६-३.

**थोरीव**–श्रेष्ठता, मोठेपणा. २७९, २८७.

## द

**दंड**–द्वंद्व, मांडण, युद्ध. २५८.

**दंडवत**–साष्टांग नमस्कार. ६७६, ७१४.

**दडा**–समूह. २३२. शि. ८०२; उ. १०६, ५१५.

**दवासन**–घोड्यांवरील आसन. ६४५.

**दशन**–दात. ७९८.

**दळ**–(१) सैन्य. २५९, ७५७, ७६७. (१) पान ५८५.

**दळवटणें**-तुडवणें, तिरस्कारणें. ५९०.

**दळवै**–सेनाधिपति, मुख्य. ४१४, ४७४, ६१८. ज्ञा. २–११५.

**दळवाडा ( डे )**–समूह. ४१६, ४१७. ६९६. ८५३. उ. ५७६. ज्ञा. ५-७८. ऋ. २३४.

**दळें**–म्यान, तरवार. ५८९.

**दांग**–समूह, पुंज, अरण्य. ७११, ज्ञा. ११-२१७.

**दाटणें**–(१) गर्दी होणें करणें ४७२. (२) मर्दन करणें,चोळणें. ५५९. (३) अंथरणें. ४६१. (४) अडकून पडणें. ८२. (५) वेढणें, धारण करणें. १७२, ३९५.

**दाटिक**–लहरी. ५३३.

**दाटि**–[१] गर्दी. ७३०. उ.२५८. [२] लहरी. ७७३. उ. ७७३. शि. १८६. ऋ. ४७७.

**दाटुगेपण**–बलिष्ठपणा. २४०.

**दांडी**–पालखी ४५५, ४६२, ३८८, ३८९, घउ. ५२.

**दाढैले**–दाढेंत–संकटांत सापडले. ३१०, ६८९.

**दांतौर**–थंडीमुळे दात खडखड वाजणें. ४३८.

**दादड**–दाट, गर्द. ८३५.

**दादु ( द ) ला**–स्वामी, पति. ३८३, ८४३. ज्ञा. १·१३५; ६-१०८.

**दादुलेपण**–स्वामित्व.३००,३१०, ३१२, ४२५.

**दानमान**–बक्षीस दिलेलें द्रव्य व सन्मान, आदर; मानपान. १३५,

**दानी**–दाता. १३०. अमृ १०-५.

**दानोदक**–संकल्प सोडल्याचें पाणी. ५७, २७९, ३१८.

**दानव**–दैत्य. २५८.

**दापातें**–एकमेकांस गर्दीने दाटून जाणारे. ७१८.

**दापाति**–दटावणारे. ७४८.

**दापें**–दटावणीने. २६८.

**दामणें**-सरळ होणें, घेपणें, वाकणें. ५७२.

**दामोधर**-मंदिर, घर, माडी. ४१३, ४१५. ४१६, ४३८, ४३९, ४४०, ४४३, ४५५. ५२९, ५३५, ५९३.

**दारवठा**-उंबरठा, उंबरा. २११, ३९२, ४२०, ८६६, ८७१.

**दारवठेकार**-द्वारपाळ. ८७०.

**दारवंड**-दरवाजा. ४२०.

**दार-संका**-दरवाज्याची उभी बाजू. ४२०.

**दासी**-सेविका. ६४१.

**दिग्गज**-दिशांना असलेले हत्ती. २८१, ८७१.

**दिठी**-दृष्टी. ९९, ज्ञा. ६-३३.

**दिनकर**-सूर्य ७१३, ७५३.

**दिवटा**-दिवा-मशाल धरणारा. ६९५. ज्ञा. ७-४८; १०-१४२.

**दिवाळी**-दिव्यांची ओळ, एक सण. ७१२, ७३८. ज्ञा. ६-३८९.

**दिवी**-दिवटी. १०८.

**दिहा**-दिवसा. ३२७, ज्ञा. १-१५८ अमृ. ६-६६. शि. ९०१.

**दिहा-दिहा**-दिवसेंदिवस, दररोज. ३२७.

**दी**-दिवस. ५६४, ३६९. शि. ७०.

**दीन्हला**-दिला. ४००.

**दीप**-द्वीप. ५२, ५००, ७०६, ८५५.

**दीक्षा-गुरु**-दीक्षा देणारा गुरु, श्रेष्ठ गुरु. ६३६.

**दीक्षिणी**-पतिव्रता स्त्रिया. ३३५.

**दीक्षित**-दीक्षा घेतलेला, याज्ञिक. २०१.

**दुक (व) ळा**-जोडी. ७४७.

**दुजा**-दुसरा. ५८४.

**दुणावणें**-दुप्पट होणें. १४७.

**दुधावळ**-दुधाळ, दुधानें युक्त. ७९९.

**दुभणें**-द्रवणें, दूध देणें, सफल होणें. ५६९.

**दुभते**-दूध देणारे, पाझरणारे ५४८.

**दुस्मर**-खिन्न मनानें. ३९६.

**दुहणें**-दूध काढणें, दोहन करणें. २०

**देखणे**-पाहणारे, बुद्धिमंत. ६६८.

**देज**-दान, वराकडून वधूच्या मोब, दल्यांत तिच्या पित्याला दिलें जाणारें द्रव्य. १९४. शि. २०७; ४४१.

**देव**-राजा. १२१, १२२, १२३-२२७, २७२.

**देवदेव**-देवांचाही देव; श्रीकृष्ण. ८३०.

**देव-वल्लभ**-देवांचा आवडता, एक वृक्ष. ८३७.

**देव्हारें**-देवघर. ४३७. उ. ५७.

### ध

**घाटी**–त्रेसण, पाश. ३०८. ज्ञा. १२-४७.

**घाडी**–[१] समूह, थवा. ३९३. [२] स्वारी, हल्ला. २१७, ४८५. शि. ३४.

**घात-क्षय**–धातुक्षयाचा विकार. ५६२.

**घानाश्री**–गायनांतील 'धनाश्री' नांवाचा राग. २०८.

**घारसा**–खळाळ, जोराचा प्रवाह. २२३, ३२८, ७१८. उ. ५५. ज्ञा. ६-४७४.

**घारा**–(१) धाकटा, लहान. २९७. उ. ६३७. (२) प्रवाह, ओघ. ३१८.

**घारातीर्थ**–रणांगण. २४६.

**घारा-दामोघ(द)र**–कारंजीं वगैरेंनी युक्त असें शीतलोपचाराचें घर; धारागृह. ४१३, ४३२.

**घाला**–संतुष्ट झाला. ७०, ३१९.

**घावणी**–उपचार. ६८२. शि. ४१९.

**घुघुवाए**–गर्जना करी. २५१.

**घुनीत**–धारण करतो. ४८९.

**घुपाडी**–धुराचें भांडें, खूपसा धूर. ४७३, ५५०.

**घुमकुस**–गर्दी, नृत्य. ४३.

**घुर**–सेनापति, मंत्री. ५२४; ४८४. शि. १२६.

**धुळिवाडी**–धूळवड, धुरळा, धूळमाती. ७६०, ७६२.

**धुळौडी**–धुळवड, धूळमाती. ५२७.

**धूं**–धूर. ५४९.

**धूनि**–धुऊन. ३९५, ४४०.

**धूर्जटी**-शंकर. ४९८.

**धेंडवाळी**–कोलीत, मशाल. ७३८. ए. भा. १०-५६८.

**धोटा**–रंग उडवण्याची पिचकारी. ८४५. शि. ६६९.

**धृव-पद**–एकप्रकारचें गीत. अस्थायी, अंतरा, संचारी, आभोग हे त्याचे चार अवयव होत. देवलीला, राजकीर्ति इत्यादींचें वर्णन यांत असतें. १८६.

## न

**नपुंसक**–षंढ, विषयोपभोग घेण्यास असमर्थ. ८४३.

**नर-नाथ**–राजा. २४६.

**नर-पुरंधर**-नरेंद्र, नरश्रेष्ठ. १३१.

**नव-ग्रह**–रवि, सोम, मंगळ, बुध, गुरु, शुक्र, शनि, राहु व केतु. ८७२.

**नवै-निधि**–कुबेराचीं नऊ भांडारें; पद्म, महापद्म, शंख, मकर, कच्छप, मुकुंद, कुंद, नील व खर्व. ८५९.

**नव-रत्न**–मुक्ता, माणिक, वैदूर्य, गोमेद, वज्र, विद्रुम, पद्मराग,

**निंधी**–खजिना, प्रसवभूमि. ८९.
**निनिलिया**–घालविल्यावर. ४०६.
**निफजणें**–निर्माण होणें. २५. ज्ञाप्र. ६४२. ज्ञा ७-१६.
**निभ्रांत**-निश्चित, खरोखर. ४६६, ६७१.
**निमिषोन्मिष**-डोळ्यांची उघडझाप. १९८.
**निमुरवत**–टणक, निबर. ४९०.
**निर्गुण**–[१] गुणरहित [२] निराकार. ३७०.
**निरंतर**–नेहमी. ४३८.
**निर्या (रया) स**–रस, सार.५३७. उ. ९९.
**निरुता-ती-तें**–पूर्णपणें, पूर्ण. २९, ३०, ४६, १५२, १८३, २३५, २९५, ४०९, ६४४, ८२२, ८२३, ८७४. अमृ. ७-१२. उ. ७२९, ५०१, ६८१. गो. २२०. ज्ञा. १० ६३, ६७.
**निरोध**–अडथळा. बंधन. ४०२.
**निर्वधी**–[१] निश्चयाने [२] मर्यादा-रहित. १८.
**निवटणें**–फोडणें, ठार करणें, नाहींसें करणें. २४३, उ. ४४४.
**निशाण**–एक रणवाद्य, दमामा, नगारा. १२८, ७४९.
**निषा ( सा ) द**–सात स्वरांतील एक स्वर. १८०.
**निसरबोडी**–निसरून पडणारी. ८६६.
**निसवणें**–बाहेर येणें, निघणें.४८९.
**नि (ने) हा**–आवाज. २२२. मारु. ३१.
**निळयाचे**–नील रत्नाचे. ८४५.
**नीकोप**–निर्दोष. ८६.
**नीर**–पाणी. ५४५.
**नीलोत्पल**–नील कमल. ९१, १६६, ३२६, ४७५, ७४०.
**नि (ने) हटी**–जवळ. ८७३. ज्ञाप्र. ४१८.
**नीहारणें**–हळूहळू चालणें. ४५९.
**नुपचारेति**-उपचारलीं जात नाहींत, त्यावर इलाज चालत नाहीं.६८०.
**नुपेक्षणें**–उपेक्षा न करणें, दुर्लक्ष न करणें. ६४०.
**नुमाणे**-मोजत नाहीं, मोजला जात नाहीं. ३२, १६०.
**नेटकें**–चांगलें, सुंदर. १३८, १३९.
**नेणणें**–न जाणणें, न ओळखणें. २८, २९, २९३, ३६४.
**नेणीव**–अज्ञान. ४१, ४२.
**नेदी**–देत नाहीं. ३६६.
**नोकें**–धिक्काराने. ३०९.
**नोवरी**–उपवर कन्या. २०३.
**नोळखवे**–ओळखतां येत नाहीं. ३०१.

## प

**पगड**–पक्ष, धंदा. ८७५.

**पंचधार**–तळहातावर पाणी टाकून पडणाऱ्या धारा. ५४८.

**पंचाग्नि**–दक्षिण, गार्हपत्य, आह्वनीय, सभ्य व आवसथ्य हे पांच प्रकारचे अग्नि. ५६०.

**पडप**–शोभा, कांति. ७२३. उ.२५. ४२. ज्ञाप्र. ५७८. ज्ञा. १०-४६.

**पडकणें**–सवकणें, सवय लागणें. ५८४.

**पडघावणें**–गायन करणें. ३९७.

**पडवा**–पलंगाची नवार. ४५६. गो. ६६.

**पडिमठें**–गायनाचा प्रकार. ३९७. शि. १६९; ६९७.

**पढणें**-बोलणें, म्हणणें. १३६, १७४, ५३३.

**पढवणें**–शिकवणें, पठण करायला लावणें. ३७१.

**पढिए**–आवडती. ५.

**पढिघावणें**–गायन करणें. २३५.

**पढियंता-तें**–आवडता, प्रिय. ६४२, ६६६. शि. २२८. अमृ. १०-१३. ज्ञा. ७-१२३.

**पढियार**–विशेष आवडतें. ३९२.

**पतंग**–दिव्यावर झडप घालणारें पाखरूं. ६३१.

**पत्रवल्ली**–नक्षी, सुगंधी उटण्याने काढलेलें नक्षीकाम. ४२३.

**पद्मराग**–लाल रंगाचा मणी. १६६, ७९८, ७४०.

**पद्मिणी**–सूर्यप्रकाशाने प्रफुल्लित होणारी कमलिनी. ३८०, ५७१. ७५३.

**पन्नग**–सर्प. १८३, २०४, २०७.

**पन्हरें**-पंघरा. ५६४.

**पन्हातें**–दूर दूर. ४३०.

**पर**–दुसरा; शत्रू. २८४.

**परजणें**–शस्त्र चालविणें, युद्ध करणें. २४३, २६९, ३०४. उ. ८८०. ज्ञाप्र. ७८१.

**परतिलीए**–घोळलेल्या. ५७८.

**परमानंद**–श्रेष्ठ आनंद; फार मोठा आनंद. ७३२.

**पराग**–(१) फुलांतील रेणु. ७३९; ७६०, ७६१, ७७५. (२) चंदन, केसर. ८१४, ५५९.

**परिए**–झोके. ९.

**परिएळ**–तबक. ११, ३९१. गो. १११.

**परिचारिका**–सेविका, दासी. ५६०.

**परिमळ**–सुगंध. २३, ४०७, ५८९, ६००, ६५२, ७२४, ७८०.

**परियसे**–ऐक १५४, १६९, २१०, २३४, २५५, २७३, २८९, २९१.

**परिघंट**–पदर. १७२.
**परिवार**–भोंवतीं असणारे, लवाजमा, सेवक वगैरे. ७३३, ७४३.
**परिसर**–टापू, विभाग. ५२.
**परी**–प्रकार, रीत. ६७५.
**परौती**–पलिकडे. २७४. अमृ. ६-५८.
**पर्व**–पर्वणी. ३०५.
**पवन**–वायु. ६९४.
**पवन-वेग**–वाऱ्याचा वेग. ६९३.
**पवळा**–पोवळें. १६४; ४६७.
**पवाडा**–पराक्रम, कीर्ति, यशोगीत. १७, २२८, २५४, ३१६. ज्ञा. २-१०.
**पवेति**–पावतात. १९.
**पव्हे**–पाणपोई. ७०८, ७०९.
**पसि**–पेक्षा. २१८, ७४१. उ. ७९६. ज्ञाप्र. २०९.
**पहुरें**–एक चर्मवाद्य. १७७.
**पळवणें**–जाळ होणें, जळणें. ४५४.
**पळवा**–जाळलेली. ६८७.
**पळिपणें**–जळणें. ४५२, ४५४.
**पां**–निश्चित. ४१३, ६२५. ज्ञा. ८-४.
**पाइरउ**–भूतबाधा. ४०१.
**पाउड**–नजराणा, देवतांना अर्पण केलेलें द्रव्य. ६९०, ८७४. ज्ञा. १८-४६. शि. ११३.
**पाउवा**–पादत्राण. जोडा. ३८९. ज्ञा. १३-४१६.
**पाउळ**–पाळेगण, सैन्य. ७२५.
**पाख**–पंख. १६९, ७९०.
**पाखंडी**–वेदविरोधक, ईश्वरावर श्रद्धा न ठेवणारा, नास्तिक. ३६६.
**पाख-धुनी**–पंख धुणें, स्नान. ४८७
**पाखाड**–पाख्याचा एक भाग, उतरती बाजू. ७८१.
**पाखाल**–पाण्याचा भाग. ४२९.
**पाखाळणें**–धुणें. ५८२. अमृ. २-११.
**पांखिरूं**–पक्षी. १५०, १६४, ६३६, ६५९, ८०२. ज्ञा. १८-१७१३.
**पांग**–इच्छा. १३०. ज्ञा. ६-३३३.
**पांगवणें**–जाळें टाकायला लावणें. ५९७.
**पागारी**–संरक्षणकर्ता. २५०.
**पांगुरविणें**–अंगावर घालणें. ४०७, ५८३.
**पाच**–एक रत्न-विशेष. ४२६, ४७१, ८३५.
**पाचारणें**–बोलावणें. ८४७.
**पांजर**–पिंजरा. १६०, ६०८. ज्ञा. ७-१५४.
**पाजळणें**–जळणें, पेटणें, प्रज्वलित करणें. ५२७, ५३४, ५४५, ५७६, ६९९.
**पाट**–(१) पिढें, बहुमानाची जागा.

२०६. (२) वस्त्र. ४६०. (३) प्रवाह. १३७, ७७१.

**पाटाचा**-पट्टाधिकारी, ज्येष्ठ, श्रेष्ठ. ३७६. ज्ञा. १८-९०८.

**पाटाची**-पट्टाभिषिक्त, श्रेष्ठ. ६४.

**पाटा फुटणें**-आडपडदा नाहींसा होणें, ज्ञान होणें, दिसणें. २९. ज्ञा. १-२३. वृद्धा. ११.

**पाठीं**-मग, नंतर. ४६५, ५६२.

**पाड**-सारखा, समान, तुलना. ३०६, ३८४, ४१७, ४२७, ४७३, ५७३. उ. २९४. धपू ६६.

**पाडळ**-एक सुगंधी वृक्ष. ८०९. शि. २९६.

**पाडें**-पाडस, रानगोऱ्हे. ७४५.

**पाण-केळी**-जलप्राशनाची क्रीडा, जलक्रीडा. ७५९.

**पाणिक**-पन्नग, सर्प. १८३.

**पाणी-तुळी**-पाणी भरून ठेवण्याचें भांडें. ४२६, ४६१, ७६१.

**पाणी-पद**-तेजस्विता, तीक्ष्णता. २४३.

**पाणी-पात्र**-पाणी प्यावयाचें भांडें. ५०८, ५४८. ए. भा. २३-५२०.

**पाणी-काढे**-पाणी काढणारे चाकर, मोट धरणारे. ७७९.

**पाणियांतुल**-पाण्यांतील. २३८.

**पांत**-पाहत. ७१९, ७९५, ६७९. उ. ३८०.

**पांतां**-पाहतां, विचार करतां. ६८, ९२, ९९, १६२, २०६, ३२०, ३३५, ४८३, ६०७, ८६६. उ. ७०. शि. ८०१. ज्ञा. (रा) १-२०९.

**पाताळ**-पायाखालील जमीन. ४५२.

**पाताळौनि**-पाताळाहून. ७१६, ८७३.

**पापडी**-बांधून काढलेला रस्ता. ७८१.

**पाबळ**-तुच्छ, हीन. २४५. ज्ञा. १०-१९४ ज्ञाप्र. २१५.

**पामरी**-हीन, दीन, बिचारी. ७६९.

**पाय-तळें**-पायाचे तळवे. १६६.

**पाऱ्हा ( ल्हा ) वणी**-पाझरलेलें पाणी. ५६९.

**पायाळ**-जन्मतांना पायाकडून जन्मलेला. ३०, ५४७. ज्ञा. १२-१७९.

**पारज**-पारा. ५६३.

**पारखणें**-कसोटी लावून पाहणें. ३८.

**पारणें**-उपासाचा शेवट. ८५०.

**पारिजात**-स्वर्गातील एक वृक्ष. ८३७.

**पारिवा**-( १ ) पारव्यासारखें घुमण्याची क्रीडा. ८५३. ( २ ) एक पक्षी. ७४९.

**पालक**—पल्लक, पाळणा. ११२.

**पालखत**—मांडी. ११२. उ. ६६९; वच्छ. १८७.

**पालव**—(१) कोवळें पान. (२) पदर. ३९०, ७८४. ज्ञा. ११-३०१. ज्ञाप्र. ६४९.

**पालवी**—कोवळीं पानें. ६२२.

**पालाणणें**—खोगीर वगैरे घालून सज्ज होणें व घोड्यावर बसणें. ७३६. बपू. १४.

**पालौ**—पल्लव, पदर. ३९४.

**पाल्हाणें**—पल्लवित होणें, बहरणें. ३, ८०९. ज्ञा. ६-२५८.

**पावो**—पाय. ४५१, ४५२.

**पांस**—पाश, फांसा. ५९५.

**पासवडा**-आच्छादन, चादर ४६१.

**पासाव**—पेक्षां. ३३६. ऋ. ६१.

**पासिक**—पाश, फांसा. ११२;३००.

**पासी**—जवळ. ३७२.

**पासौनि**—पेक्षां. २७, ५९, १६१, १६२, १९३, २०२, २०७, ३२१, ३३६, ३३७, ३४८, ३७३, ४३१, ६४६, ६६८, ८४१, ८७३.

**पाहात(न)पट**—प्रभातकाल, सकाळ. ६९१. शि. ७९०. उ. ५०८.

**पाम्हार**—प्रहर, दिवसाचा भाग. ५४६, ६९१.

**पाहुण (न) रू**—पाहुणचार, पाहुण्याला योग्य असा आदरसत्कार. १४८, ७९५. उ. ४७८. अमृ. २-१८; धपू. ४७. ज्ञा. १०-११.

**पाहे**—उद्यां. २७६.

**पाहों**—पाहुण्यासाठी. १२३.

**पाळेगण**—सैन्य. ७११, ७२६. शि. २४७.

**पाळी**—काठ. २२८,८६४. गो. ६२.

**पिनाक-पाणी**—पिनाक नांवाचें धनुष्य हातांत धारण करणारा, शंकर. ६६३.

**पिलूं**—लहान बच्चा, बछडें. ७९२.

**पिलीं**—पिलें. ४७२.

**पिलुक**—पिल्लूं, लहान मूल. ७५१.

**पिसी**—वेड. २४७, ५६१.

**पुडिच**-आंतलें, गाभ्यांतील, पुडांतील ८६.

**पुढां**—समोर. ६४३. ऋ. ४४०.

**पुढिल**—सखा, सखी, दुसरा. ५१९, ६३४, शि. १९१. ज्ञा. १८—६७८.

**पुन**—परंतु. ६१, ९३, १९६, ११६, १९२, २०२, २१२, २९८, २९९, ३३५, ५२०, ५४४, ५५६, ५५९, ६३६, ६३७, ७२१, ८०४.

**पुंनाग**–एक वृक्ष. ८१४.

**पुराणिक**–पुराण सांगणारा. ६४८, ६५४.

**पुरतें**–पूर्ण. ६९७.

**पुरे(र)तयाचा**–पूर्णपणाचा. १३७.

**पुसणें**–विचारणें. ६१९, ६५७.

**पुंसा**–पक्षी, पोपट. ५९५, ६०८, ७४९, ८२६. ज्ञा. ११-१७.

**पुळिका**–कण, रवा. ५४४. अमृ. २-५१.

**पुक्षरस**–पुक्ष = पुष्कर नांवाच्या रत्नाचें पाणी. ५३९.

**पूजाविधान**–पूजेचा प्रकार. १४१.

**पूर**–पाण्याचा अथांग तुंब. ४७२.

**पेखणेकार**–नर्तक, नर्तिका, गणिका, वेश्या. ४७९.

**पेटारा**–करंडी. २५१.

**पेठ**–व्यापाराची जागा, वसतिस्थान. ४७७, ८३९, ८६१, ऋ. ६८.

**पेड**–डोंगराच्या उतरणीवरील सपाट जमीन. ४७३.

**पेणें**–वस्ति, मुक्काम. ४६९, ६९९. ऋ. २७.

**पेहें**–पेय पदार्थ, दूध. ९. ह. ४४. ऋ. ५.

**पैं**–निश्चित. १५९, ५२४, ६७१. उ. ४४.

**पैक**–समूह. १२४.

**पैजा**–होड. २८२. ज्ञा. ६-१४.

**पैरावणें**–आच्छादणें, नेसवणें. २६९.

**पैल-पार**–पलीकडचा काठ. ७२१.

**पैस**–विभाग, विस्तृत जागा. ८७८.

**पैसु**–प्रयत्न, धीर. ४४५.

**पोतास**–कापुर. २५, ५३९, ५४४, ५५४. ७५८. अमृ. ४–५. ज्ञा. १०-१४२.

**पोफळगांठी**–पदर न काढतां, गांठ देऊन साडी नेसण्याची पद्धत. ८४२. शि. ६५४.

**पौळि**–आवार, भिंत. ८६४, ८६७, ८७२, ८७३.

**प्रतिकार**-उपचार, निवारण्याचें साधन. ५३८, ५८६, ५९२.

**प्रतादिनी**–दररोज. ३५८.

**प्रथम-जात**–आरंभीं निर्माण झालेली नवीन. ४८४.

**प्रदोष**–सायंकाळ. ३६५.

**प्रधानिक**–महत्त्व, पुढारीपण. ७५७.

**प्रबंध**–संगीत काव्य. ३४१, १८२. उ. ३६. ज्ञा. १२-१९.

**प्रमदा**–स्त्री. ७३७, ८४३.

**प्रमय**–सिद्धांत. २५. उ. २६; २८.

**प्रव्हाण**–एक जलवाहन. ७२०. ज्ञा. १८-७०५.

**प्रवाळ**–पोंवळें. १३४.

**प्रवर्तिक**–प्रवृत्ति-उपभोगेच्छा निर्माण करणारे. १४२.

**प्रवीण**–हुशार, चतुर. १६२.
**प्रशस्ति**–स्तुति. १३६.
**प्रस्थान**–जाणें, गांवास जातांना करावयाचा विधि. ६४३.
**प्रसादणें**–प्रसन्न होणें. ६३८.
**प्रहसित**–हास्ययुक्त. २२९.
**प्रळय-पावक**–संहारकालीन अग्नि. ५७१.
**प्रळय-मेघ**–संहारकालीन ढग. ७१७
**प्राकृत**-सामान्य. ३४.
**प्राणेश्वर**–पती. नवरा. ३३८.
**प्रासाद**–(१) राजवाडा. २४९, ४७९. (२) देऊळ. ५०१.

## फ

**फडतर**–फाडलेल्या चिंध्या. १९८.
**फडा**–नागाचा फणा. २०५.
**फणि-मणी**–( १ ) सर्पांचा राजा. ( २ ) सर्पांच्या डोक्यांतील मणी. २६८.
**फळणें**–फलद्रूप होणें, सफल होणें. ६१४.
**फळेकार**–एक पक्षी. ७४८.
**फळेथर**–फळ्यांचे थर. ४१८.
**फळे-वरि**–(गोफणींत) फळें घालून, फळांनी, फळापर्यंत. ५९८.
**फळोवळी**–फळांच्या पंक्ती. ७८७.
**फुंक**–तोंडाने घातलेला वारा. ५३४.
**फुटणें**–तान्हेने-घाबरें होणें, कंठ सुकणें. ४६३. ऋ. २२२; १८८.
**फुटा**–शेला. १७२, ४०७, ५८३. ७४१.
**फुडी**–स्पष्ट, उघड. ६६६. ज्ञा. ६–२९०.
**फुडें** निश्चित, उघड. ९९, २३२, अमृ. ७-१८. उ. ६७. शि. १२४.
**फुल-सांत**–फुलांचा बाजार. ४७७.
**फुली**–एक झाड. २९.
**फुलौरा**–(१) फुलांचा बहर, मोहर. ४८९. ज्ञा. १०-१०. (२) देवावर खाद्यपदार्थ–फळें वगैरेनी बांधलेली माळ. ७८९. गो. १०२.
**फूक**–वाऱ्याची झुळुक. ५७६.
**फोडी**–सुपारीचें खांड. ३९६.
**फोडी-लागणें**–सुपारी लागणें, अंग गरम होऊन शहारणें व मूर्च्छित होणें. ३९८.

## ब

**बकुळ**–एक पुष्पवृक्ष. ८१४.
**बखलणें**–कुटून नाहीसें करणें, चेंदामेंदा करणें. २९४.
**बगवें**–करंडा. ३९७.
**बचकुंद**–एक वृक्ष. ८१४.
**बटकी**–कन्या. २१३.
**बटिकी**–दासी, सेविका. ३८६ ३८८, ४५८, ५९८, ८१९ ८२५.
**...दिराज**–श्रेष्ठ

**बद्रिकाश्रम**–हिमालयांतील एक स्थान. ८००

**बंदीजन**–भाट, स्तुतिपाठक. १३४, १३९, १६२.

**बन**–उद्यान, बगीचा. ३८८, ५९७, ७२३, ७२९, ७८०, ८०४.

**बनकर(री)**–माळी. ५९८, ७४६, ७९४, ८२५. शि. २५५. ज्ञा. १०-१६९.

**बरंगाळ**–पर्जन्यधारा. ७३९.

**बरव**–श्रेष्ठता, मोठेपणा, सौंदर्य. ७६, १००, १९७, ३३३, ४२०. उ. ६०३. ऋ. ७२.

**बरवंट**–सुंदर, चांगलें. ७२८, ८५९. उ. ३९१.

**बरवेपण**–सौंदर्य, चांगलेपणा. ५६, ७३, ८९, ३२०.

**बहिरणें**–बधिर होणें. वृत्ति मुग्ध होणें. ५१८.

**बहुवें**–पुष्कळ. २७. ज्ञा. २-२७४; ६-३९९.

**बहुवस**–पुष्कळ. १९३, ३५२, ४०४, ७७६, ७८०, ८५०. अमृ. २-३८. ह. ५१७. एभा. ९-३२३. ज्ञा. १-३८.

**बहुसाल**–पुष्कळ. ३५२.

**बहुळिव**–पुष्कळ. ४२२.

**बळभद्र**–बळिराम, श्रीकृष्णाचा वडील भाऊ. ७०८.

**बाइल**–स्त्री. ११, ७४, १९३, ३०१.

**बाचट**–विष. ७६८.

**बाण-लिंग**–खडकावरील किंवा पाण्यावरील लहान लिंग (पिंड) ४८७.

**बांधेरे**–आरावा, मोर्चे. ५२४. उ. ४४३.

**बापया**–चातक. ३९.

**बापुडा**–दीनवाणा, बिचारा. ३५५. ह. १३.

**बांबळणें**–पल्लवित होणें, बहरणें. ४७३.

**बारव**–पायविहीर. ८०५.

**बारिणी**–छत्र धरणारी. १०२, ३८५. एभा. १२-५६१.

**बारी**–कालवा, पाण्यासाठी काढलेला चौरस भाग. ८६८.

**बावन**–चंदन. २४९, ५३८, ५३९ ५४१, ६१९. ऋ. ४५.

**बासटोनि**–विष चढवून, लेप देऊन ७८०.

**बाहाळ**–पुष्कळपणा, उत्कर्ष, बहर. ७२३. उ. ४७. शि. ३२२.

**बाहीर(रि)**–बाहेर. ६९२, ७१५.

**बाहुली**–डोळ्यांतील पुतळी. ८२२, ४२१.

**बाळाणें**–सज्जा, खिडकी. ४१८, ४१९. शि. २४०. उ. ३७८.

**बिक**-भूषण, महत्त्व. तेज. ४७, ३६८, ७०५, ७५९. उ. ४६. ज्ञाप्र. १०८. अमृ. २-६.

**बिढार**-बिऱ्हाड, घर. ६२७, ७२७. ज्ञा. १२-२११.

**बिर्दी**-रस्ता. ८५.

**बियाळ**-बेंबिळ; वाटेल तें, ३७.

**बिरार**-स्पर्धा. ९५, ८६०, शि. ४०३.

**बिहालीं**-भ्यालीं, भ्यालेलीं. ५८०, ७०२. ज्ञा. ११-३२.

**बिहे**-भितो. २५४, ३०४. ज्ञा. ६-७.

**बीकभरी**-उत्कर्ष पावलेलें. ८११.

**बीज**-द्वितीया. ४८९.

**बीजाक्षर**-मंत्रांतील आद्य अक्षर. ८१६. ज्ञाप्र. ९३०.

**बुढ**-बूड, खालचा भाग. ८३४.

**बुधीं**-बुद्धींने. ६२८.

**बेडी**-एक जलवाहन. ७२०.

**बेंबळ**-ढिला. ४४८. ज्ञा. १-१९७. ऋ. २२६.

**बैठिया**-बसलेली. ४४४.

**बोझा**-अर्क, रस ६०३. उ. ७९७. ऋ. ५५१.

**बोझा (ला) वणें**-रंगणें. ७२३.

**बोणें**-भोजन. ४८. अमृ. १-३६. गो. १११.

**बोंबी**-बेंबी. २०४.

**बोरा**-लाल खडा, 'गोहर?'. ४७१. उ. ६४५.

**बोलिका**-बोलणारा. ३९.

**बोली**-बोलणें, भाषण. ६२९.

**ब्रह्म-कटाह**-ब्रह्मांड हीच कढई.

**ब्रह्मपुरी**-देवनगरी. ८७७.

**ब्रह्मरस**-ब्रह्मानंद. ७०.

**ब्रह्मविद्या**-परब्रह्माविषयींचें ज्ञान. ८५६.

**ब्रीद**-व्रत, पराक्रमाचें चिन्ह. २१, २३८, २६९, ६८४.

## भ

**भक्त-वत्सळ**-भक्तांवर पुत्राप्रमाणे प्रेम करणारा. ६४०; ६७२.

**भंग**-थरकांप. ५४०.

**भंगणें**-नाहींसें होणें. ६६४.

**भद्रजाति**-एका विशिष्ट जातीचा हत्ती. २२१.

**भर**-बहर, पुंजका. ५५८.

**भर (रि) तें**-समुद्राला आलेली भरती, पाण्याचा चढ, उत्कर्ष, बहर. ४१, ३४३, ५५०, ८१३.

**भरंवसा**-विश्वास. ९२, ६१९.

**भरी**-करी. २६३.

**भलता**-कोणीही, वाटेल तो. ७५२. ७६९. ज्ञा. ११-२०.

**भलतेउतें**-कांहीतरी. ३६७.

**भला**-पुष्कळ. ७०४.

**भलें**-चांगलें, योग्य. १२३.
**भव**-संसार. ७३५.
**भवंडी**-चक्कर, गिरकी. ३८९.
**भवता**-सभोंवार. ८२२.
**भवर**-भुंगा. ४७४, ५०३, ५३२, ५९७, ६११. अमृ. ५-४२. उ. १४. शि. ६८९.
**भाका**-भाषा, शब्द. ५३३.
**भाट**-स्तुतिपाठक. १३१, ६५९, ७४९. ज्ञा. ६-४५६.
**भाटिव**-भाटपणा. १०. ज्ञा. १७-२९७.
**भांडार**-खजिना, कोश. ५७, २६६, ४३६, ७१३, ७९८, ८११.
**भांडारी**-खजिनदार, कोठारी. ६९५.
**भाणें** भोजन. ६१३. ज्ञा. ८-१४३.
**भांब (भ)**-दीप्ति, प्रभा, तेज. ८७, ४१८. ज्ञा. ६-२५३.
**भांबावणें**-भ्रांत होणें. ५३२.
**भारणी**-भारणारा मंत्र. ५३३.
**भारणें**-संचार होणें. ५३३.
**भारासिंग**-चितळ, सांबर. ७४५.
**भाव**-( १ ) प्रकार, रीत. ६५०. (२) अंतःकरणांतील इच्छा. ७१, ६७३.
**भावरीय**-भाव जाणणारे, पारखी, मर्मज्ञ. ३८.
**भाषणें**-बोलणें. ६१२.
**भाषांग**-भाषेचे प्रकार. १८४.
**भासळणें**-लुप्तप्रभ होणें, मिसळून जाणें, हरपून जाणें. ९४, ३३०, ५१६, ७१०, ७८४, ८४४, ८६७.
**भास्वत**-प्रकाशमान; एका समुद्राचें नांव. ८५५.
**भिडा**-भिडेने. ३७५. ज्ञा. ११-७८.
**भीतभंग**-खोलीचे दोन भाग करणारा पडदा. ४२६. ऋ. ४२३.
**भीतरीं**-मध्ये. ५१६, ६७३, ७७६, ८०६.
**भीतरील**-आंतील. ८३.
**भीतरिली**-आंतील. ८१८.
**भुजा**-हात, बाहु. ५०३.
**भुवन**-घर. ७२२.
**भूतधात्री**-पृथ्वी, वसुंधरा. २२४.
**भुररें**-चेटुक, जादूटोणा. ६९२. उ. ३४२. शि. २७२. ज्ञाप्र. ७३० ज्ञा. १३-७५६.
**भूर्जपत्र**-भूर्ज नांवाच्या झाडाचें पान. ६७५.
**भूषण**-अलंकार, दागिना. ४५४.
**भेदरा**-भीति. ४६५. शि. ४८३.
**भेण (णें)**-भीतीने. १४०, २२४, ३१२, ६१६, ७१३, ७९०. ८५८, ८६३. धउ. ४७.
**भेरी**-एक रणवाद्य. ७४७.
**भोई**-छत्र धारण करणारा, पालखी वाहून नेणारा. ३९२, ४५८, ६९५.

**मनोभाव**–अंतःकरणांतील इच्छा. ६३४, ६३५.

**मन्मथ**–अंतःकरण घुसळणारा, मदन ८८, ९२, २४६, ५९१.

**मन्मथ-नाथ**–श्रीकृष्ण. ४९४, ७३३, ७६३, ७७२, ८१७.

**मयोर**–मोर. ७४७.

**मलपणें**–डोलणें. २६.

**मल्लिका**-एक वेल. Jasmine. ८१५.

**मल्हार**–एक राग. २३५.

**मवणें**–मोजणें. ३२, ८११. अमृ. ५-२६; गो. ५४. ज्ञा. १२–६३.

**मस(श)क**–चिलट. ६७१, ६९८.

**महादानी**–अत्यंत उदार. १३०.

**महाबाहो**–मोठ्या भुजांचा. २५४.

**महा-रुद्र**–शंकर. २९४.

**महा-मोह**–मोठी माया, अज्ञान, ६६४.

**महा-रोग**–एक विशिष्ट रोग. ६८०.

**महिमा**–मोठेपणा, श्रेष्ठता. २७५.

**महुर**–मोहर, बहर. ५५८, ७७६, ८३५.

**महुटें**–छपराचा अग्रभाग. ४२२.

**महुरणें**–बहरणें. १३९, ४८८.

**मळयज**–चंदन. ५६५, ४१७.

**मळनें**–उटणें, उटी. ८४४.

**मळय-पांचौर**–यक्षकर्दमाची पेटी; सुगंधी द्रव्यांचा करंडा. ८५६. उ. १२५, ६६२.

**मळयाचळ**–मलय पर्वत. ५३६. ५३७, ६०१, ७९०.

**मळ (ल) यानिळ**–मलय पर्वतावरून वाहत येणारा सुगंधी वायु. १३१, ५८१, ६१६, ७६४, ७६५.

**मागता**–याचक. २६६. शि. १५०.

**मागध**–भाट, स्तुतिपाठक; वंशसूचक ३५, १३०, १६१, १६९.

**मागां**–(१) मागच्या बाजूस. ३९६. (२) पूर्वी, मागे. ५४५, ६३६.

**माघौतें**–पुन्हा. ७१५. ज्ञा. (रा) २-१७५

**माचा**–मचक, पलंग. ३९१.

**माच**-मंचक, पलंग. ४२३.

**माज**–(१) मध्यभाग, कमर. ३२१. (२) उन्मत्तपणा. २४०, ७६६. ज्ञा. १०-१२०.

**माजवन(ण)**–(१)उन्मत्त करणारें, मद्य.७३६, ७५२. ज्ञा.११-४२. (२) उन्माद; उन्मत्तपणा. ७३, ३२२.

**माजवणें**–उन्मत्त करणें. ३२५, ५०५.

**माजि**–मध्ये. ४३३, ५००.

**मांजौळें**–मध्यम. ३२५.

**माजिरी (रें)**-उन्मत्त करणारी-रें. ४७२, ४८१, ७५२, ७६९.
**माझा**-सेवक. १२८.
**माझारि (रीं)**-मध्ये. ५००, ६९९, ७३०, ८७४. ज्ञा. १-८. ज्ञाप्र. ७९२.
**माझारिली**-मधली. ८७६.
**माडे**-माडवा. ८६८.
**माणिक-सिंप**-मोत्यांची शिंपली. ५५४.
**मात**-गोष्ट. १०७. अमृ. ८-१०. उ. १८७. ज्ञा. १-६१.
**माताइता**-माजरा, उन्मत्त. ४८३, ७४३.
**मातांग**-मांग, अस्पृश्य. ४६४.
**मातावळ**-प्रमत्त, प्रमत्तकारक. ७३५
**मातावळी**-उन्मत्त, ८४०. उ. ४३३. शि. १५.
**माति**-मावतात. २३९.
**मात(तु)ळप**-वृक्षविशेष. ७२४.
**माते**-आई ! ६७१.
**मातें**-मला. ६४१, ६४४.
**माथें**-डोकें. ३९०.
**माथां**-डोक्यावर. ७४१. ऋ. ३५२.
**मादरी**-खासदार, मोतद्दार. ६९५.
**मांदळी**-मृदंग वाजविणारे. १७८.
**मांडव**-मंडप. ७९३.
**मांदाडा**-समूह. ८०९.
**मांदार**-मंदार, एक वृक्ष. ७१५.
**मांदी**-समूह, गर्दी. ८५, १०८, ४७७, ४७९. ज्ञा. ७-१०६.
**माधवी**-(१) वसंत ऋतूंत फुलणारी एक वेल. हिला पांढरीं फुलें येतात. ७९४. (२)चंद्राची सतरावी कळा. (३) माध्वी, मदिरा. ५०५.
**मानणें**-मान्य होणें. २८, ४४४.
**मानवणें**-संतुष्ट करणें-होणें. ६७३
**मानवीं**-मनुष्यप्राणी. २०२, २०७.
**मानस**-अंतःकरण. ३२८, ६४५.
**मानिनी**-अभिमानी स्त्री, नायिकेचा एक प्रकार. ७६५.
**माप**-मोजावयाची घटिका. ४९६.
**माय**-मावते. ५४.
**मायक**-मायेने निर्माण केलेलें. ३०९
**मारांक**-शस्त्र, बाण. ३०७.
**मारें**-मारण. ५८७; शि. ३०१.
**मारें**-मार्‍याचें शस्त्र. ४६६.
**मालखंड**-नाबद, साखरेचा एक प्रकार. ८५१.
**मालाथ(व्हात)णें**-(१)पेच घालून कवेंत पकडणें. ७५४ (२) अंतः-करण वेधणें, वश करणें. ३८३. ज्ञाप्र. ६३२
**माल्ह (व) णें**-माळवणें, विझणें. ६३० . ज्ञा. १-१५८.
**माल्हाडी**-आनंदानें. ८४, ७७३.
**मास**-महिना ५४४.
**माळधर**-श्रेष्ठ लोक. ८२५.

**मियां**–मीं. १५३.

**मिसियांचा**–मिशा असलेला. २४५.

**मिसें**–मिषानें, रूपानें. ३२७.

**मीन**–मासा. ३१३.

**मुका**–न बोलणारा. ३६६.

**मुकुंद**–श्रीकृष्ण. २४२.

**मुक्ताफळ**–मोती. २२, २४३.

**मुक्ति-क्षेत्र**–मोक्ष प्राप्त करून देणारें तीर्थ. ७१४.

**मुखरणी**–श्रेष्ठ, पुढारी. १०५. धपू. ४८.

**मुख(खा)श्रय**–चंदन. ५५२, ६५२.

**मुखवटा**–चेहरा. ३२७.

**मुग्धपणा**–संकोच. ४११,

**मुग्धा**–तारुण्यांत आलेली स्त्री. ५९१, ८१७

**मुग्धावयसा**–मुग्धावस्था; तारुण्य-प्रारंभाची दशा. १३९.

**मुग्धावस्था**–तारुण्य. ११५.

**मुडे**–वरचा भाग कापलेला असा. २०६. (मुंडा); तुटक्या कानाचा

**मुडा**–सांठा, निधान ४६९.

**मुद्री**–मुद्रिका, अंगठी. १७१.

**मुद्रा**–ठसा, मुदी. ५.

**मुघटी**–उघडी. ५६६.

**मुघटी**–उंच, उन्नत. १७३.

**मुनीश्वर**–ऋषीश्रेष्ठ. ८१२.

**मुरणें**–जिरणें. ५४५.

**मुरारी**–श्रीकृष्ण. ६७३.

**मुसणें**-मूर्छित करणें. १००.

**मुसावणें**–मूर्छित होणें. ४६५, ५३२. उ. १७४; ७४९; ज्ञाप्र. ७७१.

**मुसिती**–मूर्छित करतात. १००.

**मुहु (मोह) टा**–ओसरीचें छप्पर.

**मूर्छना**–गायनांतील एक विशिष्ट भाग. १८२.

**मूळ**–आमंत्रण, बोलावणें. ३७७.

**मेखळा**–कमरपट्टा, कडदोरा. ८६५.

**मेघ**–ढग. ४६३.

**मेघ-राग**–गायनांतील एक राग. ५६७.

**मेचु**–प्रीति, आवड. ८१३. ज्ञा. १५-१२५.

**मेढा**–धनुष्य. ७६७.

**मेदिनी**–पृथ्वी. ३७४.

**मेर**–बाजू. ५८८. ज्ञा. ९-५१.

**मेल्हवण**–मेळवण, मीलन. ७३.

**मेहलनी**–रात्र. ४८१, ४८५.

**मेळिकार**–सैन्याचें ठाणें, वस्ति. ८१०. उ. ५२.

**मेहुडें**–मेघपटल. ५२३.

**मेळ**–संबंध. ६८३.

**मेळवणें**–मीलन. २०.

**मेळाव**-समूह. ५९, ३२३, ५९१. अमृ. ७-१४२. उ. २८. ज्ञा. ७-१९९.

**मोकलणें**-मोकळें सोडणें, पाठवणें. ८२७.

**मोचे-घसणी**-पायाला पाय लागत असतांना, दाटीवाटीनें. ७४८.

**मोटकी**-किंचित्, अल्प. १३९. अमृ. ७-१३२. ज्ञा ६.२२३. ह. १०८.

**मोटकेंपण**-सौंदर्य, चांगलेपणा. ३२२.

**मोटें**-थोर, सुंदर. ३७१.

**मोडणें**-(१) विरोध करणें, खोडून काढणें. ६६२. (२) वोसंडणें. ७९०. अमृ. २-१७.

**मोलावणें**-किंमत लागणें. १९४.

**मैत्र**-मैत्री. २८६. ज्ञा. १२-२२६.

**मैंद**-आंतल्या गांठीचा, ठग. ६६२.

**मैळा** वैरी, शत्रु. ५२४.

**मृगमद**-कस्तुरी. ७८२.

**मृगांक**-चंद्र. २८२.

**मृणाळ(ल)**-कमल. ५११, ५४१, ७६२, ७४४.

**म्लेंछ**-अनार्य. २२६.

**म्हणिपति**-म्हटले जातात. १२१.

## य

**यदुपाळ**-श्रीकृष्ण. ६१४.

**य (प) रि**-दुसरा, इतर. २१०.

**यक्षकर्दम**-कुंकुम, अगरु, कस्तुरी, कर्पूर, व चंदन यांची तयार केलेली सुगंधी उटी. ५४०, ५८९. शि. २८८. उ. ४४०.

**यक्षिणी**-यक्ष-पत्नी, देव-सदृश योनि; जखीण. ७९.

**यज्ञोपवीत**-जानवें १७०.

**याग**-यज्ञ. १९४, २०१.

**याति**-जात. ८७५.

**यादव-तिळक**-श्रीकृष्ण. ६१३.

**युवन**-यौवन, तारुण्य. ८८.

**येकवट**-एकत्र, सर्वमिळून, एकदम. ८७१.

**येकें**-एकवटून, सर्व मिळून. ५९०.

**ये (य)दु-राय**-श्रीकृष्ण. ८४९.

**यऱ्हवीं**-नाहीतर. ६६४, ६७२, ६९८.

**येर**-दुसरा, इतर. ११८, ४३१. ज्ञा. १८-८१९.

**योग**-लाभ. ५६७.

**योजन**-चार कोसांचें अंतर. ७३०.

## र

**रंग-बाहाळ**-रंग-प्रचुर. रंगलेलें. ८०८.

**रज**-धूलि, रेणु, पराग. ५५९, ७६६.

**रजनी**-उटी. ५१०. उ. २११.

**रण-विजु**-रणांगणांत विजेप्रमाणे असणारा. २४८.

**रत**–रममाण झालेला. ६७९.

**रति-केसर**–पुष्पविशेष. ८१०.

**रति-सीनली**–(१) मदन पीडित. (२) सुरतोपभोगाने श्रांत झालेली. ८०७. शि. २५७.

**रत्नांकर**–समुद्र. ८६०.

**रमण**–(१) अंगण. (२) आनंद. ६२५.

**रवण**–अवकाश, जागा, पटांगण. ४१५, ८७७. शि. ५३७. उ. १३१. ऋ. ५०६. गो. ९५.

**रवस**–(१) आवेश, उत्कर्ष. ८४८. (२) शब्द, आवाज. ७१८.

**रस-डोळस**–रसज्ञ, मर्मज्ञ. ३६.

**रस-रंग**–नवरसांचा उत्कर्ष. ३१९

**रसरजन**–एक वृक्ष. ८३५.

**रसायन**–तत्त्वांश, सार. ४८. शि. ५८.

**रसिक**–रसाळ, रसयुक्त. ४७, १३८, ६४८. ज्ञा. ६-१४.

**राउळ**–(१) परमेश्वर. ८७६. ज्ञाप्र. ९५२. (२) राजा, स्वामी. ४००, ४०३, ७७४. (३) राजवाडा. ३८२. ज्ञा. ६-३८९.

**राउळ-गण**–राहतें घर, राजवाडा. ४३५.

**राखैं**–रक्षण कर. ६७९.

**राखणें**–(१) जवळ बाळगणें. (२) गुप्त ठेवणें. ६२७, ६३४.

**राग**–गायनांतील गीतपद्धति. १८२, १८४.

**रागांग**–उपराग, गायनांतील रागांचे पोटभाग, रागिण्या. १८४. ज्ञा. ११-१५७.

**राजगुरु**–श्रेष्ठ गुरु. ३८६.

**राजभर**–खंडणी, कर. ३१२, ५७, २२४. भार. २४४.

**राजधर**–राजकुमार. २७२.

**राजवन**–राजाचें उपवन. ७२६.

**राजबिदी**–राजमार्ग. ४७७. ज्ञा. ७-१०६. शि. ९७.

**राजभुवन**–राजवाडा. ३८१.

**राजवल्लभ**–राजाला प्रिय असलेला, राजमान्य. १७२.

**राजसपण**–सुकुमारपणा; सौंदर्य. ७२.

**राज-सुक**–पोपटांचा एक प्रकार. ५३३.

**राणीव**–राज्य. ४, ५३, ६४, २९९, ३०१, ५१६, ७०३, ७०५, ७५६, ७५७, ८६०. अमृ. ७-२६८. उ. ४२. शि. ४६४. ज्ञा. ११-११.

**रातिवा**–धाडी, हल्ला. ५९१. शि. ९४४.

**रातोत्पळ**–लाल रंगाचें कमळ. १६४, ५८०.

**रातोत्पळौनि**-लाल कमळापासून.

**रामश्री**-गायनांतील राग. २५५.

**राय**-राजा. ११६.

**राय-खजुर**-खजुराची एक जात. ७८८.

**राय-जंबीर**-लिंबाची एक जात. ७९९.

**राय-मातुळंगी**-लिंबाच्या झाडाचा एक प्रकार. ७९६.

**रावण**-रंग. उ. २७

**रावणें**-रंगविणें. ८४५. शि. १७.

**रावो**-राजा. ५४, ६३९, ६६१, ६७७, ७७७.

**रास**-पुष्कळ, अमर्याद. १४२.

**रासीं**-राशींत, नशिबांत. ३०५.

**रासी**-राशी समूह. ४९१.

**राहाटणें**-फिरणें, भटकणें. १५५.

**राहाण**-ज्याच्या अंगांत देव येतो तो भगत. ७३५, ७३६, ७५२, ८१३. शि. ८१३. उ. ३५. ऋ. ४०४.

**राहो**-एक ग्रह, राहू. ६०२, ६७९, ७१३.

**रिखी**-(१) ऋषी. (२) दोन तीन रिकीबीचे घोडे. २१५.

**रिगणें**-प्रवेश करणें. १०९, ६५३, उ. ५२६.

**रिघणें**-प्रवेश करणें. ३१, ३३४, ४६८, ६१५, ८५२, ८६३.

**रितुप**-एक वृक्ष. ७९९.

**रितुराज**-वसंत. ४०.

**रितु-राय (व)**-ऋतूंचा राजा वसंत. ७५२, ७५६, ७७०, ७७४, ७३३.

**रिधी**-समृद्धी, एक शक्ति. ८३८.

**रूख**-वृक्ष. ७८४, ७९१. ज्ञा. १८-१४३१. अमृ. ७-६१. शि. २८९. ऋ. ७१.

**रुचिकर**-स्वादिष्ट. ७५९.

**रुद्र**-शंकराचा अंशावतार, शंकर. १४०, २२१, ८३२.

**रुद्रादोषें**-शंकरामुळे. ७८०.

**रूपक**-एका तालाचें नांव, गायन. १८५, ६५९, ७५१, ७८९. शि. ६९८. उ. ४६७. वत्स. ३१३.

**रूप**-सौंदर्य. ६४०.

**रूप-करणें**-यथार्थतेने वर्णन करणें, सांगणें, योग्य निदान करणें. १८०, १८४, ३१९, ६८५. गो. १०७. ज्ञा. १२-१५७; ऋ ३६०.

**रूप दावणें**-स्वरूप प्रगट करणें. २५०.

**रूपडें**-स्वरूप, सौंदर्य. ४, ९९.

**रूपस**-रूपसंपन्न, सुंदर. १७६, १९३, १९६. ज्ञा. ६-३९७.

**रुळणें**-मिरवणें, सुशोभितपणें मंदमंद हलणें. ९८, ७४२.

**रेखा**-ओळ, रेघ. ८३२. ज्ञा. ६-१८.

**रेवणें**-(१) दबणें, दडपला जाणें, दडपणें. ६९४. ज्ञा. ७-७८. (२) बुडणें. २४१.

**रेवांतक**-सूर्याच्या घोड्याचें नांव. ६९४.

**रोकडें**-नक्की, खात्रीने, तावडतोब. २००, २१८.

**रोमावळी**-वक्षस्थळापासून बेंबी-पर्यंतची केसांची ओळ. ९८.

**ऱ्हात**-राहात. ७००.

## ल

**लग्न**-विवाह. ६७८.

**लळवडि**-लाडका, पुत्र. ८५३.

**लक्ष्मी**-शोभा, सौंदर्य. ३२६.

**लक्ष्मी-विलास**-श्रीकृष्ण. ८७८.

**लाख**-एक लक्ष, संख्या. ५०४.

**लाखारव**-लक्षावधि राया. ७०३.

**लाखे [खो]वा**-दिवा. ७७६, ४८२.

**लाग**-संबंध, प्रहार, आघात ३०९, ४४७, ४५१, ६५६. ज्ञा. १२-२०६.

**लागौनि**-पासून. ६७७.

**लाघवी**-बाजगर, कुशल, चमत्कार-करणारा मांत्रिक. ५१५, ५९९.

**लाचावणें**-लाच देऊन वश करणें. १०१.

**लाजा**-लज्जेने ३२७, ८६२.

**लांडेपण**-पंख गळून होणारी अवस्था. ६०९.

**लांवणें**-वर बांधणें, टांगणें. ४६०.

**लांबी**-ओळ. ८२९.

**लावणी**-झाडांचीं रोपें लावण्याची क्रिया, पेरणी. ७७९. ज्ञा. १२-११९.

**लावण्य-उदार**-सौंदर्याने थोर. २९२.

**लासणें**-डागणें, डागलें जाणें. ४५२.

**लाहाणें**-इच्छिणें, मिळणें. २१३, ३१. ज्ञाप्र. ९४३.

**लिपी**-कर्मरेषा. २८५.

**ली**-लिपी, लिखित. ३२४.

**लीला-कमळ**-विलासासाठीं हातांत घेतलेलें कमळ. ७४०. ज्ञा. १२-२२३.

**लीला-लाघव**-क्रीडा-कौशल्य. ३०९.

**लुगडें**-वस्त्र. ८३, १४९, ३५२, ६९०. अमृ. ९-४६. ज्ञा. ११-३.

**लूसि**-बचका, चिमटा. ६००.

**लेकरूवें**-पुत्रत्वाने. ६१.

**लेकार**-धारण करणारें. ७४८.

**लेख**-मोजमाप, सीमा. २५१, २७९, अमृ. ७-१४. ज्ञाप्र. ४७. ज्ञा. १०-३००.

**लेखणी**-टाक. ६७५.

**लेणें**-(१) अंगावर धारण करणें. ४५४. (२) अलंकार, दागिना. ९४, ९५, ४९३, ६९०, ६९२, ७५८, ७६२. ज्ञा. १०-४२. (३) पर्वतांतील दगडांत खोदून तयार केलेलीं मूर्ति, चित्रें इत्यादि कामें. ४३४.

**लेप**-चित्र. ८६, १४०. ज्ञा. १३-५३३ अमृ. ६-१०१.

**लेपिव**-लिंपिलेलीं, लिंपून तयार केलेलीं. ७८, ३३३.

**लोकपाळ**-अष्टदिशांचे पालन करणारे आठ देव. २२८, ७२८, ८७०, ८७१.

**लोटणें**-दूर सारणें. ५६.

**लोणार**-एका गांवाचें नांव. ४६४.

**लोंबवणें**-लांब करणें, पाडणें. ५०५.

**लोंबी**-लांब मजिऱ्या. २२.

**लोह**-लोखंड. २६५.

**ल्हा(लाहा)णें**-मिळणें. २९९.

## व

**वक्त्र**-तोंड. ५०८.

**वंक-द्वार**-पाहऱ्याचा दरवाजा, देवडी-जवळील दार. ६९२.

**वज्र-पंजर**-(१) वज्राप्रमाणे कठीण, अतएव सुरक्षित असा पिंजरा. ६७६. (२) पिंजरी, छत, पालखी-वरील आच्छादन. ४५८.

**वज्रलेप**-खिळवून टाकणारा लेप. १४१.

**वज्रांगी**-वज्राप्रमाणे कठिण कवच, चिलखत. ५७५. शि. १०६५. उ. १८७. ज्ञाप्र. ७८१. ज्ञा. ६-४७५.

**वडप**-वृष्टी. २४१. शि. ३१९. उ. २८०. वच्छ. १३७. ज्ञाप्र. १०१७. ज्ञा. ६-४९०.

**वडवानळ**-समुद्रांतील अग्नि. ४१, ५२५, ४६२.

**वण( न )वणें**-पोळणें, आह्याळणें. २४५, ४६३, ५२७, ६२३.

**वणवा**-आग, वनाला लागलेली आग. ५८८.

**वदन**-तोंड. ९६.

**वन-दिवी**-एक वेल. ७४२.

**वन-माळी**-श्रीकृष्ण. ७८७.

**वना**-औषध, उपाय. ६६६.

**वनिज**-व्यापार, व्यापाराचे जिन्नस. ८६९.

**वनिता**-स्त्री. ८०८.

**वमणें**-ओकणें. २०५.

**वमन**-ओकारी. २००.

**वयसा**-दशा. १३९; ३३०. ज्ञा. १-४२ ज्ञाप्र ८५.

**वर**-नोवरा. २२५.

**वरदळ**-बेगड, मुलामा. ५२०. उ. ५४७. ज्ञाप्र. ५८३.

**वरणें**-स्वीकारणें. ६४१.

**वरपंक**-मुलामा, वरवरचा देखावा. ५२०.

**वरि-करनी**-पति मिळवून देणारा. ७३४.

**वरिखा**-वर्षाव, वृष्टि. ५०४.

**वरिचील**-वरवरचा, क्षुल्लक. ५२०.

**वरिलियें**-वरिलीं आई. ६४०.

**वरिव**-श्रेष्ठपणा. ३३३.

**वरिवंट**-वर. ५६६. अधिक चांगला, सुंदर. ७३१.

**वरौ(रु)तें**-वर, वरच्या भागीं. ८२४.

**वर्त**-भोंवरा. ५१२.

**वर्तेचीं**-भोंवऱ्याप्रमाणे फिरत असलेली दिसणारीं.

**वर्म**-अंतरंग, उणेपणा, न्यून. ८४७.

**वर्त(वि)णें**-ग्रहांचें गणित करून भविष्य सांगणें. ६१४, ६१७, ६२०.

**वर्धमान**-वाढणारा, श्रेष्ठ. १८३.

**वल्लभ**-आवडता, प्रिय, सखा. ६०९, ८२६.

**वंशिकर**-हातांत बासरी धरणारा. १७८.

**वंस(श)**-कुळ. ३०५.

**वसंत**-एका रागाचें नांव. ७६३.

**वसुवार**-आश्रयस्थान, वस्तीचें ठिकाण. ४३६, ४४३.

**वसैठा**-वस्तीचें ठिकाण. २११. शि. ४६. ज्ञा. (रा). १-२२८.

**वस्यकरण**-वशीकरण, आकृष्ट करणें. ८९.

**वहिला**-लौकर, तात्काळ. ३८३. ज्ञा. ५-३२, ऋ. १९६.

**वही**-कागदांचें चोपडें. ७३४.

**वळघणें**-वर चढणें. ३८२, ७१५. उ. १६४, ऋ. १७४. ज्ञा. १२-७२.

**वळण**-ओघ. ११३.

**वळसा**-वर्तुळाकार पाश, खळाळ, भोंवरा. ८२, ३२८, ७१८, ८२४. ज्ञा. ७-७७

**वाकडें**-पावसाची झड. ५२३. ज्ञा. १३-५६४.

**वाखाणणें**-वर्णन करणें, स्तुति करणें. ३३३, ५१८, ६७७.

**वाखोरा**-उत्तरीय वस्त्र. ८४२.

**वागुर**-जाळें. ५९७. उ. ४०. शि. १८८. ज्ञाप्र. १३३. ज्ञा. ७-९५.

**वांचौनि**-विना, शिवाय. ६३३, ६४६, ६४८, ६७७.

**वाजिए**-घोडेस्वार. ३९२.

**वाट-सारू**-वाटेने पायीं चालणारे. ७०५.

**वाटावो**-उणीव. ३८७. ज्ञा. (बं) १३.७५२.

**वाटोगर**-बटमोगरा. ७, ८१५.

**वाडी**-प्रदेश, उद्यान, बाग. ४७३, ७१६, ८५४. उ. ६२२.

**वाण**-दान, भेट, नजराणा. ७८४.

**वाणि**-प्रकार, वर्ण, रंग. ४२६, ८५०.

**वाणी**-किराणा माल विकणारा. ७०४.

**वाणें**-वाहणें. १६७, ३८६, ३८७, ६१२, ६९९, ७१२, ७५०, ७५१. गो. ३५.

**वाणे ( न ) लग**-अनेक वर्णांचा. १६५, ७६०, ७७५. उ. २०२, ऋ. ४२३.

**वाति**-(१) वाहतात, अर्पण करतात. ३०५. (२) वाजवितात. ८४.

**वाद**-भांडण, अभिमान, स्पर्धा. ९७, ८०९.

**वानणें**-वर्णन करणें, स्तुति करणें. ५५, १३६, २९८, ३३१, ३४३, ७७८.

**वानि**-निरनिराळे वर्ण, रंग. ५६२, ५८२.

**वाफा**-रोपें लावण्याची जमीन. ७२४, ७८३.

**वाय**-अर्पण करिते. २७१.

**वायां**-व्यर्थ, उगीच. ३६९.

**वायगाठ**-आंतील पदराला घातलेली गाठ. ८४२.

**वायांविणें**-व्यर्थ; उगीच. ३६८. शि. १९१, ६८५. उ. ६२६. ज्ञाप्र. ५६८.

**वारणें**-(१) निषेध करणें, निवारण करणें, त्यागणें. ५२०, ६०६. (२) निरोप देणें. ३५०.

**वार-सुळ**-घात-वार. ६४३.

**वाराह**-डुकर. ३१५.

**वारू**-घोडा. ३८५, ६९१, ६९२, ६९९, ७१५, ८५३.

**वारुणी**-दारू. ५०८, ७८३.

**वारिक**-वाहन, तट्टू, शिंगरू. ३८५. शि. ४४७. ज्ञा. ६-२७०। ११-५३८. धपू. ५२.

**वारीख**-वर्षाव, पर्जन्य. ७७८.

**वालभ**-आवड, प्रीति. ४४.

**वालभणें**-प्रिय होणें-असणें. २८. ऋ १५६.

**वालिप**-तलम, रेशमी वस्त्र. ५१६, ७५६, ७६२. शि. १७५, ७१८. ज्ञा. ६-२५.

**वालुसरा**-वाळूचे बारीक कण. ५०२.

**वावो**-व्यर्थ. ५१९. उ. ५८, ८१. गो. ११४. ज्ञा. ६-८८.

**वास**-(१) दिशा. ४०४.

(२) वस्ती. ४५८. उ. ३७९.

**वास पाहणें**–एखाद्याकडे पाहणें. ११५, १६८. धपू. ४५-४. द. ७१. ऋ. ३७४. ज्ञा. ६–३७१.

**वाहार**–हल्ला, युद्धाची चढावणी. ८५८. शि. २४०. उ. ४६८. ज्ञा. ११-४५४.

**वाहातवणें**–वाहतें पाणी, प्रवाह. ८४९.

**वाहाति**–वाहणारे, करणारे. ८३९.

**वाळणें**–टाळणें, त्याग करणें. निषेध-निंदा करणें. ३७९. उ. ५४३. ज्ञाप्र. ५९०. ज्ञा. १८ ८०५.

**वाहो-जंतर**–वाजवायचें यंत्र वाद्य. १७७.

**विकळ**–बलहीन, असमर्थ. ३८९, ४४८, ६५५.

**विकळता**–दुर्बलता. ५३५.

**विख**–विष. २०५.

**विखार**–विषार, विषयुक्त. २०४.

**विखो**–विषय, कामोपभोग. २०६, अमृ. ८-६. द. ७८.

**विघडणें**–वियोग होणें, दूर होणें. ५१४, ५९५. ज्ञा. १८-७८५.

**विचरणें**–फिरणें,भ्रमण करणें.४७३.

**विचारणें**–मनाशीं विचार करणें. २०८, ६४५.

**विजणें**–पंखा, पंख्याने घातलेला वारा. ५५२, ५५३.

**विजू**–वीज. ४३८, ४८५. ज्ञा.७-५८.

**विज्वर**–तापरहित. ५४५.

**विटाळ**–डाग, मलिन स्पर्श. ६४०.

**विडा**–तांबूल, पान. ६८६, ६८७. ज्ञा. १८-४६.

**वितर्कणें**–तर्क करणें, शंका काढणें. ५८१. शि. ४०.

**वितुटणें**–वियुक्त होणें. ४६३.

**विथानकणें**–थरथर कापणें, भूत-बाधा होणें. ५३१.

**विथानकैला**–भूत–संचार झालेला ३६७.

**विदावंत**–गायक, स्तुतिपाठक. १६८, २१४, ३३९, ३९३, ५६७.

**विद्याधर**–देव-सदृश योनि. २११.

**विद्याधरा-री**–विद्याधराची स्त्री. ८०, १४५, ५५१.

**विंदाणि**–चित्रकार, कलावंत.२५२. धउ. ३१४. ज्ञा. १८-४४.

**विद्वांस**–विद्वान. ६४७.

**विनटणें**–रंगून जाणें, तल्लीन होणें. ३५.

**विन**–वांचून. ६६५, ७५१.

**विनी**–वीण, निर्मिती. ७९.

**विनावितायें**–मी विनंति करतें. ६८३.

**विप्र**-विद्वान ब्राह्मण. ६५६.
**विपायें**-किंचित, थोडी, कदाचित. ४०९. अमृ. १-१४.ज्ञा.२-२०५ शि. ७५२. उ. ५१९, ८३८.
**विफळ**-निष्फळ, निरर्थक. ६४०.
**विभांडणें**-फोडणें. २४९.
**वियोगिनी**-विरहिणी. ३९९.
**विरहागी**-वियोगाची आग. ५५०.
**विरहे**-विरहयुक्त, विरही. २५३.
**विरूढणें**-अंकुरणें, फुलणें, निर्माण होणें. २२९, ४९३, ५३७.
**विलोळ**-कल्लोळ, भर. २८४.
**विलहळ**-विरळ, झिरझिरीत. ४०७.
**विवसी**-तिरस्कार, कंटाळा. ३७२. शि. १३२.
**विश्वासिया**-विश्वासू. ६४८.
**विषय**-कामोपभोग. ५९२, ७७३.
**विसड**-घाण झालेले,सडलेले.२००.
**विसं(सां)वणें**-विश्रांति घेणें,शयन करणें. २२२, ४१९, ४६२, ८०७.
**विसंवती**-विश्रांति देणारी.
**विसर्जणें**-सोडणें, संपविणें. ४७८.
**विस्मो**-आश्चर्य. १४६, ३६१, ७०८. ज्ञा. १०-२०७.
**विहिंग**-पक्षी. ४६८.
**विहंगम**-पक्षी. १६८.
**विळास**-क्रीडा. ७२६.
**विज्ञान-बळ**-सामर्थ्य.११७,११९.
**वीजणें**-वारा घालणें. ३९०,५७१, ५७६. ७४४.
**वीणि**-निर्मिती. (विणें-पासून) ४८६. क्र. १४१.
**वीतराग**-विरक्त, ऋषी. ७३७. उ. ४१६.
**वीवसी**-राक्षसी, शिसारी. १९७. उ. २२९.
**वेगां**-त्वरेने, घाईने. ७५३.
**वेच**-व्यय, खर्च. ६५३.
**वेंझ**-(१) झेप. २२३. (२) छिद्र. ४३१.
**वेणी**-गुंफण. १७९.
**वेध**-आकर्षण, गोडी, छंद. ३२८, ३३१, ५७५, ६३२, ६६१, ६६९, ७६६.
**वेधणें**-आकर्षण करणें. ४२,१५५.
**वेध-चाफा**-चाफ्याचा एक प्रकार. ८०७.
**वेधवंती**-आकर्षण शक्ति. ६८, ६३६. ज्ञाप्र. ४६२.
**वेलाउळ**-द्वीप, बंदर. २७४. ७२५, ८५६. उ. ६६१. शि, ३०३. क्र. २०३.
**वेल्हाळपण**-गोडी, माधुर्य. ३२५.
**वेऱ्हाणें**-विवाह करणें. ८७७.
**वेऱ्हारा**-व्यापारी. २६६, ७०४. द. ५३. गो. ७३. ऋ. ६५.

**वेळू**-बांबू. ५२८.
**वैकुंठ**-विष्णूचें वसतिस्थान. ८००.
**वैकुंठ-राज**-विष्णु. ८३०.
**वैकुंठ-रावो**-विष्णु. ८३३.
**वैद्**-वैद्य. ५६४.
**वैद्य-नाथ**-वैद्यांचा स्वामी. ६८०.
**वैराग्य**-विरक्ति. ७३८.
**वैष्णवी**-किन्नर. २९०.
**वैसाखी**-वैशाख महिन्यांतील पौर्णिमा. ६७८.
**वैस्यकरण**-वशीकरण. १७८.
**वैस्वानर**-अग्नि. ५४५, ५८४.
**वैहाळी**-क्रीडा, विहार. ८५३.
**वोखद्**-औषध. ५३७, ६६६, ८०६.
**वोडव**-गायनाचा एक भेद. १८२.
**वोडवणें**-येणें, निर्माण होणें, प्राप्त-होणें. ४२, ४२८, ५९३, ८७३. ज्ञा. २-३१.
**वोढा**-ओढाताण. ६२६.
**वोतवर**-उचंबळलेलें, उन्मत्त. १४४
**वोता**-चढता, अधिकाधिक, भर, उत्कर्ष. २४, ८०३.
**वोतिव**-ओतून तयार केलेला. ४३५.
**वोतिजताय**-पाघळून उतूं जात होतें ४४२, ५३५.
**वोद**-प्रवाह, ऊत. ५३८.
**वोदरणें**-दरदरून घाम येणें. ५६१.
**वोथणें**-पाघळणें. २९६.
**वोप**-तेज, उज्ज्वलता. ७, १९१, ४९४, ६५३, ८२१, ८६६.
**वोपणें**-दान-द्रव्य देणें. ८, १११, २२४, ४६७, ७७१.
**वोपणें**-अर्पण करणें. ६९०.
**वोपणी**-ऐश्वर्य, खंडणी. ४८५.
**वोल**-ओलीस ठेवलेला. ६०८.
**वोलि-सेला**-अतिशय मृदु व नाजुक वस्त्र. ७६०. शि. ६९३.
**वोल्हावणें**-ओलें होणें-करणें, शांत होणें. ४४४, ५०५, ५७१.
**वोवरा**-मखर, कुंज, खोली. ४२६.
**वोवरी**-खोली. ४६३, ५७८.
**वोसाइ(ली)**-क्षीण झालेली. ३०७. ३८०, ५३२.
**वोसरणें**-पाणी कमी होणें, मागे सरणें. ३१२.
**वोसारणें**-दूर करणें. १०८.
**वोसावणें**-ओहटणें, क्षीण होणें. ४५१, ६५१, ६५७.
**वोहर**-एक प्रकारचा मासा. ७१९.
**वोहरी**-निद्रा. ४०६
**वोळग**-(१) सेवा. ७२५. उ. १४०. गो. २५३. (२) सेवक.
**वोळगणें**-सेवा करणें. २१४, २३३, ३२७, ७३३, ७८७. अमृ. ९-२९. ज्ञा. ११-७२. उ. १५८. ह. ७२.
**वोळगिणी**-सेविका, दासी. १०८.

**वोळणें**—एका बाजूला जाणें, वळणें. ६२०. गो. २१४.

**वोळिलगें**—एका ओळीने. ७७४.

**व्यक्त**—स्पष्ट, उघड.

**व्याधि**—शारीरिक रोग. ४००.

## श

**शड्डुज-स्वर**—सप्त स्वरांतील षड्ज स्वर. ६१२.

**शब्द-वेधिया**—केवळ शब्दांनी इतरांना आकर्षून घेणारा. ४२. ६३७. ज्ञाप्र. ५१९.

**शरणागत**—शरण आलेला. ६७६, ६८३.

**शार्दूल**—वाघ. २६१.

**शुक्तिका**—शिंपली. ५०६.

**शृंघार**—शोभा, वेषभूषा. ५३, ४८०. (२) मदन. २७०, ४६८, ७३४, ७५९.

**शृंघारी**—विलासी, उपभोग—कुशल. २३१, ४७७.

**शृंघारिणी**—शृंगार—रचना करून देणारी सेविका. १०४.

**श्रुतावस्था**—ऐकलेल्या स्थितीप्रमाणे. ३७८, ४५३.

**श्रुति**—(१)स्वर, आवाज. ३४५, ५३२, ७६३. (२) श्रवण, ऐकणें. ५३०.

**श्रुति-धर**—सूर धरणारे. १७८.

**श्रुतिसंचार**—स्वरांचा आलाप. ८१३.

**श्री**—लक्ष्मी. ६६४.

**श्रीकरण**—कुळकर्णी, लेखक, प्रधान. ७३४.

**श्रीखंड**—चंदन. ४२१, ५७६.

**श्रीगिरि**—छत्र. १०२.

**श्रोता**—ऐकणारा. ७२९.

**श्वेतद्वीप**—सप्तद्वीपांपैकी एक. ७८६.

## ष

**षड्पद**—भुंगा. ८३२.

**षड्विधा**—सहा प्रकारच्या. ८६९.

**षडांग**—सहा अवयव. (गायनाचे. १ ताल, २ प्रबंध, ३ वोडव, ४ ग्रामजाती, ५ मूर्छना, ६ राग).

**षोडशोपचार**—पूजेचे सोळा उपचार. ४७८.

## स

**स-कर्पुर**—कापरासहित. ३९२, ४५५.

**संकीर्ण**—सर्व, पसरलेले. १८३.

**सकुण**—शकुन, शुभाशुभाची सूचना ६००, ६१४, ६२२, ७९२.

**सकुमार**—कोवळी, नाजुक. ४६२.

**संकोचणें**—मिटणें, म्लान होणें. ४७६.

**संख**—शंख. ७४७.

**सगर**—पायवाट. ९७. ऋ. २८.

**सगुण**–त्रिगुणांनी युक्त, शरीर धारण करणारी. ६३८.
**संग्राम**–युद्ध. ७३७.
**संचरणें**-संचार करणें, प्रवेश करविणें, घालणें. २०८.
**संचार**–भूतबाधा. ४००.
**संजीवनी**–जिवंत करणारी. ४९९.
**सडकणें**–मारणें, आपटणें. ७४५.
**संडणें**–सांडणें, सोडणें. ५२५.
**सडिवा**-एकटेपणाचा—अविवाहितपणाचा दोष, डाग. ३७२.
**सत्यलोक**–ब्रह्मदेवाचें विश्व. ७३१.
**सत्त्व**–अर्क, रस. ५३९, ५४३.
**सदमुख**–पवित्र तोंड. ५२२.
**सदाफळ**–ज्यास नेहमी फळें येतात असा वृक्ष. ७७४, ७८९, ७९१. ज्ञाप्र. २३.
**सदीप**–प्रकाशमान. ८६५.
**सदैव**–भाग्यशाली. ४८२, ६९८. ज्ञाप्र. ५१५, ७७६. ज्ञा. ६–१३८.
**संधान**–सांधा. जोड. ५५६.
**संधाता**–तडजोड करणारा, जुळविणारा. ६४८.
**संधि-विग्रही**–तडजोड करणारा, वकील. २७९.
**सनाहो**–नाथ, स्वामी. २७५.
**सन्निधान**–जवळ असणें, प्रत्यक्ष सहवास. ६६५. उ. ४९.
**सन्मुख**–समोर. २९०.
**सपल्लव**–पानांनी. ५५२.
**सप्पन्न**–छप्पन. ३०२.
**स-पक्ष**–पंखासहित. १६४, २१५.
**सपोत**–बारीक, तलम. ३४८. ऋ. ४२८.
**सप्तांगें**–दुर्ग, राष्ट्र, चतुर्विध (हत्ति, रथ, घोडे व पायदळ) सैन्य आणि अमात्यगण हीं राज्याचीं सात अंगें. २८४, ३१८.
**सपिवळ**–किंचित पिंवळें, पिवळसर. ९३.
**संप्रधार**-विचार, बेत, निश्चय. ३६०, ३७५.
**संपुट**–दोन खोलगट भाग जोडून तयार झालेला. ५५५.
**सपुर**–पातळ, मृदु, बारीक. ४३१, ४५५, ५५८, ५८२, ८४१. ऋ. ४९२. ज्ञा. १–६.
**सप्त-स्वर**–षड्ज (सा), ऋषभ (री), गांधार (ग), मध्यम (म), पंचम (प), धैवत (ध), आणि निषाद (नी), हे गायनांतील सात स्वर.
**संभ्रम**–(१) आदर, पूज्य बुद्धि. ६५५. (२) आवेश, आग्रह. ८४७
**सभाव**–विकारयुक्त. ४२२.
**सभावीं**–सहजच. १४१. उ. ८०.

**समट**-सर्व. १६५.
**समरंगण**-युद्धभूमि. ६६३.
**समरसणें**-तद्रूप होणें. ८२४.
**स-मळ**-मलिन. ६८३.
**समुग्ध**-(१) मुग्धावस्थेंतील, सुंदर. (२) मुग्धपणें, अस्पष्ट, हळूहळू. ५८६.
**सयन**-शयन, बिछाना. ५५३.
**सर**-(१) दोरी. ७६७. (२) शर, बाण. ७६८. (३) तुलना, बरोबरी. ८६६.
**सरता**-मान्य. १५७.
**सरतें**-सर्वमान्य, चालणारें. ३८.
**सर्वथा**-सर्व प्रकारें, पूर्णपणें. ६०५.
**सर्ग**-(१) समुद्र, समूह. २. (२) स्वर्ग. २१८.
**सर्व (र व) दा**-सरवदा, सरोदा, भविष्यवादी, ज्योतिषी. ६१६, ७३७. उ. २४०.
**सर्व-भावीं**-सर्व प्रकारांनी, पूर्णपणें. ६३९.
**सर्वज्ञ**-सर्व जाणणारा. ६८४.
**सर्वेस्वर**-सर्वांचा स्वामी, परमात्मा. ६७०.
**सराव (उ)**-अभ्यास, शिक्षण. २३, २२५, ४९५, ८४७. उ. ५३२. शि. ३४१. ह. ५८.
**सराग**-(१) प्रेमानें, आवडीनें. ७४२. (२) आरक्त वर्णाचा, रंगीत. ४६८.
**सरि**-बरोबरी, पाड. १६, ५४.
**सरिसा**-सारखा, समान, बरोबर. १९६, ३३४, ६९४. उ. ६८०. शि. ७७६.
**सरिसीं**-साम्य, बरोबरी, तुलना. १९, ३४, १११.
**सरूप**-सुंदर. १९१.
**सरूपता**-सारखेपणा, तादात्म्य. चार मुक्तीपैकी एक मुक्ति. ८४८.
**सल**-ठाणें, पहारा. ४८३.
**सलगी**-विशेष परिचय. १०, ६४६. ज्ञा. ११-३२.
**सलोली**-डोलणाऱ्या. ४२३.
**सवंगडा**-मित्र, सौंगडी. १७४, २२८.
**सवाय ( वो )**-सव्वा, एक अधिक एक-चतुर्थांश. २१०.
**सविकार**-(१) कुशल, कौशल्ययुक्त. ३९२, ४२१. (२) विकार उत्पन्न करणारा, सुंदर. ९५, ७४१.
**सविजड**-दालचिनीसारख्या आहुति-द्रव्यांनी युक्त. २००.
**सवें**-संगें, सह, बरोबर. ३४०, ७४४.
**सवैल**-सांगाती, सोबती. ६९७, ७०१, ७२०. ज्ञाप्र. २४२.
**सव्याख्यान**-व्याख्यानासहित, टीकेसहित. ४०.
**संसार**-जग. ५०९.

**सहस्त्र**–हजार. ७२९.
**सहस्त्रकर**–हजार किरणांचा, सूर्य. ४८३.
**सहस्त्र-दळ**–हजार पाकळ्यांचें, कमळ. ८१२.
**सहास**–सहस्र, हजार. २१०.
**सळ**–त्वेष, अभिमान, ईर्ष्या. ११८, २६२. उ. ४७४, ११७. ऋ. २२०. ज्ञाप्र. ३२७.
**सळणें**–भिणें, छळणें. ३०६. ज्ञा. ६-४१४.
**सा**–सहा. ४६, ७०६.
**साउमा (मी-में)**–समोर. १३१, १३४, ४५५. ह. १०२.
**साउमील**–पुढील, समोरचें. २३५, ३१७.
**साउलें**–लुगडें. ८४२. मुक्ते, सभा. १५-२२५.
**सांकडें**–संकट. ३५५, ६४६, ६६७. उ. ३५०. ज्ञाप्र. ५२५. ज्ञा. ६-३२.
**सांकिक**–साक्षी, पहारेकरी. ४८३.
**सांकुवें**–अंडें. ४९६.
**सांख-दीप**–सप्तद्वीपांपैकी एक 'शाक' द्वीप. ७८६.
**साखा**–शाखा, डहाळी. ६५२; ७८४.
**सांगडा**–सारखा. १९८, ८७०; अमृ. ७-२८८. ज्ञा. १२-३१.
**सागर**–समुद्र. ७२१.
**सागळ**–पाण्याचें भांडें. ६९५. ह. १०५; १०६.
**सागळी**–पाणी देणारा सेवक. ६९५.
**सागौर**–एक पक्षी. ४७२.
**सांघणी**–घालणें, हल्ला. २७१. शि. ३५.
**साचपण**–खरेपणा. ३८७.
**साचा (चें)**–खरें, खरोखर. ६९, ४२८.
**साचोकार**–खरोखरीचे. १४०. उ. ३६१. ज्ञा. १२-१९६. ज्ञाप्र. ५६२.
**साजणी**–सखी, मैत्रीण. ४१३.
**सांजवेळ**–संध्याकाळ. ४८५. ज्ञा. ९-७२.
**साजिरा**–चांगला, सुंदर. ७९८. ज्ञा. १८-८३९.
**साजिव**–सजीव, जिवंत. ७८, १६३, २०३, २५६, ४२२, ६२३.
**सांटवतें**–सांठून राहिलेलें. ४६७.
**साटोप**–विशाळ दरप, गर्वोद्धत. ७७०, ८६९. ज्ञा. ६-४६.
**सांडणें**–सोडून देणें. १९६.
**साडे-पन्हरें**–सोनें. ७९१. ज्ञाप्र. ४९५. ऋ. ५८७.
**साडंबर**–शृंगारलेला. १.
**सात**–हाट, बाजार. ८१७.

**सात्त्विक**-सत्त्वगुणांमुळे निर्माण झालेलें- स्तंभ, स्वेद, रोमांच, स्वरभंग, वेपथु, वैवर्ण्य अश्रु, व प्रलय हे आठ सात्त्विक भाव आहेत. ३४३.

**साति**-छत्र. २९४, ३८५.

**साति-धरी**-छत्र धारण करणारी ७४४.

**साद्**-शब्द, आवाज. १५९, १८०, ५८१, ५९४, ८०२.

**सादुकणें**-प्रदीप्त होणें. ५७६.

**सांदणें**-सांधणें, जोडणें. ३५८.

**साधारण**-सामान्य. ९२.

**साप**-सर्प. ६०१.

**सांपें**-प्रस्तुत, आता. १६२, २५२, ३३६, ३३९, ३७०, ६७८. शि. ११६. ऋ. २८.

**साबडें**-साधें, कमी प्रतीचें. ३२४. भोळाभाबडा. ११७. उ. ११. शि. १४१. ज्ञाप्र. ३२.

**साबरें**-कुंज, पटगृह, क्रीडागृह. १२, २६, ४१५, ४३७. शि. ६३५, ६५०. उ. १७४.

**सामथा**-छिद्र पाडण्याचें तीक्ष्ण हत्यार. ५२८, ६८१. उ २०.

**सायार**-मांच, मांडव. ४३२. शि. ७१५, ७९५.

**सायास**-प्रयत्न, कष्ट. ६४५, ८२४.

**सायोज्यता**-तादात्म्य, चतुर्विध मुक्तींपैकी सर्वश्रेष्ठ मुक्ति. ८०७. उ. ८२७.

**सारणें**-संपविणें, उरकवणें. ४७८.

**सारस**-चक्रवाक पक्षी. ४७०, ५१३. ज्ञा. १८.७८५.

**सारसी**-(१) सारस पक्ष्याची मादी. ४७०. (२) चीत्कार. २२२.

**सारस्वत-मंत्र**-उत्तम वाङ्मय निर्माण करण्याचा मंत्र, वक्तृत्वाची स्फूर्ति. १५७.

**सारा**-सर्व. १९५.

**सारिखा**-सारखा, तोडीचा. ९१.

**सावगणी**-मूर्त, शरीरधारी. ७६३.

**सावधा**-(१) मर्यादित, परिमित. (२) साजुक. ७८२.

**सावधारा**-सावत्र. ८१.

**सावरणें**-तोल सांभाळणें. ६५५.

**सांवळा (ळी)**-काळसर रंगाचा-ची. ३२६, ७२३, ७४०.

**सावाय**-(१) सायाळ, साळ. Porcupine. ७४८. (२) साहित्य. १२.

**सावासि**-जवळ असलेला, सहवासी ३९२.

**सा ( सो ) वासिनी**-सुवासिनी; जवळची मैत्रीण. १०३. शि. १९०.

**साविं ( वे ) या**-सहज, निसर्गतः ३३७, ४६६. अमृ. ६-७५. ज्ञा. ६-१३४.

**सावेव (उ)**-सावयव, अवयवांसहित; मूर्त. ८९, १०१. ज्ञा. ६-२५५.

**सासीनणें**-बहरणें, प्रफुल्लित होणें. ७७४. शि. ३२. ऋ. ७१. ज्ञा. ११-११.

**साहणें**-सहन करणें. १८७.

**सासुरें**-सासऱ्याचें घर, २०३.

**साहान**-सैन्य. ७३६, ८७६. ज्ञा. १०-३०९.

**साहानि**-सैन्याचा नेता, सेनापति. ७३४.

**साहाणुक**-शांति समाधान. १४.

**साहित्य**-उत्तम वाङ्मय. ४३.

**साळा**-शाळा. २५७, ८६५, उ. ६०१.

**साळांग (क)**-मृत्युलोकांतील गायन. १८४, १८५, १८६.

**साळी**-भात, शालि. ७४९, ८५०.

**साळें**-एक पक्षी. ५९५, ६०९.

**साळैया**-पक्षिणी. साळुंक्या. ८२६.

**साक्षेप**-आग्रह. २४९.

**सिकार**-(१) सुरतोपभोग, विषयसुख. ७९४. (२) श्रुतिधर, सूर धरणारे सेवक. १७४.

**सिग**-शीग, सीमा. ३१०.

**सिंगण**-कमान, धनुष्य. ६६३.

**सिंगळ**-एक नांव, सिंहल (द्वीप, २७४.

**सित**-शीत, भाताचा लहानसा कण. १९९.

**सितरणें**-धिक्कारणें, जिंकणें. १५९.

**सिंथ (त) णें**-शिंपडणें. ४८३.

**सिंदु(धु)वार**-एक फूल, फुलझाड. ८११.

**सिद्ध**-अतिमानुष शक्ति असलेला पुरुष. ५९३.

**सिद्धरस**-पारा, अमृत (?) ८६, ४२८, ४९८, ५१०. ज्ञा. ६-२५५; १०-७६.

**सिद्धी**-अतिमानुष शक्ति. २, ५१.

**सिन(ण)**-दुःख, ताप. ३७९, ४४१, ५७४, ६४३, ६५८, ६७१.

**सिणणें**-श्रांत होणें, दुःखी होणें, थकणें, ४०२, ४६२, ७५८.

**सिणली**-थकलेली. ६५२.

**सिंपण**-(१)सडा, सिंचन. (२) हातांत रंगाच्या पिचकाऱ्या घेऊन केलेली रंग क्रीडा. ७६०.

**सिंपणें**-शिंपडणें, सिंचन करणें, पिचकारी मारणें. ८४७, ८४८, ८४९.

**सिंपणारें**-धोटा, पिचकारी. ७६१.
**सिय**-शीत, हींव, थंडी. ४३८.
**सिरंगिरि**-छत्र. १०२.
**सिरसां**-डोक्याने, डोक्यावर. ५०९.
**सिस**-शीर्ष, डोकें. ५८२. ज्ञा. ११-४९
**सिवना**-स्वप्न. ६६६.
**सिहाडा**-सिंहमुखी दगडी कठडा. ८६९.
**सि (से) हाणा**-शहाणा १५०, १५२.
**सि(सी)हाणी**-शहाणी. ४१३.
**सिहाणीव**-शहाणपणा. ६३०, ६३४.
**सिहानपण**-शहाणपणा. ४११.
**सिळा**-शिला, दगडाचा मोठा व लांब चिरा. २२८.
**सीग**-माप भरल्यावर वर आलेला भाग, ओसंडून वाहणारा भाग. ७५९.
**सुआर**-वस्त्रें देणारा सेवक. ६९५.
**सुखासन**-सुखदायक आसन. ३०२.
**सुग(घ)डपणा**-कुशलता, नैपुण्य. ३४५.
**सुचिक**-सूचना. ६२२.
**सुजणें**-शोभणें. १९४.
**सुतणें**-घालणें, ठेवणें, निजविणें. ५७८.
**सुद्ध**-स्वर्गांतील गायनाचा प्रकार. १८०.
**सुधा**-अमृत. ७२६.
**सुधांकुर**-सुधाकर, चंद्र. ४९७.
**सुपवती**-बिछाना, आसन. ५६६; गो. ८१; शि. २५७.
**सुपाणी**-पाणीदार, तेजस्वी, डौल-दार. ९८.
**सुबंबाळ**-मोठा आवाज. ६१६.
**सुभर**-पुष्कळ, उत्कर्ष. ४३१. ऋ. ३००.
**सुभेद**-निरानराळे सूक्ष्म प्रकार. ३४८.
**सुमन**-(१) फूल. २७६, ७५४. (२) चांगल्या मनाचा, सज्जन. ४३, ४१४.
**सुरंग**-सुंदर, चांगलें. ४०, ७६०, ७७५, ५५९, ७५०.
**सुरत**-विषयोपभोग. ७३७.
**सुर-तरु**-देवांची झाडें, मंदार, पारि-जात, संतान, कल्प व हरिचंदन हे पांच सुरतरु आहेत. ७३२, ७८७, ८०४.
**सुर-पोपळी**-सुपारीची एक जात.
**सुरवाडणें**-सुखी होणें. २. ज्ञा. १-४०; ६-२५.
**सुहावा ( वी )**-शोभिवंत. २५०, २१२, ६३८. ऋ. २०५. ज्ञा. १८-८४१.

**सुर**–देव २०२.
**सुरेख**–सुंदर, रेखीव. १६४.
**सुलेख**–सुंदर, रेखीव. ३२१.५२२.
**सुवट**–छान, वर्तुळाकार. ३२३.
**सुवेख**–चांगला वेष धारण केलेला, शोभिवंत. १६४.
**सुश्रीक**–चांगलें, शोभिवंत. ३२९.
**सुणें**–घालणें, टाकणें. ४०५, ५९४, ७५४.
**सूइणें**–टाकणें, घालणें. ५४७.
**सूदणें**–अर्पण करणें, देणें, घालणें. ३०८, ६८२. ज्ञा. ११-६१.
**सूनि**–घालून. ११७, १९९. ज्ञा. ७-२०२.
**सूपवती**–गाढी. ५६६.
**सेज**–शय्या, ४०, ३८६, ३९८, ५०३, ५७७, ७६१, ७८५.
**सेजवट**–शयन-स्थान, सेज. ५६६.
**सेजवळा**–बिछाना करणारी, शय्या शृंगारणारी सेविका. ३८८.
**सेजार**–शयनगृह. ४४०, ४४६, ६२०, ७६१, ८१३. शि. २७०; ऋ. २२९.
**सेजे-तळौटी**–पलंगाखाली. ६५६.
**सेंद्**–करंडा. ५६४.
**सेरडूं**–बोकड २०१.
**सेलणें**–जिंकणें. ५२९
**सेवक**–नोकर. ६९८
**सेस**–मळवट. ५. उ. १२३.
**सेळंद्री**–दासी, सैरंध्री. २१९
**सैंग**–सहज, नैसर्गिक, स्वयंभ. ३७१, ४७७, ४८७, ७०३, ७४५, ७४६, ७६०, ७७५, ८२७.
**सैंभ**–स्वयंभू मूर्ति. स्वयमेव, आपणहून. ८७, १६४, १६५, ७८१, ७८५, ८०९, ८५५.
**सैंभी**–स्वयं उत्पन्न झालेला, नैसर्गिक. ८६९.
**सैंवर**–स्वयंवर, वधूने वर निवडण्याची विवाह-पद्धति. ११६.
**सोकरणें**–हाकणें, हाणणें. ५९८. शि. २५५.
**सोखणें**–कोरडें होणें. ४६६.
**सोगौर**–हंसासारखा एक पक्षी. ५३१, ५९६, ८१३, ८२६.
**सोधणें**–शुद्ध करणें. ५८५.
**सोधणी**–शोध. १०८.
**सोनवखे**–पिवळ्या रंगाचा एक पक्षी. ७९२.
**सोनेसळा**–जरीच्या धारा असलेलें वस्त्र. ७४०
**सोपान**–जिना, पायऱ्या. ५१ ऋ. ६०. ज्ञा. ६-५४.
**सोय(इ)रा**–संबंधी आप्तेष्ट. ६४६, ६६७. ज्ञा. १२–८३. ज्ञाप्र. ९४०.

**सोरट(ठ)**-एका देशाचें नांव, सौराष्ट्र. ७००.

**सोवाळें**-खिडकी, गवाक्ष. ४२४, ५११.

**सोसु**-श्वास. ५५०.

**सोळखने**-सोळा खणांचें. ४१७.

**सोळाके**-वजनदार व डौलदार. ३३.

**सोळांखाचें**-सोळा कळांचें. ४३७.

**सौभाग्य**-ऐश्वर्ययुक्तता. ८९

**सौरस**-आवड, रिघावा, प्रवेश. ६४७, ७०४, ८०४. उ. ६ ऋ. १४. ज्ञा. १०-६

**सोवाणी**-गोड वाणी, चांगलें भाषण. १७९.

**स्थानीं**-सभा. ३८, १०८, १०९, ३६१, ३६५, ४०१.

**स्वरूपता**-तद्रूपता. ८२२.

**स्वस्त**-स्वस्थ, शांत. ३९१.

**स्वस्ति**-कल्याण; कल्याणकारक वचन ६७६.

**स्वस्तिक**-स्वस्तिवचन, शुभाशीर्वाद. ६१३.

**स्वस्ति-वचन**-'कल्याण असो' अशा अर्थाचा आशीर्वाद. १३५, ६५४.

**स्वाती**-एक नक्षत्र. ५५४.

**स्वर**-सूर, आवाज. ३४६.

**स्वेत**-पांढरा. ४९४.

**स्वेत-द्वीप**-सप्तद्वीपांपैकी एक. ८६३.

**स्वे(स्व)तर**-पाताळांतील एक सुप्रसिद्ध गायक. १८३, ८०८.

**स्वेद**-घाम. ५५८, ५५९.

**स्वैरिणी**-स्वच्छंदाने वागणारी स्त्री, जारिणी, व्यभिचार करणारी. ४८०.

## ह

**हट**-रणभूमि. ४९८.

**हडपिणी**-विडे देणारी. १०२, ३९३, ३९६, ६८७.

**हडपु**-विडे देणारा. ६९५, ७४४- उ. ३८४. शि. ४९. ज्ञा. १७. २७६.

**हय-राज**-घोड्यांचा स्वामी. २२९.

**हरिचंदन**-चंदनाचा एक प्रकार ५६६, ८३७.

**हरुष**-हर्ष, आनंद. ५१२.

**हवाव**-शोभा, तेज, उठाव. १००, १६६. ज्ञाप्र. ४९२; ७४२. ज्ञा. ६-१३२.

**हळदुवे**-पिवळ्या रंगाचे पक्षी. ७५१.

**हळुवट**-हलकें. ८६१.

**हळुवार**-नाजुक; कोमल. ७५८. ज्ञा. ६-२६.

**हंसोदक**-स्वच्छ पाणी. ३९५.

**हाउळी**-झाक, समूह. ८१२. उ. ५२१. ज्ञाप्र. ७३९.

**हाटाड**-कठीण. ६६.

**हात-उबा**-हाताच्या उष्णतेने. ९९.
**हातलोंबी**-हाताला हात मारून-टाळ्या देऊन खेळण्याचा एक खेळ. ८२९.
**हात-कडगा**-हातांतील कडें. ९५.
**हात-जौळ**-समूह. ३३.
**हात-सर**-हातांत घालण्याचे मोत्यांचे सर. १७१, ३५३, ९५.
**हात-तुटी**-हातांची ताटातूट. १२०.
**हात-सुटी**-दान देण्याचे औदार्य. ३५५. शि. ५८८. उ. ७६९. ज्ञाप्र. ४५३.
**हाति**-हत्ती. २४६, ४३०, ८५३.
**हाति(थि)येर**-हत्यार, शस्त्र. ३१, २२७, २७२, ५२४, ७६७, ७८०, ८११. उ. १५०. ज्ञा. १०-२५५.
**हार**-ओळ. ८०६.
**हांव**-उत्कट इच्छा. ६२९, ६८९, ८४३.
**हृषीकेश**-श्रीकृष्ण. ३३८.
**हिणावणें**-हीन होणें, कमी होणें. ६०५.
**हिंपुटी**-निराश, दुःखित. ५९०, ७९८. ज्ञा. १२-४३. ज्ञाप्र. ६९९.
**हींव**-बर्फ; थंडी. ४१६, ५९३.
**हिम**-बर्फ. २९६, ४१५, ४१७, ४३८, ५९३, ७६२.
**हिमवंत**-हिमालय. ४१७, ४३५, ४४२.
**हिमावती**-हिमालयांतील नदी. ४१६.
**हिमोदक**-बर्फाचें थंडगार पाणी. ५५३, ५७२.
**हियें**-हृदय. ५६, ३२७ ज्ञा. १-१६३.
**हिरेलग**-हिऱ्यांनी जडलेलें. १६५.
**हिवाचा**-थंडगार. ५६०, ७६४.
**हिंवार**-बर्फाचें घर. ४४२.
**हिवाळी**-बर्फाची जाळी. ४२३.
**हीमवंती**-बर्फाचा ओघ. २९६.
**हींव**-थंडी, गारठा. ज्ञा. ८-१३३.
**हुडा**-बुरूज. ८६७. उ. १९० ज्ञा. ११-३५८; १२-४७.
**हुरप(क)णें**-होरपळणें, भाजणें, ५८३.
**होउनि**-होऊं. ११६.
**होड**-पैज. ४. ज्ञा. ६-५६.

## क्ष

**क्षीर**-दूध ५४८.
**क्षीर-तरु**-न्यग्रोध, उदुंबर, अश्वत्थ व मधूक हीं झाडें. ८०१.
**क्षीर-द्राक्ष**-द्राक्षांचा एक प्रकार. ७९३.
**क्षीरार**-खिल्लार, गाईंचा कळप. ५०.

**क्षीरोदक**–पांदरें–शुभ्र रेशमी वस्त्र. २६, ९३, ४९४, ६५६.शि.६४.

**क्षे(क्ष)णिक**–घटकाभर टिकणारें लौकर नाश पावणारें. ८३०.

**क्षेत्र**–उत्पत्तिस्थान. १२५.

**क्षेत्री**–क्षत्रिय वीर. ११९, १२४, १२५, २२३, २२४, २५५. २७३, २८९, ३१३ ३७४, ६३६.

**क्षेत्रीपण**–क्षात्रियत्व,बलिष्ठता.२५१.

**क्षेत्री-भारू**–क्षत्रियांचा समूह१६२.

**क्षेदु**–दुःख, तळमळ ५७५.

**क्षेव**–आलिंगन ८२१.

**क्षै**–क्षयांत, कृष्णपक्षांत कळा कमी होतांना ४६४

**क्षोणीश**–राजा १५०

**क्षोभ**–राग, तगमग, तळमळ. १६८, ५७५.

# रुक्मिणी-स्वयंवर
## अर्थ-निर्णायक टीपा

### प्र. १

बहुतेक सर्व महानुभावीय कव्यांच्या आरंभीं पंचकृष्ण व नागदेवाचार्य यांना अभिवंदन केलेलें असतें. पण नरेंद्राच्या रुक्मिणी-स्वयंवरांत मात्र तें नाही. याचें कारण असें की, प्रस्तुत काव्य हें मूळचें महानुभावीय काव्य नाही. महानुभाव पंथांत प्रविष्ट होण्यापूर्वीच नरेंद्राने तें लिहिलेलें असल्यामुळे, एरवीच्या पद्धतीला अनुसरून यांत श्रीगणेश व श्रीशारदा यांनाच अभिवंदन केलेलें आहे. तथापि टीपकारांनी मात्र यांतून, महानुभाव तत्त्वज्ञानाला अनुकूल असा अर्थ काढलेला आढळतो. मला त्यांत विशेष औचित्य व स्वारस्य वाटत नाही. कारण, एकतर कवीने, महानुभावीय तत्त्वज्ञानाच्या अनुषंगाने त्या ओव्या लिहिलेल्या नाहीत. आणि दुसरें असें कीं, मूळांत कवीला अभिप्रेत नसलेला अर्थ काढतांना टीपकारांना शब्दार्थांची ओढाताण करावी लागलेली आहे. हें लक्षांत येण्यासाठी दुसऱ्या व तिसऱ्या ओव्यांचे टीपकाराने दिलेले अर्थ जसेचे तसे खाली उद्धृत करीत आहे. त्यावरून, कवीला अभिप्रेत नसलेले अर्थ काढतांना काय प्रकार झालेला आहे तो अभ्यासकांच्या लक्षांत येईल.

" तरी तोचि कैसा : ना तयाचा = तया गणेशाचा ठाइं : एवं तयाचेनि नमस्कारें : सीद्धि = चौदा विद्या आन चौसष्ठ कळा : एवं सकळ विद्यांचे : सर्ग = समूह : आन तयाचेन नमने करूनिया सीद्धि होत : नानाविधि = बहुता प्रकारींचे : भोग = साहीत्य : शृंगार : उपमावळी : इतुकेही वसताति = तयाचा ठाइं स्मृधींत्वे वर्ततात : आन देव सुरवाडले = सुखावले : एवं गायन, नाचन कळे करूनि : ऐसा तो गणेस ॥ सीद्धांते : तयाचा ठाइं = आव्यक्त ईश्वर गणाचा ठाइ : सीद्धिचे = आनंतधा गुण धर्म लक्षणे सीद्धिचे : सर्ग=स्मृद्धि असे : आणिक नानावीधि = वीचीत्रा प्रकारींचे भोग = आन्यत्राचेनि प्रमाणें : तथा वीलक्षण : हे वसताति = स्मृद्धीत्वे आसाति : तेणे = तया ईश्वराचेनि स्वःसंयोगें तथा आत्मक धर्माचेनि : सुरवाडे = सौख्ये करूनि :

देव = अव्यक्त देवता असे देव : अनेग = आनंता ब्रह्मांडीचीया : तीये : तयाचा ठाइं = व्यक्ता ईश्वराचा ठाइं : सीद्धीचे = आनंता गुणधर्माचे : सर्ग = स्वीकार समृद्धि : नानावीधि = वीचीत्रा प्रकारींचे : भोग : सलक्षण वीलक्षण शक्ती स्वीकारें दातृत्व : वसताति = वर्ततात : एवं सर्वा : तेणे आधारे = अव्यक्त ईश्वर संयोगे : देव आनेग : तया ब्रह्मांडस्था सुरवाळले = वोळगे करूनि सुखाते पावले ॥ २ ॥ गणाचें वरदान तल्लक्षेणें मंदाकीनीची वोल : एवं स्वर्गा मंदाकीनी नदी असे : विद्या = सकळ विद्या तल्लक्षेणें : नंदन = आनंदवीतें वन : पाल्हैलें = पाह्ाळैलें : एवं स्फारलें : दाताचेन लक्षणे वरदाचे : तेज लक्षणे सुर्येतेज : वीघ्न : ते ग्रंथ - करणीं : तल्लक्षेणे तम : अंधकार : आटलें : भस्म झालें : आतां सीद्धांते : भटोबासाचेनि मुखे बोध तथा वरदान : तल्लक्षेणे मंदाकीनीची वोल : ब्रह्मविद्या मुख्य सकळ विद्याचे आनंद : तल्लक्षेणे नंदनवन : स्फुर्तिरूप जालें : तल्लक्षेणे पाल्हैलें : दाताचेनि : वरदाता जो ईश्वर : तेज लक्षणे सुर्ये तेज : वीघ्न ते ग्रंथ करनी : तल्लक्षेणे तम : अंधकार : आटलें : भग्न झालें : ॥ ३ ॥ "

२. **सिद्धींचे सर्ग** : सिद्धींचे समूह. या सिद्धी अनेक आहेत. पण त्यांपैकी **अष्टमहासिद्धी** विशेष प्रमुख आहेत. त्या पुढीलप्रमाणे " अणिमा महिमा मूर्तेर्लघिमा प्राप्तिरिन्द्रियैः । प्राकाश्यं श्रुतदृष्टेषु शक्तिप्रेरणमीशिता ॥ गुणेष्वसंगो वशिता यत्कामस्तदवस्यति । एता मे **सिद्धय** : सौम्य **अष्टा**-वौत्पत्तिका मता : " **नानाविध भोग** : " सुगंधवनितावस्त्रं गीतताम्बूल-भोजनं । शय्या च भुवनं चैव **अष्टभोगा** : प्रकीर्तिताः "

३. **विद्यांचें नंदनवन** : " अंगानि वेदाश्चत्वारो मीमांसा न्याय-विस्तरः । धर्मशास्त्रं पुराणं च **विद्या ह्येताश्चतुर्दश** " म्हणजे चार वेद, सहा वेदांगें ( शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, छंद व ज्योतिष ), मीमांसा, न्याय, धर्मशास्त्र व पुराणें मिळून चौदा मुख्य विद्या मानलेल्या आहेत. दानावर मंदाकिनीचें व विद्यांवर नंदनवनाचें रूपक.

४. कवींना गणेशाने मोठ्या कौतुकाने शब्द-ब्रह्मावरील राणीव ( राज्य ) अर्पण केली. ( ' **पाळिली** : प्रतिष्ठापिली ' टीप. )

५. कवीने स्तवन केल्याबद्दल त्याला गणेशाने ' मनोरथ-मुद्रा दीधली '

=कवीचा काव्यलेखनाचा हेतु सफल व्हावा म्हणून आशीर्वादपूर्वक मुदी ( मुद्रिका ) अर्पण केली; व त्याची कविता रसिकांना आवडती ( पढीए ) होवो म्हणून **सेश भरिली;** मंगल कुंकू लावलें = मळवट भरला. मांगल्यदर्शक कुंकुम लावणें याच अर्थी **सेश ( स ) भरणें** हा वाक्प्रचार वापरला जातो. उदा० : ‘ मुक्तीसाम्राजीं **सेश** चोकु : कवणा **भरीला ?** ’ (उद्ध. १२३) ‘ दैत्यांचीं कुळें नाशीं । साधूंचा मान्न गिवशीं । धर्मासीं नीतीसीं । **शेस भरी** ’ (ज्ञा. ४–५३. )

## प्र. २

६. शारदा म्हणजे, सारस्वत-गंगेचा (गोदावरीचा) त्रियंबकच ( गोदावरी नदीचें उगमस्थान असलेलें त्र्यंबकेश्वरच). अर्थात् शारदा म्हणजे सारस्वताचें मूल उगमस्थान. सारस्वतरूपी गंगा-नदीचा स्वामी त्र्यंबक अर्थात् शंकर, असाहि अर्थ घेतां येईल, पण तो तितकासा चांगला वाटत नाही. कारण मग ‘ कुमारि -वेशें ’ या चरणाची उपपत्ति समाधानकारक लावतां येणार नाही.

९. “ **घिउंदें :** जैसें उखतें घेईजे ( ? ) : तथा मैहस व्यालियचा हावाला कीजे : आन तेयावरि तुप करावें ” (टीप). या टीपेवरून नीटसा अर्थबोध होत नाही. तूप–मिश्रित दुधाचा हा पेय पदार्थ असावा. महदंबेच्या धवळ्यांत ‘ कनकघना न्हाणियेली तीये बाळे पाजीयले **घीवंदे** ’ ( उत्तरार्ध. ६० ) असा शब्द येतो. **घीवंदे** व **घिउदें** एकच असावेत. **घीवंदे**चा अर्थ संपादकांनी ‘ पेय विशेष ’ असा देऊन, त्यावर पुढील टीप जोडली आहे. ‘ कानडींत याच अर्थी ‘ पीवंदु ’ शब्द प्राचीन वाङ्मयांत येतो. आधुनिक कानडींत **प** चा **ह** होतो, म्हणून ‘ हीवंदु ’ हाहि शब्द आढळतो. पीवंदु–हीवंदु यावरून ‘घीवंदे’ हें अपभ्रष्ट रूप मराठींत आलें असावें. ” नवरस हेंच **घिउदें. नवरस :** शृंगारहास्यकरुणरौद्रवीरभयानकाः । बीभत्साद्भुतसंज्ञौ चेत्यष्टौ नाट्ये रसाः स्मृताः । निर्वेदस्थायिभावोऽस्ति शांतोऽपि नवमो रसः ॥ **पेहें :** दूध. पहा ‘ तया वोरसें देतुसे **पेहें** : माउली ते ’ (ऋद्धि. ५.) **परियें** = झोके. ‘हृदयाकाशपालखीं । **परियें** देसी निजें’ (ज्ञाने. १२–५ ) **अनुहात शब्दीं :** निःशब्द गीत गाऊन. मुलांना पाळण्यांत घातल्यावर आई अंगाई गाते त्याप्रमाणे शारदादेवी निःशब्द गीत गाते. **अनुहात** = न

वाजवतां, स्वयमेव निर्माण झालेला ( ध्वनि ) : हा ध्वनि केवळ योग-साधनानेच ऐकूं येतो, असें म्हणतात.

१०. सर्व पोथ्यांतून 'विद्यावंती' असा पाठ असला तरी तो शब्द **विदावंती** या अर्थाने येथे वापरलेला आहे. **विदावंती** = गायिका; भाट; स्तुतिपाठक. पुढील दोन चरणांचा अर्थ लक्षांत घेतां, वरील शब्दाचें स्वारस्य कळून येईल. 'विदावंत' शब्द स्तुतिपाठक या अर्थाने पुढें १६८, २१४ वगैरे ओव्यांत वापरला आहे तो पहावा. **देवाचिये भाटिवेची :** जेणें करून मला श्रीकृष्णाचीं स्तुतिस्तोत्रें गातां येतील (अशी सामग्री दीधली).

११. **तिया बाइला :** त्या बाईनें; देवीनें. शब्दकोशकारांनी **बाई** या शब्दाची उपपत्ति 'भगवति – बअवई – बावी – बाई' अशी दिली आहे. ती ( + स्वार्थे 'ल' प्रत्यय ) लक्षांत घेतली म्हणजे **बाइल** शब्दाचा **देवी** अर्थ कसा योग्य आहे तें कळेल. **रस–फळांचा :** (नव) रसांनी युक्त, रसाळ अशा फळांचा. **परियळ** = (प्रसादाचें) ताट. पहा '**परीयळ** न्या वेगीं ते स्वीकरी ना आणीकें अन्नें' ( धपू. ५५ ) '**परीयळ** रुक्मिणी–हातीं दीधला' ( धपू ५,८. ) वरील दोन्ही चरणांत **परीयळ** शब्दाचा अर्थ 'प्रसादाचें अन्न किंवा अन्नाचा प्रसाद' असाहि करतां येईल. प्रस्तुतच्या ओवींत देखील **परियळ** = अन्नप्रसाद असा अर्थ घेतला तरी चालेल. अन्न या अर्थीं परियळ शब्दाचा उपयोग पहा 'मनोरथाचे **परियळ** । आरोगिजतु कां लक्ष वेळ' ( अमृ. ६–३३ )

१२. **महाकवी :** महाकवींकडे. **सावायाचे दिवटे खोलवी :** आपल्या साह्याचें–मदतीचे दिवे ( कवितां पुढां ) चालवी. साह्यावर दिव्यांचें रूपक. **सावाय** = साह्य, मदत. पहा : 'ऐसा स्वयंभ जो जीवें लाठ । **सावायें** वीण उद्भट' ( ज्ञाने. १८–८५,७ ). काव्यदेवते समोर शारदादेवी आपल्या मदतीचा उजेड पाडते. त्या उजेडाच्या साह्याने ( = शारदादेवीच्या मदतीने ) कवि चालतात. ( १३ वी ओवी पहा ).

## प्र. ३

१४. " **कवितेची रेख :** जैसी बीजे बीजेच्या चंद्राची रेखीली रेखा तैसी कथेची अनुक्रमणिका " (टीप). **साहानुकेसी** = शांति–समाधानासह.

१५. **जळसेन करीन** : सुख-समुद्राच्या पाण्यांत शयन करणारें ( **सेन**=शयन ) बनवीन. सुखांत बुडवीन; अत्यंत सुखी करीन.

१६. ' **वेदावरि** : वेदाचेनि आधारें : स्मृति विवेकें करूनि आर्थ काढिला : ' ( टीप )

१७. **चित्र-गाथा** : शब्दचमत्कारांनी युक्त कविता; चित्रकाव्य.

१८. श्रीकृष्ण हा परब्रह्माचा पूर्णावतार; म्हणून श्रीकृष्ण म्हणजेच परब्रह्म. पण इतर अवतार हे प्रातिनिधिक स्वरूपाचे आहेत, अंशावतार आहेत, पूर्णावतार नाहीत. **अंशकळा** : अंशमात्र विभागाने.

२०. **मेळवण** : दूध काढण्याच्या वेळीं गाईला जें कालवण देतात तें. (इतरांकडून दोहिल्या न जाणाऱ्या) शब्द-ब्रह्मरूपी गाईला ज्ञानाचें मेळवण घालून लीला ( श्रीकृष्ण चरित्र ) रूपी अमृत ( अमृतमय असें दूध ) दुहिलें.

## प्र. ५

२१ **ब्रीद बोलेति** : ( चंद्रकळे जवळ ) आपल्या पराक्रमाच्या गोष्टी सांगतात. ( की तुझ्यापेक्षा समुद्राला आकृष्ट करून भरतें चढवण्याचें सामर्थ्य आमच्या ठिकाणीं विशेष आहे ). **दोंद निघे** : पोट फुगतें. भरतें चढतें.

२२. कुंकुम-केशराच्या लांब वेलीला मोत्यांच्या मंजिऱ्या लागल्या म्हणजे त्या जशा दिसतील तशा कवितारूपी वेलीला अक्षरांच्या मंजिऱ्या लागलेल्या शोभतात. **तुरंबी** : मंजिरी. **लोंबी** : ओंबी, कणीस, मंजिरी.

२३. प्रबंधाच्या परिमळापुढे मळयानिळ **खांचना** ( तुच्छ ) होय. **पदाचा ढाळु** : यांतील कवितांच्या चरणांचा डौल कामिनी-कटाक्षांना देखील **सराउ दे** = अभ्यास, शिकवण देतो. अर्थात, कामिनी-कटाक्षा-पेक्षा अधिक डौलदार व ऐटबाज अशीं हीं पदें आहेत.

२४. जे ग्रंथदेवते, साहित्य ( रूपी ) सेवंतियांचा घाटौळीं ( कळ्यांनीं, कळ्यांची ) लाखौळी ( लक्ष कळ्यांचा समूह ) वाति ( वाहतात, अर्पण करतात ), तयाचां बोलीं विणेया पासौनि ( वीण्यापेक्षा ) वोता ( अधिक, चढता-वाढता ) रंग ( बहर, श्रुतिमाधुर्याचा ) दिसे.

२५. चंद्राच्या चांदण्याच्या वर्षावाने कापुर-केळीच्या उदरांत कापूर

निर्माण होतो, या कल्पनेवर येथे रूपक आधारलें आहे. **उन्मेष चंद्र :** स्फूर्तिरूपी चंद्र. **पोतास :** कापूर. पहा : ' तयां तत्त्वज्ञान चोखटा। दिवी **पोतासाचि** सुभटा, (ज्ञा. १०-१४२)

२६. नवरसरूपी कालव्यावरील (खेडकुळिये) साहित्यरूप कुंजांत (साबरेया आंतु) **मलपतु चाले** = डुलत डुलत चालला आहे. भाव आणि कविता-कामिनी यांचा हा कुंजविहार मोठा मनोज्ञ आहे, यांत शंका नाही.

२८. जे महाकवी **'देवा जाणौनि** (देवाचें महत्त्व ओळखून, देवाचें ज्ञान करून घेऊन) **वालभैले** (ईश्वराला प्रिय झाले, ईश्वराचे प्रिय भक्त झाले) ते **महाकवी मानिले** (त्यांना आम्हीं मान दिला, आमच्याकडून त्यांना मान मिळाला); **जे नेणौनि** (ईश्वरस्वरुप न ओळखतां सुद्धां) **जाण** (शहाणे आहेत, स्वतःला शहाणे म्हणवतात) त्यांना काय म्हणावें बरें ?

२९. " फुली तें झाड : तियचें फुल चक्राकार : तियचिय मळीचें आंजन : तेणें पाटा फोडुनि दीसे : तैसें यक्षिणीचेनि ज्ञानें ईश्वर न कळे " (टीप). **पाटा फुटणें** : अज्ञानाचें पटल नाहीसें होणें; ज्ञान प्राप्त होणें. पहा : ' आनोबासीं वासुदेवभटां झाडातळिं **पाटा फुटला** म्हणणें : ' (वृद्धाचार. ११). ' मग दिव्यचक्षु प्रकटला। तें ज्ञानदृष्टी **पाटा फूटला**। यापरीं दाखविता जाला। ऐश्वर्य आपुलें ' (ज्ञारा. ११-१७८).

३०. पायाळू (पायाकडून जन्मलेल्या) माणसाला अंजन लावतांच जमिनींतील ठेवा दिसूं लागतो अशी समजूत आहे. ' तया सदैवां (इतर बाबतींत भाग्यशाली असलेल्या वेदांना) परज्ञानाचें (ईश्वरस्वरुपाच्या ज्ञानाचें) अंजन न चढेचि. तें अंजन त्यांना लागतच नाही. त्यांच्या डोळ्यांना बिलगतच नाही. ' अर्थात्, त्यांना ईश्वरज्ञान कधीच होऊं शकत नाही.

३१. परब्रह्म-नगरींत प्रवेश करायचा असेल तर तेथें निरभिमानतेने जायला पाहिजे. पण शास्त्रांनी अभिमानरूपी शस्त्र हातांत घेतलेलें असल्यामुळे त्यांचा प्रवेश तेथे होऊं शकत नाही. म्हणून ते, ईश्वरप्राप्तीविषयक विविध मार्ग हींच आखरें (आखर = सीमेबाहेरील प्रदेश) तेथे = परब्रह्म नगरीच्या शिवेबाहेरच घोटाळून राहिलीं आहेत.

३२. ' **नांव नीगे** : प्रतिष्ठारूप ' (टीप). ज्याचें नांव सर्वत्र

निघतें, दुमदुमतें असा; नामवंत. **नांव-नीका :** नांवाने चांगला; सुप्रसिद्ध **मवणें :** मोजणें. पहा 'हां गा मनातें मार्गा सांडावें । पवनातें वावीं मवावें; आदिशून्य उतरोनि जावें । केउतें बाहीं ' (ज्ञा. १०-१७८.)

## प्र. ६

**३३. 'सोळांकें :** औठ मासे आन आठां आंगीं सुढाळ : ' ( टीप ) पूर्ण-चंद्र मंडळ पाहुनि ( पेक्षा ) सोळाकें मुक्ताफळ (तें) काई ? पूर्ण-चंद्रापुढे, डौलदार मुक्ताफळ काय किंमतीचें ? पूर्ण चंद्र-मंडळ म्हणजे अमृताचें हातजौळ ( समूह ); उलट, मुक्ताफळ म्हणजे ( थोडेसें ) चरणोदक जींत मावूं शकेल अशी लहानशी **कुपी**=' कापडियाची कुपी : एवं चरणोदक थोडें : तैसें ईश्वर थोर आन माझें वर्णन सानें ' ( टीप ). ज्ञानेश्वरींत **कूपिका** शब्द आढळतो पहा. " तंव इये शब्दकुपिकेतळीं । नोडवेचि अवधानाची अंजुळी जे नावेक अर्जुन तये वेळीं । मार्गांचि होता " ( ज्ञा. १०-१८५ )

३६. विरहिणीच्या अंतःकरणांतील भाव जर ती बोलून दाखवायला लागली तर ते **आनारिसे**=आना सारिखे ( मूळाप्रमाणे नव्हत असे, अर्थात् अयथार्थ ) होतात. पण, **रस-डोळसे** ( रसज्ञ, मार्मिक रसिक ) तिची ती भाव-रूपी पत्रिका वाचतात. अर्थात, मार्मिक रसज्ञांना (विरहिणीच्या अंतः-करणांतील भाव, तिने कसेतरी बोलून न दाखवलेले ) ओळखतां येतात.

**३७. मी बियाळ बोलें उसणतां :** जणुं स्वप्नांत बडबडल्या-प्रमाणे मी वेडेंवाकडें ( बियाळ ) बोलतें.

## प्र. ७

**३८. भावरीय :** परीक्षावंत; भ्रमरा (भवरा) प्रमाणे गुणग्राहक.

**४०.** रसिक ( कलाविद ) रूपी वसंत ऋतु आला म्हणजे काव्य-कोकिळ आपल्या मधुर वाणीने गायला लागतो; त्या गायन-सुखाच्या शय्येवर **रस-राजहंसें** ( राजहंसाप्रमाणे रसांचा नीरक्षीर-विवेक करणारे रसिक ) विसवती.

**४१.** जाणीव ( आपल्या कवितेचें मर्म ग्रहण करणारे रसिक आहेत ही कल्पना ) हेंच चंद्रमंडळ; त्यायोगें कवीकडून निर्माण होण्याऱ्या नव-रसांच्या समुद्राला भरती येते; ज्याच्या काव्यांत रस आत्मीयतेने उतरतात. नाहीतर

( जाणते रसिक नसले तर ) श्रोत्यांच्या नेणीवरूपी वडवानळामुळे ( अजाणतेपणा–अरसिकता हाच वडवानळ, त्यामुळे ) तो रससमुद्र उपेखे=ओहोटतो. या कल्पनेशीं उद्धवगीतेंतील पुढील कल्पना ताडून पहा : " तैसा सुवर्म जोडे श्रोता : तरि रसभावीं फुले कविता : तोंवरु ये सारस्वता : नव रसांचे "(१९)

४२. (तथापि) जर कवीच्या काव्यांत शब्द–वेधी ( केवळ शब्दश्रवणाने इतरांचें लक्ष आपल्याकडे वेधून घेणारा ) रस उतरलेला असेल ( वोडवे ) तर अरसिकतारूपी लोखंडाला देखील तो आपल्याकडे वेधून घेईल. कविताच जर मूळांत रसाळ असेल तर तिच्यामुळे अरसिक देखील आकृष्ट होतील. तेव्हांच (तेवींचि) कवितेसी अमरा देह सिद्धी होति. ( कवितेला अजरामरत्वाची सिद्धी प्राप्त होईल). " आलापतः कनकतां नयतेऽष्टलोहं । स : शब्दवेधित्त रस : शतयोजनेऽपि ' ( केशिराज. दृष्टांत स्तोत्र. )

प्र.८९

४३. ' धुमकुसें : संगीतादि गायन यकचि घोंस : भावें धुमकुसें = नाच न कळे : त्याग पडे : तेव्हां धुमाळ घेति ' (टीप). नृत्यगीतादिकांचा मेळावा. जलसा. धुमकुस या शब्दाचा मूळअर्थ = घोष, मेळावा, गर्दी, एवढाच आहे. साहित्यामधे अंतर्भूत होणाऱ्या नृत्यगीतादिकांच्या गर्दीने ( साहित्याचा धुमकुसें )

४४. आपणांला आवडणाऱ्या चंदनाची उटी ( अनुलेपन ) देवाला लावण्याचें भाग्य जर प्राप्त झालें तर.

४६. सा भाषा : संस्कृत, प्राकृत, अपभ्रंश, पैशाची, मागधी व शौरसेनी. ज्या मराठी भाषेंतील रसाळपणाने सहा भाषांच्या बाटल्या मोठ्या कौशल्याने भरलेल्या आहेत ती. ही अर्थात् अतिशयोक्ति होय. ही टाळण्यासाठी या चरणांचा असाहि अर्थ करतां येईल " ज्या मराठी भाषेंतील रसाळपणामुळे ( मराठी भाषेंत रसाची विविधता आणि वैचित्र्य इतकें अमर्याद आहे की त्यापुढे ) सा भाषांचे ( या सहा भाषांतील रस-वर्णनांना मराठीकडून ) ( निगुती कौशल्याने ) कुपे किजति ( लहान लहान कूपांचे किंवा बाटल्यांचें स्वरूप प्राप्त करून दिलें जातें ). मराठींतील रससंपत्तीसमोर सहा भाषांतील रससंपत्ति फार तोकडी पडते, हा भावार्थ.

४७. **रसिक** : रसाळ. पहा " ऐसीं अक्षरें **रसिकें** । मेळवीन " (ज्ञाने. ६–१४). **देशियेचें बिक** : देशी भाषेचें महत्त्व, तिची शोभा.

४८. **चौदा विद्या.** ३ ऱ्या ओवीवरील टिपणी पहा. ' **जीवन** : सार–सिद्धांत. ' ( टीप ). शुकमुनींच्या भागवतांत चौदा विद्यांचा व सर्व धर्मशास्त्रांचा सारभूत अंश आलेला असून, त्यांतील ब्रह्म–सुखाचें पक्वान्नहि जणु त्यांत अंतर्भूत झालेलें आहे, असा भावार्थ.

४९. सर्व पुराणें हाच एक आनंदाचा समुद्र, त्यांत भागवत पुराणांतील दशम स्कंद हा चंद्र व त्यांतील रुक्मिणी स्वयंवराची कथा म्हणजे त्या चंद्राचें चांदणें. पहा :" पुराण–गगनिचा कुमुदबंधु : जो आईकिजे येकादश स्कंदु : तेथ कीजैल प्रबंधु : मुनीजनालागि " (उद्ध. ३६).

५०. " **खिरार** : तल्लक्षणें गाइचा कळप : दुध बहुत : तैसें साहित्य बहुत " ( टीप ). **खीर** : संस्कृत **क्षीर** शब्दापासून.

५१. ही कथा म्हणजे सुखाच्या स्वर्गाला नेऊन पोचविणारा सोपानांचा ( जिना, पायऱ्या ) ( वरचढत जाणारा ) वेल (मालिका) आहे.

## प्र. १०

५२. **सप्त दीपें** : जंबूप्लक्षाह्वयौ द्वीपौ शाल्मलश्चापरो द्विप : । कुश-क्रौञ्चौ तथा शाक : पुष्करश्चैव सप्तम : ॥ कांहीं ग्रंथकारांच्या मतें हीं द्वीपें १८ असावींत असें वाटतें. उदा. ' **नवद्वयद्वीप**पृथग्जयश्रिया ' (नैषध) व ' **अष्टादशद्वीप**निखातयूप : ( रघु. ६–३८ ) हीं अवतरणें पहा. तथापि कालिदासानेच ' पुरा **सप्तद्वीपां** जयति वसुधामप्रतिरथ : ' असेंहि म्हटलें आहे !

५५. धैर्य गुणा बद्दल धरणीची प्रसिद्धि आहेच. पहा " सर्वांगें विदारिति भूतें : परि पृथ्वी न संडी धैर्यातें. " ( उद्ध. २७४ ) अगाधत्वाच्या बाबतींत समुद्राची प्रसिद्धी आहे. पहा : ' जो रत्नाकरसा गभीर ' (द.स्व.१७)

५६. **नितीं** : ( नीतीपूर्वक आचरणाच्या बाबतींत, अथवा राजनीतींत, नीति-शास्त्रांत. ) **ब्रह्मेया तुल्हाटे** : ( ब्रह्मदेवाकडून पराभविला जात नाही ) ब्रह्मदेवापेक्षाहि नीति–शास्त्रांत श्रेष्ठ. **हीयें** = हृदय. पहा ' तेणें दुःखें **हियें** फुटैल । तुजवीण कृष्णा. ' ( ज्ञाने. १–२३४ )

५९. तुलनेसाठी पुढील चरण पहा " पदांचा मेळावा : रत्नाकरा करी चढावा " ( उद्ध. २८ ) भीमक हा समुद्रापेक्षा माणुसपणाच्या बाबतींत श्रेष्ठ होता. एरवीं दोघेहि सारखेच. भीमकाला मनुष्यदेह प्राप्त झालेला होता, तसा रत्नाकराला नव्हता.

६१. तो एका लहानशा देशाचा राजा असला तरी त्याच्या आश्रयाचा दरारा एवढा मोठा होता की त्याच्या मुलीच्या ( रुक्मिणीच्या ) नुसत्या बोलावण्याने देखील चौदा भुवनांचा जो स्वामी (श्रीकृष्ण) त्याला धावत यावें लागलें !

६३. सारख्या कल्पनेसाठी पुढे ८६१ वी ओवी पहा.

## प्र. ११

६४. **पाटाची** = पट्टाभिषिक्त. मुख्य. याच अर्थाने नामदेवाने देखील हा शब्द वापरला आहे. पहा " वेश्या झाली **पाटाची** राणी। तिला आठवे मागील करणी " ( नाम. गाथा. जोग प्रत. १५६९ अभंग ). आज मात्र **पाटाची बायको** या शब्दांना निराळाच रूढार्थ प्राप्त झाला आहे.

## प्र. १२

६९. क्षीरसागराचें अंतःकरण, रुक्मिणीच्या रूपाने, मानवरूप धारण करून व्यक्त झालें, अशी कविकल्पना.

७०. ब्रह्मरस पिऊन तृप्त झालेला परमेश्वर जेथील ओष्ठाला मान देता झाला तें मुख. रुक्मिणीच्या ओष्ठाची माधुरी, ब्रह्मरसाच्या माधुरीपेक्षाहि अधिक होती, हा भाव. **ख** प्रतींतील पाठ : **अधर निर्यासी** = अधर-नीरासी. अधर-नीर = ओठांतील रस.

७१. रुक्मिणी श्रीकृष्णाचा उपभोग घेणार होती. अर्थात्, रुक्मिणीच्या डोळ्यांना देखील श्रीकृष्णरूप उपभोगायला सापडणार. हें सुख इतरांना प्राप्त होणारें नव्हतें, म्हणून रुक्मिणीचे डोळे विशेष भाग्यशाली होते.

७३. श्लोकांतील भावार्थ लक्षांत घेतां **कखम** प्रतींतील **मेल्हावण** या पाठापेक्षा **द** प्रतींतील **माजवण** हाच पाठ अन्वर्थक वाटतो, म्हणून तोच स्वीकारला आहे टीप ग्रंथांत **माजवण** हाच पाठ आढळतो.

७४. **उमेठां बोलीं** : बहरलेल्या शब्दांनी सुंदर रसभरित भाषेंत.

**उमे (मै)ठ** : या शब्दाचा अर्थ "**उमेठेआं** देवा नीचनवा" (शिशु.१५३) वरील टीपेंत, महानु. टीपकाराने ' सुंदर ' असा दिला आहे. तोच अर्थ याहि ठिकाणीं योग्य वाटतो.

## प्र. १४

७८. **कुळदेवता लेपिवां** : त्या सख्या म्हणजे जणु, सौंदर्यासाठी प्रसिद्ध असलेल्या रती–मदनांच्या शृंगारलेल्या कुल–देवताच होत्या.

७९. **अमृताचिया विर्नी** : त्या सख्या म्हणजे जणु निर्मळ अमृता पासून तयार झालेल्या होत्या. **डोळेयांचिया जिनी** : त्यांच्याकडे पाहणाऱ्यांच्या डोळ्यांना प्रफुल्लित करणाऱ्या जणु संजीवनी शक्तीच.

८४. त्यांच्या कलायुक्त विलासांनी, कौशल्यपूर्ण हावभावांमुळे ( कळा-वियांळीं) त्यांच्या हातांतील कंकणें मोठ्या आनंदाने **(माल्हाडी)** वाजत होतीं.

## प्र. १५

८६. " **पूडिव** : रत्नासि वर्त्त देउनि तळीं पुड दीजे : भावें वरिल पुड फेड्डानि : गाभयाचें : " ( टीप ) रुक्मिणीचें रूप म्हणजे जणुं चंद्राच्या गाभ्यांतून कोरून काढलेला निर्दोष भाग होय.

८७. **परिमळाची अक्षोभ** : सुगंधाची गंभीर अशी ( मूर्ति ). गर्द सुगंधच जणु तिच्या रूपाने व्यक्तत्वास आला होता.

८८. **युवन-मढिची** : यौवनरूपी मठांत–देवाळयांत–राहणारी.

८९. **वस्यकरणाची दिव्य औषधी** जणु रुक्मिणीच्या रूपाने **सावेव** ( सावयत्र ) झाली होती–आकाराला आली होती.

९०. " चंद्राचें कुळ सोळा कळा : तयाचा आचार्या चंद्र : कुळेश्वरी ते सतरावी कळा " (टीप). सोळा कळांचा स्वामी असलेल्या चंद्राची कुळ-देवता. पूर्ण चंद्राला देखील सेव्य व पूजनीय वाटणारी देवता.

९१. " निळोत्पळें हिरेमाणिकें : एवं रूक्मिणीचे आळंकार ते आप-णासि नाहीति ऐसी उणीव मात्री : " रुक्मिणीचें मुख पाहतांच चंद्र लाजेमुळे थंडा पडून निस्तेज होतो. शिवाय रुक्मिणीच्या अंगावरील अलंकार आपणा-जवळ नाहीत याचीहि त्याला जाणीव होते.

९५. **कृत्तिका** : सहा तारकांचा एक नक्षत्रपुंज.

९६. रुक्मिणीचा मुखचंद्र, ही मेलेल्या मदनाला जिवंत करणारी जणु संजीवनीच. दैत्यगुरु शुक्राचार्य याच्याजवळ संजीवनी होती. पण त्याच्या संजीवनीपेक्षा रुक्मिणीच्या मुख-चंद्राची संजीवनी अधिक श्रेष्ठ होती. म्हणून, जणु रुक्मिणीच्या नाकांतील मोत्याच्या रूपाने, प्रत्यक्ष शुक्राचार्य रुक्मिणीजवळील मदन-संजीवनीची भिक्षा मागावयास आलेला आहे, अशी कल्पना.

९७. कपीलमुनीच्या क्रोधाग्नीने जळून भस्म झालेल्या सगरांना (सगर राजाच्या मुलांना) जिवंत करण्यासाठी, भगीरथीच्या प्रयत्नामुळे, पूर्वी गंगा अवतरली होती व तिने सगरपुत्रांना जिवंत केलें होतें. याच कल्पनेचें रूपक येथे रुक्मिणीच्या भांगांतील मोत्यांच्या सरावर केलें आहे. तो मोत्यांचा भांग जणु शृंगार-गंगेचा अवतार होता. शंकराच्या क्रोधाग्नीने जळून भस्म झालेल्या अनंगाला ( मदनाला ) जिवंत करण्यासाठी-शंकराने मदनाला जाळलें तर आपण त्याला जिवंत करूं या स्पर्धेने, ही शृंगार-गंगा अवतरली होती. अर्थात्, रुक्मिणीच्या केशकलापांतील तो मोत्याचा भांग पाहिल्याबरोबर, पाहणारांच्या अंतःकरणांत मदन जिवंत (जागृत) होत असे असा गर्भितार्थ.

९८. रुक्मिणीचें शरीर असें गोरेपान होतें कीं तिच्या पाठीवरून रुळणारी वेणी पोटाकडून दिसत असे. पोटावरील रोमावळीवर कवीने ही कल्पना केलेली आहे. मस्तानीच्या सौंदर्याचें वर्णन करतांना, तिने गिळलेला पिंक तिच्या गळ्यांतून दिसत असे असें म्हणतात. तसेंच हें वर्णन आहे.

९९. **दीठि कुचंबैल** : दृष्ट लागेल. पाहणाराची दृष्टि जणु सुकुमार स्त्रियांना बोचते-खुपते. याच अर्थाने ' दृष्ट लागणें ' हा वाक्‌प्रचार वापरतात.

## प्र. १६

१०३. **सारा अखरांची जाणीं** : सारभूत अशा ( अथवा सर्व ) अक्षरांची जाणती. शहाणी.

१०४. **" आवसारिणीं** : भलता अर्थ जाणवीती " (टीप). गर्भितार्थ काढून दाखविणारी, असा टीकाकाराचा अर्थ दिसतो.

१०५. **गमक चाळिती** : आलाप घेणारी.

१०६. **ससिलेखी** हें शशिलेखा या शब्दाचें रूप. पहा : “ **आळि बोलती धाकुटे : विदावंतीसी** ” ( शिशु. ३५३ )

## प्र. १७

१०९. **कोल्हौरीचि जाली** : सभा ( सभेंतील लोक ) मातीच्या चित्रांप्रमाणे तटस्थ झाली. हा शब्द **कोल्हौरी** किंवा **कोल्हेरी** असाच नेहमी आढळतो. पहा : “ अथवा **कोल्हेरिचे** असीवार। ना तरि बोडंबरीचे अळंकार” (ज्ञा. ९–१७३.) ‘**कोल्हेरीचे** वारू। न येति धारकीं धरूं’ (अमृ. ७–४). **कोल्हौर** : गुप्त देऊळ, हाहि अर्थ महानुभाव वाङ्मयांत आढळतो.

१११. नखांनी ( बोटांनी ) तिचे कुरळे केस सारखे केले. तोंडावर येणारे केस सावरले.

११३. तिच्या कटाक्ष-तरंगांच्या मिषाने जणु यमुना नदी तेथे आली होती. कटाक्ष काळ्या रंगाचे व यमुनेचें पाणीहि काळ्याच रंगाचें, हें साम्य.

११४. **उलळत** : ( सं. उल्लोल. ) वेगाने इकडून तिकडे धावत.

११६. **होउनि** : होणें धातूचें भविष्यकाळी प्रथम पुरुषी अनेकवचनी रूप. प्र. पु. अ. व. रुपाच्या शेवटीं जुन्या मराठींत बहुधा ‘ **नि** ’ प्रत्यय येतो.उदा : ‘तऱ्हीं प्रेमाचा कडलगीं : **टाकुनि** कैवल्य दुर्ग ’ (उ.१६५)

११९. **कळाविदे नव्हेती** : सुकुमार व नाजुक राजकन्येचा उपभोग घेण्याइतकी शृंगार–कलेंतील कुशलता–रसिकता त्यांच्या ठिकाणीं नसते.

१२०. **कुआडेयाची आरिख गोष्टी** : भांडणाची गोष्ट अत्यंत आर्ष, असंस्कृतपणाची होय. अर्थात, विवाह–प्रसंगीं भांडणें होणें हें कांही शोभून दिसत नाही.

## प्र. १८

१३१. **सरादी-संगीत सुद्धाकरू** : सप्त–स्वरांनी आरंभ होणाऱ्या संगीत शास्त्रांतील सुधाकर. संगीत शास्त्राचा सर्वांगीण ज्ञाता.

१३२. चक्रवर्ती भीमकराजाकडे भेटायला आणले. अनेक राजांची वंशावळी व कीर्ति सर्वत्र पसरवणारा असल्यामुळे कल्याणकीर्तीला ‘ राजांचा कीर्तिरूपी सुगंध वाहून नेणारा मलयानिल ( सुगंधी वायु )’ असें म्हटलें आहे.

## प्र. १९

१३५. **मागतेयाचें** : टीप ग्रंथांत **मागधेयाचें** असा पाठ आहे, तोच अधिक अन्वर्थक वाटतो. **मागधेयाचे** : बंदीपुत्राचे, भाटाचें. **मागत**= मागध असाहि अर्थ टीप-ग्रंथांत इतरत्र दिला आहे.

१३७. **उचितीं वारिला** : योग्य अलंकार-वस्त्रें ( बक्षिसें ) देऊन संतुष्ट केला. **पुरेतेयाचा पाटु** : पूर्णत्वाचा ( सर्वगुणपरिपूर्णतेचा ) ओघ.

## प्र. २०

१३९. **मुग्धावयसा** ( मुग्धावस्था ) **महुरैली**. अथवा, **मुग्धा** ( अशी रुक्मिणी ) **वयसा** ( तारुण्याने ) **महुरैली**.

१४१. " **यथीचा नेणवे कल्प** = भीमकीया सौंदर्याचा : कल्प = कल्पग्रंथीचा आंत न कळे तैसें : दुसरें : कल्प = धनावर वज्रलीप लेहत : तेथील वीधान न कळतां लेपवंत् ठाकौनि राहे : तैसे सभावीं = सहजाचि डोळेयाचा वज्रलेप जाला : एवं नीगो न सकती. " ( टीप ).

१४२. **रासु येक** : पुष्कळ, अमर्याद. **प्रवृत्तिक** : मनाची ओढ घेणारें, आसक्ति निर्माण करणारें.

१४३. आदि-पुरुष श्रीकृष्णाची ही पत्नी होणार अशीं चिन्हें इच्या ठिकाणीं दिसतात.

१४५. **ठकला ठ ( ठा )कणें** : जागच्याजागीं आश्चर्यस्तंभित होऊन राहणें.

१४६. **देव** : राजे. याच अर्थाने हा शब्द या काव्यांत अनेकदा वापरलेला आहे. शब्द-कोश पहा.

१४८. **धुळ झाडी वन** : " धुळि आन झाडी : हे दोन्ही देश : राव जींतीले तयाचे : **सेजा** = सुख भोगावयाकारणें : भावें सेजा = पारकेयाचे जींतीले बंदीस्त " (टीप). शत्रूपासून भीमकाने जिंकलेले धुळ व झाडीवन या नांवाचे दोन देश शयनासाठी कल्याणकीर्तीला दिले.

## प्र. २२

१५४. **मधुवन** : पूर्वी मथुरा शहराच्या जागेवर असलेलें एक अरण्य. यांत मधु नांवाचा दैत्य राहत असे म्हणून त्याला मधुवन म्हणतात.

१५७. **सरता जाला** : मान्यता पावला.

१५८. **न पुरे** : टिकत नाही. **आइणि पुरे** : याच्या गाण्याने कमळ व स्वतुर यांची गायनांतील कुशलता संपते-नाहीशी होते (पुरे). **पुरणें** : संपणें, थांबणें. उदा : 'नातरि आयुष्य **पुरलें** आहे । तरि ॐ रवर्दिहि काहिं नव्हे.' (ज्ञा. २-६७.) '**कमळ आन स्वेतर** हे पाताळींचे गवई' (टीप).

१५९. नादलहरींच्या नद्या दुथडी भरून वाहतात.

१६१. गरुडापासौनि (पेक्षा) अधिक दीसे.

## प्र. २३

१६३. **गरुवतीं राहिला** : गंभीर होऊन तटस्थ राहिला. **गरुवती** : गंभीरता, गहनता. पहा: 'म्हणौनि महाकाव्यारा ॐ । ग्रंथु **गरुवतीचा** ठाॐ । एथौनि रसां जाला आहो । रसालपणाचा' (ज्ञा. रा. १-३३.)

१६४. **रातोत्पळौनियां** : रक्तकमळापासून **सैंभ** (स्वयंभू) **सपक्षु निगाला**.

१६५. **आठुवें** : भुजदंड. दोन्ही भुजदंडांना हिरे जडलेले होते. किन्नराच्या सर्व शरीरावर विष्णुमुद्रेंतील श्लोकांचे ठसे उमटवलेले होते. विष्णुभक्त (कृष्णभक्त) हरिनामाची अथवा ज्यांत हरिनाम गोवलेलें आहे अशा श्लोकाची मुद्रा तयार करून तिचे ठसे आपल्या शरीरावर जागजागीं लावतात हें प्रसिद्धच आहे.

१६७. किन्नराचें हें सौंदर्य कसें आहे-कसें अलौलिक आहे, याचें जर वर्णन करतां येईल तर, या किन्नराच्या रूपाचीच शपथ आहे.

## प्र. २४

१६८. **विदावंत** : कलावंत, गायक, किन्नराबरोबर त्याचे जे साक्षकारी-गायक होते त्यांच्याकडे त्याने पाहिलें.

१७१. किन्नराने आपल्या पायांत घातलेल्या तोड्यावर, त्याने जिंकलेल्या अनेक गवयांचीं चित्रें-मूर्ति (बाहुलीं) काढलीं होतीं. जिंकलेल्या व्यक्तींचीं चित्रें, पायांतील तोड्यावर कोरण्याची पद्धति असे. **आंगिक** : हे

कोणातरी गवयाचें नांव असावें. '**आंगिका नांवें** : गवै जींतुनि आनुसंगिक केले ते ' (टीप).

१७३. भोपळ्याला, वोतीव चंद्रकळेची, उंच अशी खाचण लावलेली होती. या नाभीवरूनच तारा खाली ओढलेल्या असतात. **नाभि** : भोपळ्याच्या मध्यभागीं असलेलें तारांना उचलून धरणारें टेकण. **उथाळी** : टोपणें.

## प्र. २५

१७५. **आसी अर्थौनि** : आशीर्वादाच्या श्लोकांचा अर्थ स्पष्ट करून.

१७६. मृगाचे डोळे अतिशय सुंदर असतात म्हणून हें रूपक.

१७७. '**आधाटिया** = एका तुबेयाचिया काठिया : **पहुरें** = कांतडेयाची : एवं नागसरासारीखीं वाजति : भावें मोहरी सादृश्यता : **निबंध**= निःशेषेसी बंधयुक्तें : **वाहो** = वाजवणें : **जंत्रें** = वाद्यें : **सुस (स्व) रें** = सुष्टु स्वरें करूनि : **वाति** = वाजवीति : वीणे ते : नागवीणा १ : ब्रह्मवीणा २ : ऋद्रवीणा ३ : परसवीणा ४ : **गमक आख (क्ष) रें**=आक्षराचे चढ उतार आन राहावे : **कंठी दाउनि** = आधीं कंठीं आक्षेरें उच्चारीती मग वीणयांतु : तथा वाद्यांत वाजवीति ' ( टीप ).

१७८. " **आंग**=गीत : **उपांग** = कंठीची आवृत्ति : **काहाळी** = सहनै : वंसकर = वेळवाचें वाद्य : तथा वश्य करणां = वश्य होति : तथा पावेकार : **श्रुतिकार** = श्रृतीधर : **मांदळी** = मृदांग " (टीप).

१७९. जंत्रें ( वाद्यें ) व गात्रें ( वाजवणाऱ्यांचीं शरीरें ) यांचें मोठें सुंदर मीलन तेथे दिसत होतें आणि त्यांत सप्तस्वरांच्या मिश्रणाने ( वेणी ) उत्तम गायन निर्माण होत होतें. किन्नर आरोह-अवरोहांनी युक्त असे आलाप ( गमक ) घेत असतांना निघणारा सुंदर ध्वनि ( सोवाणी ) आकाशांपर्यंत जाऊन भिडत होता. शिशुपाल-वधांत देखील नारदाच्या गायनाचें वर्णन '**गात्रा एंत्राचिया मिळणीं : सप्तस्वरा गुंफूत वेणी** : तेथ पातला भक्तासिरोमाणि : जवाळिकेसी ' (४४). असेंच केलेलें आढळतें.

१८०. **( तारी वरी )** तारेचें वाद्य वाजवून त्यांतून निषाद स्वर काढून वेदघोष ' शुद्ध ' संगीत उत्तम रीतीने गाऊं लागला. ' शुद्ध तें स्वर्गींचें गायन ' (टीप). स्वर्गीय गायन पद्धतीला ' शुद्ध ' संगीत म्हणतात असें टीपेवरून दिसतें. **निषाद** हा सप्तस्वरापैकी सातवा स्वर.

१८१. मृत्यु--लोकांत व पाताळ--लोकांत आजपर्यंत जें गायन (स्वर्गीय शुद्ध संगीत) नुसतें ऐकून माहीत होतें (केवळ नांवानेच माहीत होतें) तें किन्नरदेवाने यावेळीं मृत्युलोकांत प्रत्यक्ष आणलें होतें. (तें गायन कसें असतें याचा प्रत्यक्ष प्रयोग करून दाखविला होता. त्या दिवसापासून (भरत मुनीने निर्माण केलेल्या) स्वर्गीय संगीताचा अवतार या मृत्युलोकांत झाला व मानवांना तें ठाऊक झालें.

१८२. शुद्ध (स्वर्गीय) संगीताचें स्वरूप (आंग) व्यक्त करीत करीत उकलून दाखवीत असतांनाच तो किन्नर व त्याचे साथीदार ताळप्रबंधादि सहा प्रकार (षडांग) निर्दोष रीतीने गात होते.

१८३ स्वर्गांतील 'शुद्ध' संगीत गाइल्यानंतर किन्नराने पाताळां-तील संगीत गाइलें. 'संकीर्ण' हें पाताल-संगीताचें नांव. **कमळ** व **स्वतर** हे पाताळांतील दोन गवई. मदालसा नांवाची स्त्री सर्पदंशाने मृत्यु पावली तेव्हां कमळ व स्वतर यांनीं आपल्या गोड संगीताने तिला जिवंत केलें, असा कथासंदर्भ टीपकाराने दिलेला आहे. या संबंधीची मार्कंडेय पुराणांतील कथा पुढीलप्रमाणे आहे. शत्रुजित नांवाच्या राजाला ऋतध्वज नांवाचा मुलगा होता. एकदा डुकराचें रूप घेऊन आलेल्या पाताळकेतूच्या मागे लागून हा पाताळांत गेला. या पातालकेतूने विश्वावसु गंधर्वाची कन्या मदालसा हिला पळवून आणलें होतें. तिच्याशीं याचें लग्न झालें व तिला घेऊन हा घरीं आला. पुढें यमुनेच्या तीरावर राहणाऱ्या पाताळकेतूच्या भावाने तालकेतूने याला फसवून यज्ञाच्या दक्षिणेकरिता याच्या गळ्यांतील कंठा मागून घेतला व याला आश्रमांत ठेवून येऊन घरीं मदालसेला ऋतध्वज मेल्याची बातमी कळवून खुणेकरतां मरतांना कंठा दिल्याचें सांगितलें. मदालसा सती गेली. ऋतध्वजाने अविवाहित राहण्याचें ठरविलें. पण मुलाच्या इच्छेवरून **अश्वतर** नागाने सरस्वतीपासून गानविद्या मिळवून शंकराला प्रसन्न केलें व त्यापासून पूर्वीसारखी पण योगी मदालसा कन्या म्हणून मागून घेतली व ती ऋतध्वजाला दिली. तिच्यापासून विक्रांत, सुबाहु, शत्रुमर्दन व अलर्क असे चार पुत्र झाले व त्यांना मदालसेने योगमार्गाचा उपदेश केला. (मार्क. १८--३४) **प्राचीन चरित्रकोष.** यावरून **स्वतर** हें मूळ नांव **अश्वतर** असल्याचें दिसून येईल. अश्वतराच्या भावाचें नांव **कंबल** असून तो पाता-

ळांतील नागांचा अधिपति होता. **कंबला**चाच उल्लेख आपल्या कवीने **कमळ** म्हणून केलेला दिसतो. पण मदालसेला जिवंत करण्यांत या कंबलाचा कांहीच भाग दिसत नाही. **पन्नकें वर्धमान** : पाताळांतील सर्पांनी वाढविलेलें, उच्च पदवीला पोचविलेलें, असें तें संकीर्ण नामक संगीत किन्नराने मोठ्या कौशल्याने ( निगुती ) गाइलें.

१८४. मृत्युलोकीच्या गायनाला **साळांग** हें नांव. मग, किन्नराने मृत्युलोकांतील साळांग नामक गायनाच्या **आंगा रूप कैसे केलें**=त्या गायनाचें स्वरूप कसें उकलून दाखविलें ? **राग** : संगीतांतील विशिष्ट स्वरसमुदाय **रागांग** : कोणत्याही रागाचें शुद्ध शास्त्रीय स्वरूप. **उपांग** : त्या रागाचे निरनिराळे पोटभेद : **देशांग** : प्रांतपरत्वें किंवा देशपरत्वें त्या रागाचें निरनिराळें स्वरूप. **भाषांग** : त्यांतील भाषापद्धति. (अथवा देशाच्या निरनिराळ्या भागांतील प्रचारावरून बनवलेला राग यालाहि **भाषांग** म्हणतात) टीपकाराची टीप पुढीलप्रमाणे " **राग** = साराग : ६ : त्याच्या सा भार्या : ६ : ते **रागांग** : **उपांग** = ग्रामजाती : ३ **देशांग** = मुर्छना : **२१** : भात्रें देशांग = त्याच्या कन्या : एक एकाचिया सा सा : एवं ३६ : **भासांग** = देशभाशा भात्रें : भाषांग = ३२ : पुत्र तेचि श्रीरागाचे ६ : वसंताचे ६ : वरकडांचे ५:५ ऐसें "

१८५. : " **सात ताळ** : ते कवण : आदिधवा १ : माथा : २ : प्रतिमाथा : ३ : नीशारूका : ४ : आडताळी : ५ : राशा : ६ : एकताळी ऐसे सात ताल : **च्यारि साळांगे** : गायनाच्या साळा च्याराचि : उडाउ :१: खडाउ : २ : गमक : ३ : संपूर्ण : ४ : ऐसीं च्यारि साळांगें : **पन्नास रूपकें** : ताळासि रूप करिती तीयें रूपकें : धवा सोळा आक्षेरी : १ : माथा साता अक्षरी : २ : प्रतीमाथा सा अक्षेरी : ३ नीसारूका सा अक्षेरी : : ४ आडताळी सा आक्षेरी : ५ : एकताळी ती अक्षेरी : ६ : रासा सा अक्षेरी ७ : ऐसीं पन्नास रूपकें : ५० : तैसेचि ५० : सताळ : जैसा ब्रह्मताळ : १ : जैसा झंपकाय जातीचीं रूपकें : ५० : **आठ आंगें** : अष्टौ स्थानाणि वर्णानि पुरः कंठशिरस्तथा । जीव्हामुलंच दताश्च नाशिकोष्टौच तालुच : : १ : दुसरें : आठ आंगें : जैसें नमावळी चौंद (?) १ : जैसे रूपकाचौंद (?) : ऐसी आठ : हा शोध : **तीनि वर्ण** : तेचि कवण : एवं

काळा : १ : गोरा : २ : सावळा : ३ : **दोनि धृपदांग** : ताळांग १ : गणांग २ : **च्यार अभंग** सुभग : १ : सुप्रभ : २ : हरियाळ : ३ : ज्यामुक : ४ : एवं च्यारि आभंग : " ( टीप ).

**१८६. तिहीं मार्गी** : शुद्ध, संकीर्ण व साळांग. **गीतसुड**= पवाडा. ज्या विशिष्ट छंदांत त्या विजयगीताची रचना केलेली होती तो छंद गाऊन झाल्यावर त्याचें धृपदावर ( अकड कडवें ) **ताल ठेविला** = धृपदच तालांत गाऊं लागला. अंतरा गाऊन झाल्यावर केवळ अस्ताई म्हणत राहिला.

**१८७. सपोत** : पोतेंसह वर्तमान : एवं रगवीली ' ( टीप ) **मागिलां धूरांवरी** : त्याच्या मागे उभ्या असलेल्या श्रुतिधरांबरोबर; त्यांच्या साह्यानें.

## प्र. २८

**१८९.** दाडिंबाचें फळ सामग्र्येंकरून तर रसाळ असतेंच, पण त्यांतील प्रत्येक बी देखील सरस असते; त्याप्रमाणे रुक्मिणी-स्वयंवर हा संपूर्ण ग्रंथ तर रसाळ आहेच पण यांतील अक्षर न् अक्षर रसयुक्त आहे! **येउतें** = कडे, बाजूला. पहा ' तियां झाडा **एउतें** जेयां पाहाति। ते कल्पवृक्ष ' ( ज्ञाने. रा. ९-३७१ ). ' ऐसें अर्जुना **येउतें** सर्वेश्वरें। पाहोनि बोलिलें अत्यादरें ' ( ज्ञाने. १०-५२ )

**१९१.** ही सकल सृष्टि हा जिचा अवतार आहे, ती परब्रह्म परमेश्वराची आदिशक्ति किती सुंदर ( सरूप ) आहे म्हणून सांगूं ? तथापि तीहि रुक्मिणीची शोभा ( वोप ) पावूं शकत नाही. रुक्मिणीच्या सौंदर्याचें तेज तिच्या ठिकाणीं नाही. **ते** ( आदिशक्ति रुक्मिणीपेक्षा ) **आरीख** ( आर्ष ) ओबडधोबड ) व **अपाडें** ( तुलनेला अयोग्य होय. )

**१९२. जाइलेंपण** : जिवंतपणा; जिवंत असल्याचें सार्थक. सौंदर्याच्या जिवंतपणामुळे ( अप्रतिम सौंदर्यामुळे ) पार्वतीचीं स्तुतिस्तोत्रें गाइलीं जातात; ( आणि म्हणून रुक्मिणीच्या सौंदर्याशीं तिची तुलना करतां येईल ); पण ती पर्वताची कुमरी ( अर्थात्, वन्य स्त्री, जंगली ) अतिशय रागावणारी असल्यामुळे, वारिली ( दूर सारली; अर्थात्, रुक्मिणीशीं तुलनेला ती टिकूं शकत नाही ). पार्वती रागीट असल्यामुळेच तिला **चंडिका** हें नांव प्राप्त झालें आहे.

१९४. शंभर यज्ञ केल्यानंतरच इंद्रपद मिळूं शकतें ( म्हणूनच इंद्राला शतक्रतु असें म्हणतात ) व इंद्रायणीच्या सौंदर्याचा उपभोग घेतां येतो, ही कल्पना या ओवीच्या मुळाशीं आहे. **सहस्रां डोळां भोगिजे :** इंद्रायणीचें सौंदर्य इतकें अमर्याद आहे की, केवळ दोन डोळ्यांनी तें पाहतां येणें शक्य नाही. म्हणूनच की काय, तें सौंदर्य पिऊन टाकण्यासाठी, इंद्राला हजार डोळे धारण करावे लागतात ! **न सूजे :** शोभत नाही. **मोलावली म्हणौनि :** तिची बाजारांत किंमत लागली म्हणून. शंभर यज्ञांचें मोल देऊन कोणालाही इंद्रायणीचें सौंदर्य विकत घेतां येते. ( तसें रुक्मिणीचें नाही ).

१९५. **सारां अखरांची :** सप्तस्वरयुक्त अक्षरांची, ( अर्थात् गायन कलेंतील सर्व अक्षरांची स्वामिनी ). **आइणी :** अभिमान.

१९६. **देव-नळ :** दमयंती-स्वयंवर प्रसंगीं इंद्र, वरुण, यम व अग्नि या चार देवांनी नळाचीं रुपें धारण केलीं होतीं, म्हणून नळ-स्वरूपाने असलेले देव. (२) देव-नळ = बोरू, गवताची एक जात. हा श्लेषहि येथे अभिप्रेत आहे. **प्रियें सांडिली :** नळ आणि दमयंती वनवासाचे कष्ट भोगीत असतांना नळाने दमयंतीला तिच्या माहेरचा ( विदर्भ देशचा ) मार्ग दाखवला व एके रात्रीं तिला सोडून तो निघून गेला, हा कथाभाग येथे अभिप्रेत आहे.

## प्र. २९

१९७. " **हाता-तोंडाचीं उपाळिगें :** इंद्रासि सहस्र भुजा : आन महेशासि पांच सीरें : तीन नेत्र : यणें उपलक्षें जाणावीं " ( टीप ).

१९८. जणुं त्यांत पिशाच्यांचा संचार झाल्यासारखे डोळे. **निमिषोन्मिष** = उघडझाप. देवांच्या डोळ्यांना उघडझाप नसते. ते एकसारखे उघडेच असतात, आणि म्हणून पिशाच्च-बाधा झाल्यासारखे दिसतात.

१९९. यज्ञांतील आहुतींसाठी देवांची नित्य धडपड लक्षांत ठेवून ही ओवी वाचावी. देवांचें असेंच वर्णन भास्करभट्टानेहि केलेलें आहे. पहा : ' लोकांचा सारवीला उंबरा देखती : तरी एका सिताची आस करीति : ते दैन्य काई फेडीती : मागतयांची " (शिशु. १५०).

२००. **सविंजडें : विज्जुल** (स) = दालचिनी. त्यापासून विंजड. **सविंजडें :** दालचिनीसारख्या आहुति-द्रव्यांनी युक्त ( असे तृणदर्भ

२०२. देवांपेक्षा अनेक गुणांनी मानव श्रेष्ठ आहेत, म्हणूनच देव-कन्यांनी मानवाशीं विवाह केले आहेत. **पुन** (परंतु) **यथिचीं** (मर्त्यलोकीच्या कन्या) **अमराचिये घरवातें** (देवांच्या स्त्रिया म्हणून) **ने टकेति** (ठाकत नाहीत, घराच्या वाऱ्याला देखील उभ्या राहत नाहीत.)

२०३. जिवंत नवरीला स्वर्गांतील सासर (श्वशुरगृह) कशाला सांगावें ? मेल्यानंतर स्वर्गाला जावें लागतेंच; पण जिवंतपणींच एखादीला स्वर्गांतील सासरीं पाठवणें (स्वर्गाला धाडणें, या सारखें मोठें पाप नाही ! अर्थात्, रुक्मिणीचा देवांशीं विवाह म्हणजे जिवंतपणींच तिला स्वर्गवास घडवणें आहे !

## प्र. ३१–३२

२०९. **घेपे ना दीजे** : तेथे (सप्तद्वीपांत) घेण्यादेण्यासारखें कांहीच नाही. तिथले सगळे राजे आकृतीने अगदी ताडासारखे आहेत.

२१०. **सहास** : सहस्र या संस्कृत शब्दाचा अपभ्रंश. पहा " जय-सिरिणिवासाइं । किंकर**सहासाइं** ' (किंकर**सहस्रै** :) (णायकुमारचरिउ. २–२–३) 'थम्हाण **सहास**हिं ज पि धारि .' (करकंड चरिउ. ४. ४. ३) **येरि उत्तरे** : जंबुद्वीपाच्या उत्तर बाजूला.

२११. जंबुद्वीपाच्या उत्तरेला पण स्वर्गाच्या उंबरठ्याच्या अलीकडे गंधर्वांचें वसतिस्थान.

२१२. **तितर-व्रर्ण तेजी बरवे** : तित्तीराच्या रंगाचे, तेजःसंपन्न (तेजी) व चांगले. **तेजी** या शब्दाचा घोडा अर्थ घेऊन येथे चालत नाही. आणि तो अर्थ घेतला तर घोड्यांचीं तोंडें असलेल्या किन्नरांना उद्देशून तो लावाला लागेल. पण ही ओवी गंधर्व, किन्नर व विद्याधर या तिन्ही देवसदृश गायक-योनींना उद्देशून आहे.

२१३. या व यापुढील ओव्यांत आलेल्या निरनिराळ्या स्थळांची माहिती स्थलसूचींत पहावी. **न लहाति अवसरू** : ज्याच्या सेवेची संधी देखील गंधर्वांच्या बटकींना (वेश्यांना) मिळत नाही. टीपकाराने **बटकी** = कन्या, असा अर्थ दिलेला आहे. तोहि येथे शोभून दिसतो.

२१४. **देवान्नेया** : इंद्रचंद्रादिकांच्या (विदावंताचा देशकु).

२१५. ' **रिखी** ते द्वीप : तथा दो ती रिकीबिचे घोडे ' ( टीप ). रिखी नांवाच्या बेटांतील घोडे दुरंद राजाजवळ आहेत.

२१७. हा ' उत्तर-कुमरू रावो ' कोणत्या देशचा तें या ओवींत आलेलें नाही. याचें वर्णन पुढील ओवींत पहावें.

२१८. या राजाचें शस्त्र हें गंगेपेक्षादेखील पवित्र होतें. कारण गंगा-नदींत बुडालेल्या उत्तम माणसाला देखील नुसती आधोगती (तळाशीं विश्रांति) प्राप्त होते, पण याच्या शस्त्राने जो खाली पडेल ( पतित = पापी, असा श्लेष) त्याला मात्र एकदम सर्ग ( स्वर्ग, अर्थात् ऊर्ध्वगती ) प्राप्त होते.

२१९. **सेळंद्री** : ( सैरंध्री या संस्कृत शब्दाचें रूपांतर ) दासी. **सेलद्रीया** आणिति अनेक अलंकार ' ( धपू. ७३ )

२२१. त्यांच्यांतील एकेकाशीं शंकर ( अथवा, अठरा रुद्र ) आपल्या सगळ्या सैन्यासहित भांडायला आला तरी ते पुरून उरतात.

२२२. **भद्रजाति** : ही हत्तींची एक जात आहे. **निहे विसंवति आकासीं** : त्यांचे आवाज (निहे)-गर्जना-आकाशांत विश्रांति घेत असत : आकाशापर्यंत पोचून तेथेच विराम पावत. पहा : ' येतु चक्रपाणी तुरांचा गजरीं । ते **निहे** अंबरीं उठीताती ' ( मारु ३१ ).

२२३. खांडियाचा धारसा ( धारेने ) क्षेत्री वेंझ घेती ( झगंटणी-सरशीं मरून पडतात ).

२२५. कस्तुरीची माती पसरलेल्या तालिमखान्यांत एकमेकांना युद्धाची शिकवण ( अभ्यास, तालीम ) देतात.

२२६. दाक्षिण दिशेचा राजा हाच काळ, त्याचें दमन करणारा.

२२७. ज्याच्या प्रतापरूपी अग्नीपुळे देवांचीं शस्त्रें भाजलीं (तापलीं) व आटून ( त्यांचा लोहरस होऊन ), त्या लोखंडाचे " खुरासन देशीचेया घोडियांसि नाल बांधले : भावें खुरासन नगर तेथील तळें बांधलें ? टीप).

२३०. ज्या राजाच्या बाणरूपी डोळ्यांनी इंद्राच्या नंदनवनावर हल्ला चढवून तेथील दिव्य पुष्पें आणलीं आणि दत्तात्रेयाची पूजा केली.

२३२. एरवीं मांसासाठी रण-देवतांचीं भांडणें चालायचीं, पण कौरव-रायाच्या खाड्यापुळे शत्रूंचा व त्यांच्या सैन्याचा एवढा संहार होतो की, रणदेवतांना मांसाची मेजवानी मिळते; त्यांना भांडावें लागत नाही. त्या

मेजवानींतील, नर, तुरंग ( घोडे ), गज, सिंह इत्यादिकांच्या मांसांचे स्वाद फुडें (प्रगट रीतीने) सांगतां येत नाहीत. ( कारण सगळ्यांच्या मांसांचा काला होतो ) **संवाद :** ऐवजी **स्वाद** हाच पाठ घ्यावा. टीप-ग्रंथांतहि तोच पाठ घेतलेला आहे.

**२३३. खोदें :** धुंडाळून धुंडाळून ( समुद्राचा झाडा घेतला ); समुद्राजवळचीं सगळीं रत्नें झाडून घेतलीं. **अखंड :** जोड न लावतां. **नांदिये :** नंदीच्या प्रतिमा ( शंकरासमोर ठेवावयाच्या ).

## प्र. ३३

२३७. सूर्याप्रमाणे बाण ( बाणासुर ) हा देखील सहस्र करांचा ( हजार भुजांचा ) होता. **सूर्यावरी** ( सूर्यापेक्षा अधिक, त्याहून वरचढ ) **बिरिदें** ( ब्रीदें, पराक्रमाचीं चिन्हें ) **बोले.**

**२४१. जयाचा** ( कर्णाचा ) **बापु :** सूर्य. **दाताचेनि वडपें** (वृद्धोपुळे) **राय रेवलें** ( बुडून मेले ).

**२४३. मागधातें** ( मगध देशाचा राजा जरासंध त्याने ) **प्रजितां** ( परजलें, शस्त्र उपसलें म्हणजे ) **खांडेयाचें पाणिपद** ( घाट, तीक्ष्णता **उजळे** ( अधिक तीक्ष्ण होते ).

**२४४.** आपल्या कीर्तिरूप कलांचें वर्षासन ( खंडणी ) चंद्रापासून घेतलें ( मिळविलें )

**२४५.** अरिरायांचे मिशांचें **पाबळ** ( अरण्य ) वनत्री.

**२४९.** विश्वेश्वराचा ( श्रीशंकराचा ) प्रासादु ( मंदिर ) बाबनेयाचा ( चंदनाचा ) केला.

**२५३.** " **अश्वमेधीश्वर :** आश्वयज्ञ केला म्हणौनि ईश्वर : तयाचें बरवेंपण आइकौनि वीरह संचरले : मावें राजे मारीले : तेणें व्याकुळ केलीया. ( टीप )

**२५४.** ज्याच्या घावासमोर वज्राचाहि टिकाव लागूं शकत नाही.

## प्र. ३४

**२५६.** आग्नेय दिशेच्या अंगरागाप्रमाणे असलेला; आग्नेय दिशेला शोभा प्राप्त करून देणारा ( रक्तध्वज ). ज्याच्या कीर्तिरूपी चंद्रामुळे ( अमृत-

वर्षाव करणारा म्हणून ) अनंग ( अंगविरहित मदन ) साजिव (जिवंत होतो.)

२५७. त्रिमूर्ति राजाचा त्रिकाळ नांवाचा पुत्र.

२५८. **मेखळा** हें गावाचें नांव. रत्नरथ राजाचा चंड नांवाचा पुत्र.

२६०. **ब्रीदें बोलें** : पराक्रमाचे पोवाडे वर्णन करतो.

२६२. "**सळें**=अभिमानें : **जोति**=बोंडणबावी : आन देउळें केलीं : भावें जोतिलिंगासि : सीद्धवटिका ते देवता : तीपुरुष ब्रह्माविष्णु-महादेव : "

२६३. टीपेंत देखील **कांतिये येउनि** असा **कखम** प्रतींतील पाठ आहे. तेव्हां तोच पाठ घेणें इष्ट. ' खड्गायुधे कांतिये येउनि बिभीषणा भाट धाडिला. ' असा अन्वय.

२६५. कावेरी नदीजवळील ते **कावेर**. आकाशाला लोखंडाचा घाट बांधून आकाशांतील देवांचे ( खेचरांचे ) घोडे आणले.

२६६. देवांचे खाजिने लुटून आणून ते भिकाऱ्यांना दिले. मागते ( भिक्षा मागणारे, त्यांना ) **वेव्हारे केले** ( व्यापारी करून सोडले. )

२६७. ' गुर्णीद्र ऐसा देस ' ( टीप ). **कम** प्रतींतहि असाच पाठ आहे. तो ( संकसेखरू ) गुणीं इंद्र किंवा गुणींद्र; आणि देशिचा मेरु=आपल्या देशाला मेरुपर्वताप्रमाणे (सोन्याचा, संपत्तिमान) आहे, असा अर्थ.

**महिमंडळ** महामंडळ या अर्थी तो शब्द योजलेला असावा. **द्वादस आदित्य** : धाता मित्रोऽर्यमा रुद्रो वरुणःसूर्य एवच । भगो विवस्वान् पूषाच सविता दशमः स्मृतः । एकादशस्तथा त्वष्टा विष्णुर्द्वादश उच्यते ॥

२६८. **फणिमणि** : फणींद्र नागश्रेष्ठ. शत्रुरूपी हत्तींच्या गंड-स्थळांतील मोत्यांनी ( मोतियां अरि-गजांचां ) देवांची पूजा केली.

२७०. ' खड्ग लक्षणें वीज : समरीं=संग्रामीं : गाजतिसे=हस्तीची कींकळी तल्लक्षेणें मेघ : गाजति=गर्जति : आन तयांचें रुधिर गळे : तल्लक्षेणें मेघ धारा वर्षति : आन मस्तकींचीं मोतें नीगति : तल्लक्षेणें थोर गारा वर्षति : ' ( टीप ).

२७१. 'दंडकी : दामोळी : हें दोन्हीं नगरें : सांघणी=घालणी : मासें देउनि तया रण-जखिणीचां नवस पुर्ण करीती : ताडवनेसीं=तानवडा ( कर्ण-भूषण ) सहीत वेणीया तीर्थी वाहाति : एवं वैधव्य आलें म्हणौनि ' ( टीप)

२७२. '**दैत्य-देव–कन्यांसी**' असें पाहिजे. दैत्यांच्या व देवांच्या कन्यांना वियोग घडवितात. ( हाथियेर हा कर्ता ).

## प्र. ३५

२७४. ' चौदासें **सींगळें**=चौदासें गावें : **सींगळ**=पींगळ दीप ( टीप ). द्वीप या अर्थी **वेळाउळ** शब्द आलेलाच आहे. शिवाय, सिंगळ ( सिंहलद्वीप ) हें पश्चिम बाजूला नाही. तेव्हां **सींगळ** शब्द **गाव** याच अर्थी घेणें अधिक चांगलें.

२७५. दाक्षिणेकडील **महिमेचेयां रायांचा** ( महिमायुक्त, श्रेष्ठ राजांचा ) **सनाहो** ( नाथ ).

२७७. 'सुवर्ण–पागारी तें नगर : चंद्र जींणें=चंद्रातें जींतीलें: तें कैसें : **माजी** डोळेयाचेया यसाचा=डोळेयामाजि यस : एवं डोळे सुंदर : आन देखे तो वेस्य होये : आन सुखी होय : म्हणौनि चंद्रातें जीणें=एवं पूर्णमे पुर्ण होय आन आमवाशेस तुटे म्हणौनि : कोळगिरी तो पर्वत ' ( टीप ).

२७८. **इंद्रायेणी धाकुटी** : इंद्रायणीची दासी. **कीर्तिधवळ** हें विजयाचें विशेषण.

२८२. **अभीरकार्तिकाचा** हा एक शब्द वाचावा.

२८३. **कामनेवीण** : इच्छा केल्याशिवायच दान देणारा, म्हणून.

२८४. जो जयाचां विलोळीं ( विजयोत्कर्षाच्या भरांत, ) वैरी–वधु आसुआंचा काजळीं ( आधी ठार मारलेल्या शत्रूंच्या स्त्रियांच्या डोळ्यांतील अश्रूंबरोबर ओघळलेल्या काजळाच्या शाईने ) राजादेश ( आपली राजाज्ञा, आज्ञापत्र ) लीहूनि धाडिजे (व) सप्तांगें आणवि ( एकतर युद्धाला उभे रहा नाहीतर आपलें सप्तांगासहित राज्य आमच्या स्वाधीन करा, असें आज्ञापत्र पाठवीत असे. अर्थात् ते शत्रु सप्तांगराज्यच त्याला अर्पण करीत ).

२८५. राजांच्या कपाळपट्टीवरील ( भवितव्यतेच्या ) रेषांचीं पानें फाडून तेथे ( आपल्या शस्त्राच्या साह्याने ) रंग ( वाति ) भरतो ( अर्थात् रक्ताचे रंग ). पवित्रें चतुर्भुजें ( चतुरंग सैन्यासह असलेल्या ) खड्-विचित्रें–हा कर्ता.

२८६. **अरीराय** शत्रुपक्षाचे राजे हेच हत्ती; त्यांच्या दातापासून बनवलेल्या धनुष्याने. ( आणि बाणांनी ).

२८७. **शोभाचें सैन्यः** शोभ नांवाच्या राजाचें सैन्य. त्याच्या मोठेपणाला योग्य ( तुल्यबल ) अशी नवग्रहांची कांटाळी ( नवग्रहांचें पासंग देखील ) नव्हति. अर्थात्, नवग्रह एका ताजव्यांत घालून दुसऱ्या ताजव्यांत याची थोरवी घातली तर तीच जड होईल.

२८८. **डोळेयाचा ढाळु** : ( रुक्मिणीच्या ) डोळ्यांचा रागरंग. त्यावरून त्याने ओळखलें की आपण वर्णिलेल्या राजांपैकी एकहि जण हिच्या मनास आला नाही, हिला आवडला नाही.

## प्र. ३६

२९०. **गौडिया** : गौड रागाला (रूप केलें). **वैष्णवी** : विष्णुमुद्रा धारण करणारा; तो किन्नर.

२९३. ज्याच्या शस्त्रांमुळे आकाशाच्या अंगावर देखील काटा उभा राहतो. **कांटाळे :** पहा "सर्वांगा **कांटाळा** आला। अति संताप उपजला" (ज्ञाने. १–१९७). **ओळगतेयाचां** ( सेविकांच्या ) **छत्रीं** ( त्यांनी श्रीकृष्ण-बलरामावर धरलेल्या छत्रांमुळे ) **तयातें** (श्रीकृष्णबलरामांना) **रात्रिदीसु नेणिजे.** परब्रह्मपरमेश्वराजवळ अथवा त्याच्या अवताराजवळ, सर्व देवतांचे अवतार सेवेसाठी असतात, त्यांना ओळगण्या असें म्हणतात. (ए. व. ओळगणी).

२९४. तयाचा ( बलरामाचा ) मुखचंद्र, सांतीयाचा ( ओळगण्यांनी वर धरलेल्या छत्रांमुळे पडलेला ) अंधार बखली ( नाहीसा करी ).

२९५. एकदा रागावल्यामुळे बलरामाने आपल्या नांगराने हस्तिनापुर ( व पर्यायाने भू गोल ) वर उचललें होतें, या कथेचा येथे संबंध आहे.

२९७. **अनुजावो** : छोटासा वार ; हलका घाव.

२९८. श्रीकृष्णमाहात्म्य वर्णन करणारे वेद, त्याचें भाट (नागारी) जाले.

## प्र. ३७

२९९. ब्रह्मादिकांना देखील देवाच्या ( श्रीकृष्णाच्या ) भेटीची संधी (अवस्वर) मिळत नसे. २१३ वी ओवी पहा.

**३००. एका गुणाचेनि पासिकें** : आपल्या अनंत गुणांपैकी केवळ एका ऐश्वर्यगुणाच्या बंधनाने. (२) केवळ एका दोरीच्या पाशांत.

**३०१.** त्रैलोक्य हें जिचें (खेळांतील) घरकुल आहे, त्या बाइलेला (स्त्रीला, देवीला, मायेला) देखील ज्याचें थोरपण ओळखतां येत नाही. त्रैलोक्याला व्यापून असलेल्या मायेच्याहि पलीकडे परमेश्वरस्वरूप आहे.

**३०३.** श्रीकृष्णाच्या प्रतापाग्नीमुळे आहाळलें गेलें म्हणून आकाश कायमचें काळें झालें; त्या प्रतापाग्नीमुळेच सूर्याचा ताप अत्यंत तीव्र झाला.

**३०५.** ' पर्वाचा = पर्वकाळ : सर्वग्रासीं = पूर्णमे चंद्रासि आन अमवस्ये सूर्यग्रहण लागे : मग त्याकाळीं दान दीजे : तैसें दान = लीळादानाचीं फळें : अंतौरिया = स्त्रिया : तयाचे रासी आलें : वैधव्य : मग ताडवनें तेजीत : तेंचि खर्ग-धारे वाहाणें. "

**३०६.** शापभ्रष्ट यमलार्जुन हे वृक्षांच्या स्वरूपांत गोकुळांत वाढले होते. उखळ-बंधनानंतर श्रीकृष्ण उखळासहित या वृक्षांच्या मधून गेला तेव्हां ते उमळून खाली पडले (शापमुक्त) झाले, हा कथासंदर्भ.

**३०७. " वोसाइली**=वोल साइली : एवं दीप अंकुराची : तल्लक्षणें माया " ( टीप ).

**३०८.** कालिया सर्पाला वेसण घालण्याच्या मिषाने श्रीकृष्णाने जणु प्रत्यक्ष काळाच्या पाठीवरच थाप मारली होती.

**३०९. ' लागें एकें** : एकें लीळें ' ( टीप ). एक चमत्कार करून. ब्रह्मदेवाने गोकुळांतील गोपवासरादिकांना लपवून ठेवलें होतें. त्यावेळीं श्रीकृष्णाने नवीन गोपवासरें आपल्या मायेने निर्माण करून गोकुळांतील व्यवहार सुरळीत चालू ठेवले, हा कथा संदर्भ.

**३१०. दाढेले** : जळाले. **उभयांचि** : उभ्याउभ्याच; सहज

**३११.** सांदीपनीचा मुलगा पंचजन दैत्याने लहानपणींच पळवून नेऊन समुद्रांत ठेविला होता. सांदीपनीच्या पत्नीच्या आज्ञेवरून, गुरुदक्षिणा म्हणून श्रीकृष्णाने तो त्यांना, पंचजनाचा नाश करून, परत आणून दिला. " मृत गुरुपुत्र आणिला । तो तुवां पवाडा देखिला ।" ( ज्ञाने. २-१६३ )

**३१२. दादुलेपण**=पुरुषार्थ, पराक्रम. **वोसरोनि** : मागे सरून.

**३१३. अंशुकळा** : आपल्या सामर्थ्याच्या अंशमात्र कळेने.

**जमुना केली दो भागीं :** श्रीकृष्ण जन्मानंतर वसुदेव त्याला गोकुळांत घेऊन जात असतांना यमुना नदीला पूर होता. पण श्रीकृष्णाच्या पायाचा स्पर्श होतांच यमुना दुभंग होऊन त्यांना वाट मिळाली.

**३१४.** समुद्रमंथन–प्रसंगीं रवि म्हणून योजलेला मंदर पर्वत बुडत असतांना परमेश्वराने कच्छावतार घेऊन तो आपल्या पाठीवर उचलून धरिला. **भूगोळ** हा शब्द केवळ अतिशयोक्तीने वापरलेला आहे.

**३१५. वाराहाची आवगणी :** वराहाचा ( डुकराचा ) वेष; वराहावतार. हिरण्याक्ष दैत्याने पृथ्वी पाताळांत दडपली तेव्हां परमेश्वराने वराहावतार धारण करून तिला आपल्या दातांनी वर उचललें. **गोवर्धन उद्धरिला :** श्रीकृष्णाने इंद्रयाग बंद करून गोवर्धन याग करवला, या कारणाने रागावलेल्या इंद्राने गोकुळावर खूप पर्जन्यवृष्टी केली. तेव्हां श्रीकृष्णाने आपल्या करांगुलीने गोवर्धन पर्वत उचलून धरिला व त्याच्या आश्रयाने सर्व गोकुळ सुरक्षित ठेवलें.

**३१८. सप्तांगेसीं :** 'स्वाम्यमात्यसुहृत्कोषराष्ट्रदुर्गबलानिच' हीं राज्याचीं सप्तांगें होत. ( स्वामी, अमात्य, सुहृत्, कोष, राष्ट्र, दुर्ग, बल ). आपल्या दातृत्वाच्या पुरांत सर्व राजांना सप्तांगासहित वाहवून श्रीकृष्णाने जी कीर्ति मिळविली तीच आकाशाच्या शासनपत्रावर (आज्ञापत्रावर) तारकांच्या अक्षरांनी लिहिली आहे. **तारकाक्षेरें**=( १ ) तारकांचीं अक्षरें, अथवा (२) तारक ( तारणारीं ) अशीं अक्षरें.

## प्र. ३८

**३२२.** कमरेचें ( माजाचें ) सौंदर्य काय वर्णन करावें ? **घणवट कढिवा :** भरीव व पीळदार असे नितंब ( **कढिवा :** कटि जवळचा भाग ) मदनसुखासि माजवण करिताए. ( पहाणारांच्या मनांत शृंगारभाव उचंबळून सोडतात ). **काढिवा**चा अर्थ कटिमेखला असाहि घेतां येईल.

**३२४. उसासी :** भोसकतो, नाहीसें करतो. पहा : 'मग देहा धवळिया : आंतु रीगोनि बाळिया : विण सुरीया : **उसासी** जीवनकळेतें' ( उ. ५२५ ) 'वैसिकांचा पाशीं : हे बांधौनि **उसासी**' ( उ. ७५१ ) **ली पुसी :** लिपी पुसून टाकतो पहा : 'आधीं कर्त्याचीचि जेथे

**ली पुसिली ।** तेथे कार्य कारण काइसें ' ( स्वा. दि ८-३, ७६ )

३२५. **'मांजौळें** : ऱ्हस्व ना दीर्घ : एवं युक्त' **माजबळें**=मध्यम.

३२६. नीलकमळांची सर्व शोभा ( लक्ष्मी ) सेवेला आली ( वोळगे ).

३२७. **दिहा दिहा तुटे** : दिवसेंदिवस खंगतो, क्षीण होतो. श्रीकृष्णाचें मुख आपल्यापेक्षा सुंदर आहे या लाजेने चंद्राचें हृदय (हियें) जणु कळाक्षयाच्या रूपाने फुटतें.

३२८. श्रीकृष्णाच्या कटाक्षांच्या धारेमुळे ( तीक्ष्णपणामुळे ) वेध ( आवड, आसक्ति ) रूपी वळसा ( मोवरा ) निर्माण होत असे.

३२९. गालांची शोभा व हास्याची चंद्रिका यांचें आलिंगन ( कवळी ) होतें; यांचें सुंदर मीलन होतें.

३३०. चंद्र-सूर्य **भासळेति** ( लुप्तप्रभ होतात. )

३३२. त्याच्या बोलण्याच्या माधुर्यापुढे अमृताची गोडी ही मोल-करिणीप्रमाणें ( सेविका ) होय; कुचकामाची होय !

३३३. त्याचें सौंदर्य, **रत्नातें वरिवं घे** : रत्नापेक्षा अधिक श्रेष्ठ-पणा धारण करतें; अर्थात् रत्नापेक्षा अधिक श्रेष्ठ असें तें त्याचें सौंदर्य. तें सौंदर्य पाहून, पाहणारे पशुपक्षी देखील, चित्राप्रमाणें तटस्थ ( लेपीव ) होतात. ( मग, अर्थात्, माणसें होतील यांत काय नवल ? )

३३४. ' **पेतार** = अधिकतर : भावें उचंबळ ' ( टीप ). तिहीं लोकिचिया ( कुमारी, तापसा, दीक्षिणी वगैरे ). रिंगों पांति.

३३६. **माधवी** : श्रीकृष्ण-प्राप्तीसाठी तप करणारी कोणी एक कुमारी. **मी दीजैन** : मी दिली जाईन; अर्पण केली जाईन.

३३७. **काळंदी** : कालिंदी. ही पुढे श्रीकृष्णाच्या अष्टनायिकांपैकी एक नायिका झाली. **साविया** : सहजच; निसर्गतःच.

३३८. विवाहित स्त्रिया, आपल्या नवऱ्याबरोबर संभोगसुख अनुभवीत असतां, जणु श्रीकृष्ण आपला उपभोग घेत आहे, अशी कल्पना मनांत करीत.

३४०. **मदन-मुद्रा** : रुक्मिणीच्या विदावंतांपैकी ( गायकगायिकां-पैकी ) एक नृत्यांगना.

३४२. रुक्मिणीच्या सौंदर्याला अनुरूप नोवरा जोडायचा असेल

तर याच एका **ईश्वराला** ( श्रीकृष्णाला ) आराधना केलेली चांगली !

## प्र. ३९

**३४४.** चंदनाची कुवारी ( कोवळी ) आवधि ( वेल ).

**३४६.** उत्तरार्धांतील भिन्न पाठांमुळे अर्थ निश्चित करणें कठीण आहे.

**३४७.** राग व रंग ( उत्कर्ष ) यांची **विनी** ( गुंफण, संमीलन ) नवल ( आश्चर्यकारक ) ! रंगांत रसांचा ( नवरसांचा ) जिवंतपणा आणि रसांत अलौकिक गोडीचा समूह, हें सर्व अनुपमेय आहे !

**३४८.** या किन्नराचें, **सुभेद** (गायनांतील निरनिराळ्या भेदांसहित) **गातें अंग** ( गायन करणारें याचें शरीर, किंवा गायन करणारा हा किन्नर ) **सत्यलोकापासुनि** ( पर्यायाने सत्यलोकांतील नारदादि गवयांपेक्षा ) **साधु** ( श्रेष्ठ ) **दिसे. ब्रह्म-कटाह** : ब्रह्मांडरूप कढई. **सपोत** (बारीक, मृदु) अशा **कुंकुमाचा** ( केशराचा ) होत असे.

**३४९. ठकली** : आश्चर्याने तटस्थ बनली. **पायारी** : पायऱ्यांनी.

**३५३. छत्र कापुरू** : कापरासारखें धवल-वर्णाचें छत्र.

## प्र. ४०

**३५६.** तूं दान द्यायला लागलास म्हणजे सोन्याचा पर्वत संपून जातो. आणि पृथ्वीवरील इतर राजे तर तुझ्या खड्गाच्या मुठीच्या ठिकाणीं आहेत, अर्थात् ते सगळे तुझ्या मुठींत आहेत. त्यांच्याजवळील सर्व ऐश्वर्य जणुं तुझ्या मुठींत सामावलें आहे. तितकें दान देण्याचें सामर्थ्य तुझ्या एका मुठींत आहे असा भाव. " मुठी = मुष्टी : एवं सकळ राजे ऐश्वर्येकरुनि मुष्टीचि आंत कां जैसे : ऐसें आधीनत्वें वर्तति : " ( टीप ).

**३५७.** अपकीर्तिरूपी डोहांत असलेल्या कुटी ( हीनत्व ) रूपी माशा-कडून ते तोडले जातात. त्यांची अपकीर्ति होऊन त्यांच्या पदरांत हीनत्व —नीचपणा येतो.

**३५८. सांदति** : सांधल्या जातात. अपूर्ण कळा पूर्णत्वाला पोचतात.

**३६०.** टीपग्रंथांतील अर्थानुरोधाने ' **भाटा बहुडाव जाला** ' असा पाठ असावा असें वाटतें. **बहुडाव** : बोळवण.

## प्र. ४१ –

**३६५.** रुक्मिणीच्या हृदयरूपी सूर्य–कमळाला संकोचविणारा–म्लान करणारा सायंकाळ ( असा रुक्मी ).

**३६६. मुकेया** : याचकाने याचना न करतांना देखील, याचना करण्यासाठी तोंड उघडण्यापूर्वीच सत्पात्र अशा याचकाला तो सोन्याचा पर्वत, सगळाचा सगळा दान देत असे. ( बक्षिस देत असे. **उचित**=बक्षीस ).

**३६७.** " वेदघोष तो ऋषी : रंभा ते अष्टनाइकांतुल : तीया शापिला : तो कां : ना : तीया रति मागितली : परि तो तीयेचें म्हणीतलें नायकोंचि : मग तीया क्षोभुनि शाप दीधला : मग तेणें उसाप मागीतला : मग तीया उसाप दीधला : जैं ऋक्मीणी अंबीका भुवनीं श्रीकृष्णासि माळ घालील तैं तुझें कीन्नर–कवच फांटैल : इतुलेनि तयासि श्रीकृष्णं अवतारावरि प्रतीति बैसली : तें लागौनि हा वीधानकैला : राउळाचा वेध लक्षणें भूतसंचार जाला " (टीप).

**३६९–३७३.** या ओव्यांत रुक्मीने कृष्णाची निंदा केली आहे. पण ही निंदादेखील ' स्तुतिपर परभागें पुष्ट ' आहे हें लक्षांत घ्यावें.

## प्र. ४४–४५

**३७८. अवस्था** : प्रिय–विरहामुळे लागलेला वेध. ज्ञानेश्वरांनी देखील हा प्रयोग केला आहे "दिनु तैसी रजनी मज जाली गे माये। **अवस्था** लावुनि गेला अझुनी कां न ये ॥ " ( संतवचनामृत. ज्ञानदेव ३९ ).

**३८४. अवतरवी** : प्रगट करी. गुणवर्णन करून तो (जाणता) देव प्रत्यक्ष समोर उभा करी.

**३८५. वारिक** : वारू = घोडे. यापासून **वारिक** = शिंगरू, तट्टू. टीपग्रंथांत मात्र **बारिक** याचा अर्थ पालखी, डोली असा दिला आहे. सामान्यतः वारिक म्हणजे कोणतेंहि वाहन असाहि अर्थ आहेच. **विश्वास विकार** : विश्वाला = सर्व लोकांच्या मनांत विकार ( कामभावना ) उत्पन्न करणाऱ्या अशा त्या गाढिका (थोर थोर) सख्या रुक्मिणी बरोबर चालत होत्या.

**३८८. सेजवळेचां बटकीं** : शय्या तयार करण्याचें ज्यांचें काम होतें अशा दासींनी.

## प्र. ४५-४८

३९१. **राजानिर्ती** : व्यवहार जाणणाऱ्यांनी; व्यवहाराप्रमाणें, आवश्यकतेप्रमाणें.

३९२. **खंड सावासिये** : टीपग्रंथांत 'अखंड' असा पाठ आहे. **खड सावासिये** : जवळ असलेल्या सेवकांचा भाग ( कांही सेवक ). **अखंड सावासिये** : नेहमी जवळ असणारे सेवक.

३९५. **हंसोदक** : हंसाच्या वर्णाप्रमाणे पांढरें शुभ्र = स्वच्छ पाणी.

३९७. '**पडिमठें** : पदाचा चढ उतार : एवं एक टाळिचें ' ( टीप. शिशु. १६९ ). पडिमठ हा गाण्याचा एखादा विशिष्ट प्रकार असावा. याचा उल्लेख शिशुपालवधांत देखील आलेला आहे. " सरीचें **पडिमठें** गाइलें : किं नेणों कैसें राहावलें " ( शिशु. १६९. ) द प्रतींत व टीपग्रंथांत **पडघाविलें** असा पाठ आहे. त्याचा अर्थ ' आळविलें : पद गाइलें ' ( टीप ).

४००. **तेला नुतरेचि** : ' कापुरपाक साधला नाही : तथा मुरला नाही ' भीमक राजाने हिला दिलेल्या विड्यांतील कापूर चांगला मुरलेला नव्हता म्हणून तो हिला बाधला; त्यामुळेच हिची ही अवस्था झाली असावी.

४०२. **निरोधु** : सभेंत एकसारखें बैठक मारून बसावें लागलें, उठतां आलें नाही; म्हणून ही शारीरिक अस्वस्थता आली असावी. ' **उरोधः** विरोध. '**उरोधु** वाडुबलु। प्राणुपापता ढालु' (ज्ञा. रा. १३-२७०) या ओवींत **उरोध** शब्द विरोध याच अर्थाने वापरलेला आहे.

४०३. आंत रुक्मिणीदेवीच्या आईला हा वृत्तांत सांगावा काय ?

४०५. **सुवा ना** : देऊं नका.

## प्र. ४९-५०

४०७. ज्यांतून शरीरावयव स्पष्ट उमटून दिसतात असा विल्हळु=विरळ, झिरझिरीत.

४०९. "**विपायें** : विरलागत : भावें किंचित् :" रुक्मिणीची झालेली अवस्था ही विरळ अवस्था आहे. नेहमीसारखी सामान्य अवस्था नव्हे; सहज घडून येणारी अवस्था नव्हे-

४१४. **दळवैनी** : मुख्य सखीने; प्रधान कुमरीने.

४१७. बर्फाच्या चिरीव पाषाणांनी तयार केलेल्या निर्मळ दामोधरांत ( घरांत ), हिमालय पर्वताशीं ज्याची तुलना करतां येईल असें एक दुसरें सोळाखणी घर ( अंतर्गृह ) चंदनी लाकडापासून तयार केलें.

४१९. तेथे जो सज्जा तयार केला होता त्यांत तर शिल्पशास्त्रांनी सगळी शोभा प्रगट झाली होती. **बहु** : या पाठाऐवजी **बाहु** असा पाठ टीपकार देतो व त्याचा अर्थ "दक्षिणोत्तर भुजा" असा करतो दक्षिणोत्तर असें म्हणावयाला ओवींत तरी कांही आधार दिसत नाही.

४२०. **एकैकी** : एका एका खणांत.

४२१. **नाटारंभीं** : तुळईच्या पुढच्या भागीं, चेहेऱ्यावर निरनिराळे विकार दाखवणाऱ्या अशा पुतळ्या ठेवलेल्या होत्या. टीपकार थोडा निराळा अर्थ देतो " सवीकारी=विकारें सह वर्तमानें : भावें कुसलतेचीं : नाटारंभीं=नृत्ययुक्तें " ( टीप ).

४२२. मदळसा ( छताच्या मध्यभागीं ) कनक-जंबुचिया सभावा ( चेहेऱ्यावर निरनिराळे भाव दाखविणाऱ्या ) पुताळिया. **चौपसी** हा शब्द इतरत्र **चौपासीं** ( चारी बाजूंनी ) असा आढळतो. उदा : महाभयाचीं भूतें **चौपाशी** । अहर्निशीं झोंबती " (ए. भा. २–२८०.) **मुहटिया** हा शब्द शिशुपालवधाच्या कांही पोथ्यांत व इतरत्र **मोहटिया** असा आढळतो. उदा " बचकूंदाचिया पाटिया : कल्हारांचिया **मोहटिया** " ( शिशु ७६१. )

४२४. **हिवाळें** : बर्फाची जाळी. **सोवाळें** खिडकी; गवाक्ष.

४२५. रतीचें दादुलेपण ( नवरेपणा ) सोडून देऊन अनंग तेथील चित्रें पहावयास आला होता.

४२६, **भीतभंग** : मोठ्या खोलीचे दोन विभाग करण्यासाठी जो लाकडी अथवा कापडी पडदा लावतात त्याला भीतभंग असें म्हणत असत. अशा त्या पाचूच्या भीतभंगावर अनेक फुलांच्या कळ्या निरनिराळ्या रंगांत रेखाटलेल्या होत्या. ती रंगाची विविधता मोठी मनोहर दिसत होती.

४२७. त्या धारादामोधराचें वरील छत कंदर्पकेतकीच्या लतिकांनीं शृंगारलेलें असून त्यावर मोठ्या कुशलतेने फुलांच्या आकृति काढलेल्या होत्या.

४२८. **केदारिचेनि हिंवें** : तेथे पाण्यापासून कांही कलाकौशल्याचीं कामें ओतून तयार केलेलीं होतीं. तीं अशीं दिसत होतीं कीं बाद्रिकेदारच्या

थंडीने खरोखरीच गोठून गेलेलीं आहेत ( मुराली ); पाण्याच्या आकृति पण पूर्णपणें गोठून गेल्यासारख्या दिसत होत्या.

**४२९.** तेथील जमिनीच्या खालीसुद्धा पाण्याचीं **मांडीं** भरून ठेवलीं होतीं. त्यामुळे ती जमीन पायाने दाबली गेली कीं आंतून थंडगार पाण्याचे तुषार वर उसळत असत. **चेपें** : केसांप्रमाणे अतिशय बारिक व नाजुक (असे तुषार). **पोकळे रूपीं** = पोकळ्या भागांत.

**४३०.** " **आल्हाते** : सकथाना ( ? ) : तथा नळें : तथा धोटे " (टीप). **पिचकाऱ्या** असा या शब्दाचा अर्थ दिसतो. **आल्हात**=पिचकारी.

**४३१.** तेथील हत्तींच्या सोंडांतून पाण्याच्या धारा निघत होत्या व त्या एकमेकावर पडत होत्या. एका हत्तीच्या सोंडेंतील छिद्रांतून निघालेल्या धारांच्या जोरदार फवाऱ्यावर ( **वेंझा** ) दुसऱ्या हत्तीच्या सोंडेंतून निघालेले ( **सुभरा सूत्रें** ) दाट तुषारांचे फवारे पडत असत.

**४३२.** जणुं भूमीवर पाण्याचे डेरे दिले आहेत असें तें दिसत होतें.

**४३३. माथां** : सुवर्णकेतकीच्या हंसांच्या माथ्यावर.

**४३६. ना ना** : अथवा, किंवा. **हो काज** : खरोखर.

**४३८.** तें अत्यंत शीतल असें दामोधर पाहून विजेला देखील हुडहुडी भरते व तिची दातखडी वाजावयास लागते; तोच आवाज गडगडण्याच्या रूपाने अजूनहि प्रगट होतो.

**४४२. उग्रा वोतिजताये** : तुझ्या अंगातील तापाच्या उष्णतेने हें बर्फाचें शय्यागृह जणु उतूं जात आहे, पाघळत आहे.

## प्र. ५२

**४४७. अनंगाची आंगवण** : मदनाच्या मूर्तिमंत पराक्रमासारखी असलेली ( ती भावकळना सखी ).

**४५१.** " पाताळ = पायाचे तळवे : पळिपे = करपे : भावें कांपे : लासावे = साहासें उमटे : भावें लासे = पायांतरें लाख ऐसी तापे " (टीप). **पाताळ** = तळपाय असा अर्थ घेण्यापेक्षा पृथ्वीच्या खालील पाताळलोक घेणेंच चांगलें. तिने जमिनीवर पाय ठेवल्याबरोबर खालचा सगळा पाताळलोक उष्णतेने जळायला लागत असे. अशी स्थिति असल्यामुळे ( इतका विरहज्वर

तिला असल्यामुळे) तिने त्या स्फटिकाच्या भूमिकेवर पाय ठेवतांच ती भूमि डागली जात असे, हें सांगावयास नकोच.

४५४. " **कळेकाम** : पुष्पकळियांचें काम : भावें अळंकरणें "

४५६. **गुळ-उस** : उसाचा एक प्रकार.

४५८. **वज्र-पंजरू** : वज्राप्रमाणे अभेद्य असलेलें (पंजरू=) छत. पालखीच्या वरील भागाला वाळ्याचें छत (चांदवा) लावलें होतें. **पंजरू** हा शब्द ज्ञानेश्वरींत **पिंजरी** असा आढळतो. उदा : ' धूमरजांची पिंजरी। वाजातिया वायुतें जरी होकारी ' (ज्ञा. ९–१२४.)

४६०. **सोने-कमळांचां नळीं** : पिवळया रंगांच्या कमळांच्या नालांनी–देठांनी.

४६३. **मेघेंविन चातकी फुटे** : मेघांतील पाणी न मिळालें तर चातकीचा कंठ तहानेने कोरडा होतो–सुकतो. **फुटणें** या शब्दाचा असाच अर्थ ऋद्धिपुरवर्णनांतहि आहे. ' भलेतैसें दुष्ट लेंकरू : परि माउलिए नए अव्हेरूं : बाप कृपेचा सागरू : आणि मी तृषा **फुटे** ' (ऋ. १२८.)

४६५. **भेदरेन** : भीतीने. **बेहालीं** भ्याली.

## प्र. ५३–५४

४६७. **सांटवतें वोपणें** : जणु अस्ताचलरूपी पोवळ्यांच्या मठांत सूर्यप्रकाशाचें निधान (वोपणें) साठून राहत होतें.

४६८. अस्तंगत होणाऱ्या सूर्यावर, आरक्त (अनुरक्त) अशा शृंगार-विहंगाची व शंकराच्या क्रोधाग्नीने त्रस्त झालेल्या मदनाची कल्पना.

४७१. नील वर्णाच्या पाचूंची उत्पत्ति गरुडाच्या उद्‌गारा (वमना) पासून झाली, अशी समजूत आहे. ' अंधकार लक्षणें गरुडाचा उद्‌गार=वमन हे पाच जाली : तयाचे पर्वत उन्माळिले=उलथले ' (टीप). या ५४ व्या प्रकरणांत सायंकालीन अंधःकारावर कवीने अनेक कल्पना केलेल्या आहेत. त्यांतील एक कल्पना अशी की, हा अंधःकार म्हणजे गरुडाने आपल्या वमनावरोबर बाहेर टाकलेल्या पाचूंचे डोंगरच होय. **उन्मळीले**=पोटांतून उन्मळून (मुळासकट उपटून) बाहेर टाकले.

४७२. ' **सोगौर** तो स्याम पाक्षिया : तो गगनींचि असे : तयाने पीलीं पसरलीं' ( टीप ).

४७३. ' आंधकारलक्षणें माहामोहो=अज्ञान : तयाची धुमाड=धुइ अविद्या' **कांतिलोहाचें**=आत्यंतिक काळ्या रंगाच्या लोखंडाचें. **ठौळ**=समूह अथवा खिल्लार. **चरत** : भटकत आहेत ( गवत खाण्यासाठी ).

४७४. कंदर्पाचा दळवै ( सेनापती ) जो वसंतऋतु त्यानें विरहिणीवर, कमळावरील काळ्या भुंग्यांचा अकस्मात जोराचा हल्ला चढविला, तोच हा अंधःकार, अशी कविकल्पना.

४७५. **गगन काळी** : आकाश हीच कालिका देवी.

## प्र. ५५

४७६. **टाकिती अविंसाळें** : घरट्याकडे परतलीं, **टाकणें** : मिळविणें, प्राप्त करणें, जवळ करणें; या अर्थी जुन्या महानुभावीय वाङ्मयांत हा शब्द फार येतो. उदा : ' जिणौनि मनातें : जे वळवले ज्ञानाचिया वर्ते : ते **टाकितु** ब्रह्मपदातें : संत संन्यासियें (उ. १६४.) 'तन्हीं प्रेमाचा कडलगीं : **टाकुनि** कैवल्यदुर्गे ' (उ. १६५.) ' झोंबौनि वैराग्याचा कडा : **टाकी** ज्ञानदुर्गाचा हुडा ' (उ. १९० ) ' तया मज तो हा वाङमहा पथु : केवि **टाके** ' (ऋ. ७.) ' ऐसिये भक्तीचा सौरसू : लाहातया **टाकी** विदेशु' (ज्ञा. प्र. १९७.) ' की ग्रीष्में दगधु : जेवि **टाके** गंगेचा न्हदु ' (ऋ.१०६. )

४८१. या ओवीचा अर्थ स्पष्ट आहे. टीपकारानें यांतून श्लिष्टार्थ काढण्याचा पुढील प्रमाणे प्रयत्न केला आहे. तो विशेष चांगला वाटत नाहीं. " मेल्हनी = स्त्री लक्षणें रात्रि मेहलनी : माजिरी = माजवीती : चातुष्टय-युक्त पुरुष तल्लक्षेणें उजीयड = दीवसाचा प्रकाश : पुरुष लक्षणें दीवे : नेहजति=घर लक्षणें : यकांत स्थळ : हातीं धरी ते कुंटिणी : तल्लक्षेणे स्त्री : "

## प्र. ५६-५७

४८२. " **कुळैवे** = कुळदेवतेपुढे (लावावयाचे) दीवे : **लाखेवे** = लक्ष द्रव्य जालेया लावीती " (टीप). दिव्यांचाच एक प्रकार.

४८३. ' सहस्रकर = सुर्ये : सींथला=वोथीला : मातादता=माजला : दीपक लक्षणें सलें = ठाणीं ठेविलीं = बैसविलीं : सांकीकाचीं = साक्षेचीं '

(टीप). उन्मत्त झालेल्या अंधःकारावर पहारा ठेवण्यासाठी शेकडो दिव्यांची जणु ठाणीं बसविलेलीं आहेत, असें मला वाटतें.

**४८४.** अतिशय बलवान अशा अंधःकाराने मोठ्या आवेशाने अडवून धरलेले सूर्याचे सेनापति म्हणजेच हे दिवे. किंवा, हे दिवे म्हणजे अंधःकार (काळवखा) रूपी समुद्रांत नवीनच निर्माण झालेलीं माणकें होत.

**४८५.** संध्यारागाप्रमाणे आरक्त वर्णाचे हे दिवे म्हणजे रात्रीने सांजवेळेला ( हीच स्त्री ) जिंकून तिच्या जवळून आणलेली खंडणी होय. **गडद :** दाट अंधःकार. आपण 'गडद अंधःकार' असें नेहमीं म्हणतोंच. पण **गडद** हाच शब्द दाट अंधःकार या अर्थीं जुन्या मराठींत वापरीत असत. उदा : ' जैं अज्ञानाचें **गडदें** पडे। तैं हा बहुवसु मनीं वाढे ' (ज्ञा. ४–२०५.)

**४८६. मेघ वीणि साधित :** ढग मोत्यें वीत आहेत – निर्माण करीत आहेत, किंवा प्रसवत आहेत. मेघापासून मोत्यें निर्माण होतात हा कविसंकेत प्रसिद्धच आहे. पहा ' करींद्र**जीमूत**वराहशंखमत्स्याहिशुक्त्युद्भववेणुजानि । मुक्ताफलानि प्रथितानि लोके तेषां तु शुक्त्युद्भवमेव भूरि ' ( कुमार १–६ वरील मल्लिनाथी टीका ).

**४८८.** समुद्र प्रसिद्धच आहेत. पण नरेंद्राने केलेल्या वर्णनामुळे एक नवीनच साहित्यरसाचा समुद्र निर्माण होईल. तो आठवा समुद्र.

## प्र. ५८

**४८९-९१.** प्रतिपदेपासून तों पौर्णिमेपर्यंत वाढणाऱ्या चांदण्यावर, कणीस तयार होऊन त्यापासून खळ्यांत धान्याची रास पडेपर्यंतच्या अवस्थांची कल्पना केली आहे. बीजेचें चांदणें हें, झाडावर हळूहळू बाहेर पडणाऱ्या ( निघवलें ) कणसासारखें; पंचमीचें चांदणें हें फुलोरा धारण करणाऱ्या कणसाप्रमाणे; अष्टमीचें चांदणें जणु चीक भरत चाललेल्या दाण्यांनी युक्त अशा कणसासारखें; दशमीचें, ( निमुरवत ) निबर = टणक झालेल्या व चिकाने पूर्ण भरलेल्या कणसाप्रमाणे आणि या नंतर पौर्णिमेचें चांदणें म्हणजे आकाशरूपी खळ्यांत पडलेल्या धान्याच्या राशीप्रमाणेच होय.

**४९३. आकारें चंद्राचेनि :** चंद्राच्या आकाराप्रमाणे वर्तुलाकार.

**४९४. ' वोपे आंतु :** जैसें आदर्शा आंतु ' ( टीप ).

४९५. ' गगन लक्षणें **गरुडीं = तालीमखाना** ' ( टीप ). ' **चहुबुडीं** = चतुर्विध भूतग्राम : एवं नीवति : तल्लक्षणें चहुंबुडीं = च्यार साळा : १ भृंगी : २ भुपाळीं : ३ मार्जीत : ४ वेधाळी : चंद्र लक्षणें अनंग आचार्या ' ( टीप ). **बुडीं** याचा एक अर्थ हत्याराचें पातें असा आहे. तेव्हां **चहुबुडीं** = चार ( अनेक ) हत्यारांचें शिक्षण देण्यासाठीं तयार केलेल्या तालीमखान्यांत ( गरुडीं ); मदनपक्षीं **चहुबुडीं** = शृंगार चेष्टांचे चार प्रकार, असा अर्थ घेणें इष्ट होईल.

४९९. चंद्र म्हणजे उदयाचलावरील ( उगमीची ) प्रसिद्ध अशी चांदण्यांची अधिष्ठात्री देवताच होय.

५००. चंद्र म्हणजेच श्वेतद्वीप. चंद्रावरील कलंक म्हणजे श्रीकृष्णाचें सावळें रूप.

५०१. गाळीव अमृताचा आरसा म्हणजेच चंद्र.

५०२. श्रीकृष्ण (चंद्र) हाच नवरा आपणांस मिळावा म्हणून मोठमोठ्या नक्षत्रांच्या रुपानें स्वर्गांतील तारा ( तारा आदिकरून देवांगना, अथवा तारका ) तेथें जमलेल्या होत्या. त्यांनी, आकाशगंगेमधील वाळूंत ( लहान तारकांचा समूह हा वाळूप्रमाणें दिसत होता ) बसलेल्या चंद्ररूपी गोपीनाथाची नीळ कमलानें पूजा केली. तें नीलकमल म्हणजेच चंद्रावर दिसणारा काळा डाग होय. त्या काळ्या डागावर नीलोत्पलाची व चंद्रावर श्रीकृष्णाची कल्पना केलेली आहे.

## प्र. ५९

५०३. या ओवींतसुद्धा चंद्रावरील कलंकावर आणखी एक कल्पना केलेली आहे. चंद्र म्हणजे, सुगंधाच्या अधिष्ठात्री देवतेप्रमाणे असलेली कुमुद–कलिका ( श्वेत कमल ). तिची पूजा करण्यासाठी चंद्रकिरणांनी भुंगे ( हींच नील कमळें ) तिला वाहिलीं होतीं. चंद्रावर दिसणारे कलंक म्हणजेच हे भृंग होत, अशी कल्पना कवीनें केलेली आहे.

५०५. **माधवी** चांदणें ( चंद्रिका ) हीच दारू.

५०७. कापुरकेळीच्या गाभ्यांतील कोवळ्या पानाच्या वर्तुळाकार पोकळींतून कापूर निघतो. हा कापूर म्हणजे चंद्रानें पेरलेलें आपल्या धवल यशाचे बीज.

५०९. चंद्राने आपल्या कळांचा चारा ( खाद्य; सेव्य वस्तु ) करूनि संसारा दिधला. या त्याच्या कृत्यामुळे शंकराने त्याला आपल्या डोक्यावर धारण केलें.

## प्र. ६०

५१२. चांदण्या ह्याच, चंद्रप्रकाशरूपी क्षीरसागरांत उसळणाऱ्या रत्नां-प्रमाणें भासत होत्या.

५१३. शुभ्र चांदण्यांत भटकत असलेले सारस पक्षी राजहंसाप्रमाणे दिसत; किंवा ते राजहंसासारखे दिसणारे सारस पक्षी म्हणजे आकाशाने चंद्र-बिंबापासून मिळवलेली त्याची ( चंद्रबिंबाची ) निर्मितीच ( वीनि ) होय.

५१५. चंद्रकांत शुभ्रवर्णाचाच असतो. आपल्या किरणांच्या शुभ्रत्वाने चंद्र चंद्रकांत मण्याचे डोंगर जणु लपवूनच ठेवतो. कारण, चंद्राकिरणांच्या शुभ्रात्वांत चंद्रकांतांचें शुभ्रत्व मिसळून जातें. कोणतीहि वस्तु दडवून (थोकवी) ठेवायची असली तर ती अंधारांत ठेवतात. पण चंद्र असा लाघवी आहे की तो अंधाराशिवाय ( म्हणजे अंधारांत न लपवतां ) स्वतःच्या आंगीं (स्वतःच्या शुभ्रत्वांतच) क्षीरसमुद्राला लपवतो. अर्थात्, चंद्राचा शुभ्रत्वांत क्षीरसागराचा शुभ्रपणा लोपून जातो अशी कल्पना.

५१६. जग वालिपेची ( केवळ शुभ्र तलम वस्त्रेंच ) नेसतें.

## प्र. ६१

५१९. **झणें ये** = येऊं नये. **झणें (णां)** शब्द नेहमी निषेधार्थकच वापरला जातो. उदाः ' योगादिकें साधनें । साकांक्षें आराधनें । मंत्रयंत्रविधानें । **झने** करा ' (ज्ञा. रा. ३-९०) ' म्हणुनि आइकें अर्जुना । **झणें** चित्त देसिं यया हीना ' (ज्ञा. रा. २-१७). पुढे ६१० व ६१५ या ओव्या पहा.

५२०. क्षुल्लक ( वरिचिला ) विकाराच्या मुलाम्याने युक्त असलेला माणूस लोकांत शहाणा समजला जातो, पण खरे जाणते पारखी, ते मुला-म्याचे, अर्थात् खोटे, अतएव निरुपयोगी म्हणून त्यांचा त्याग करतात.

## प्र. ६२-६३

५२३. **वांकडे** : पावसाची जोराची झड. ज्ञानेश्वरींत हा शब्द

पुढील प्रमाणे वापरलेला आढळतो. ' कुळवाडी रिणें दाटली । कीं **बांक-डिया** ढोरें बैसलीं । तैसी त्रुटी कांहीं केली । जीभाचि हे (ज्ञा. १३–५६६.)

५२४. कुसुमबाणांच्या गोऱ्या इत्यारासाठी मदन–शत्रूने ( **मैळैनि** ) मोचें ( **बांधरे** ) बांधले.

५२६. अखंड चंद्र=पौर्णिमेचा चंद्र, हींच वर्तुलाकार वीज.

५२७. होळी कधी वसंत ऋतूंत येत नाही. पण मदनाने मात्र वसंत ऋतूंतच होळी पेटवली. आधीच वसंत ऋतूंतील उन्हाचा ताप, त्यांत आणखी मदनाच्या होळीचा–मदन बाधेचा ताप. **वेगळी** : निराळीच.

५२९. सप्तस्वर हींच शस्त्रें; पण त्यांना देखील त्या वाद्यांचा (जंत्रें) ध्वनि जिंकीत असे. सप्तस्वरापलीकडे–अतिशय मधुर. **कानाचेनि निरोपें** कर्णद्वारां. कानांच्या मार्गाने.

५३२. **वोसाइलिये** : छायेला, सावलीला. प्राकृतांत **ओस** शब्द सावली या अर्थी आहे. त्यापासून **वो(ओ)साइलि** शब्द बनला असावा.

५३३. ' **भारणी**=पारवा ' असा अर्थ टीपग्रंथांत दिला आहे. पण तो येथे प्रशस्त वाटत नाही. **भारणी**=भारणारा मंत्र, असा अर्थ घेणें इष्ट वाटतें. काम ( मदन ) रुपी काळ-डंकाचे ( कृष्णसर्पाचे ) दाटिक ( लहरी ), तिया भारणिया ( साळैया राजसुक इत्यादिकांचे आवाज हेंच मंत्र त्या मंत्रांनी ) घूमेति.

## प्र. ६५

५३६. **मंत्रसिद्धा** : जिला मंत्र सिद्ध झालेला होता, मंत्रसिद्धी प्राप्त झालेली होती अशी सुगंधा. **द्रोणागिरी** : एक पर्वत.

५३७. मलय पर्वतावरील झाडें म्हणजे सुगंधासहित निर्माण झालेल्या अमृताप्रमाणे होतीं. त्यापासून तयार केलेल्या वोखदाचा ( औषधाचा ) निर्यास ( रस, रसायन ).

५३८. **वोदें** : प्रवाहाने. ( **ओत** = पूर. त्यापासून **वोद** शब्द. )

५४०. **यक्षकर्दम** : कुंकुमागरुकस्तूरी कर्पूरं चंदनं तथा
महासुगंधमित्युक्तं नामतो **यक्षकर्दम** : ॥

५४१. " **खड्गोदक** : सा प्रकारांचें : तेंचि कवणें : नागर सोतें :१:

माळती : २ : मृणालें : = कमळें : ३ : आसोक : ४ : बावन तो चंदन : ५ : बकुळ : ६ : ऐसा साहीचा रस तें **खड्गोदक** : मकरंद तो पुष्पांतुल उदक : " (टीप). **खड्गोदक** = षड्रसोदक.

**५४२.** ' **गोलामे** : पुर्पें : तथा कापुर : ' ' **परतौनि** : मर्दुनि :

**५४५.** ' **त्रिपुर** : इडा : पींगळा : सुक्ष्मना : तथा त्रीधातु : तथा त्रीगुणातमक : मार्वे तीन्ही सीरसें ' (टीप). यापेक्षा, त्रिपुरदहनाच्या कथेचा येथे उल्लेख असणें अधिक शक्य वाटतें. इंद्रियावर त्रिपुराचें रूपक. तारकासुराच्या तीन मुलांनी शंकर व ब्रह्मदेव यांना प्रसन्न करून, आकाशांत वाटेल तेथे उडून जाऊं शकणारीं अशीं तीन शहरें मिळवली होतीं. यांच्या साह्याने ते सर्वांना अतिशय त्रास देत. म्हणून शंकराने तीं तिन्हीं शहरें जाळलीं.

**५४६.** चंद्रकिरणांतून झरलेलें अमृत, कैरवांवर=कमलपत्रांवर पडून तें पहाटच्या थंडीने आटत असे व त्याचे रवे बनत.

**५४७.** चकोरीच्या डोळ्यांत मधु-कर्पुराचें अंजन घालायचें व मग तिच्या डोळ्यांतून पडलेल्या आसवांत कुमुद-कंद उगाळायचा ( त्यांत, कमलपत्रांवर आटून रवेदार झालेलें चंद्रकिरणांतील अमृत मिसळायचें ). तयार झालेलें अंजन रुक्मिणीच्या तळपायाला लावीत. (चंद्रिका मंत्राचा जप करून).

**५४८.** ' **पाणिपात्रीं** : उदकपात्रीं : एवं कमळपत्राचा : **पंचधार** : पांचा आंगोळिया करुनि ' ( टीप ).

**५५२.** चंदनपल्लवांचा पंखा तयार केला. त्यावर निरनिराळ्या वर्णांच्या ताज्या पुष्पकलिका मोठ्या कौशल्याने रचून ठेवल्या होत्या.

**५५४.** पौर्णिमेच्या चंद्रकिरणांतून झरलेलें व स्वाती नक्षत्रांतील ढगांनीं धारण केलेलें पाणी. **माणिक-सिंपीचा** : मोत्यांच्या शिंपल्याच्या. स्वाती नक्षत्रांत मेघाच्या पाण्याचे थेंब शिंपल्यांत पडले म्हणजे त्याचे मोती बनतात. पहा : ' तें स्वातीस्तव अब्धिशुक्तिपुटकीं मोती घडे नेटकें ' ( वामन नीतिशतक ).

**५५५.** **आपमुरी** : त्या मेघोदकापासून शिंपल्यांत मोती अर्धवट तयार होतात न होतात अशा स्थितींत.

**५६१.** **उबा दर ये** : तिच्या अंगांतील उष्णतेमुळे जवळच्या

सख्यांना दरदरून घाम येत असे. **तवचा** : त्वचा, कातडी. **उचलली** सोलून निघाली.

५६३. **अर्धचंद्र** हाच खल, **चांदणें** हाच पारा व **नक्षत्रें** हींच मेथ्यें; यांचा **मारु केला** : ठेचून काढलीं, खललीं.

५६४. तो मृगांकु नांवाचा रस कापुर-केळीच्या पात्रांतून **खिरला**= क्षरला, गळाला; म्हणून एक **सेंद** = करंडा तयार करवून त्यांत भरून ठेवला.

५६५. " **अवस्थे** : जयासी अवस्था भरे तयासि : **तांबुल-वनेंसीं** : नागवेलीच्या पानेसीं ( विड्याबरोबर ) देती " ( टीप )

५६७. गगनरंग नांवाच्या गवयाने मेघ राग आळविला. त्यामुळे मेघ आकर्षिले गेले व जळ-योग ( पाण्याचा योग ) झाला, पाऊस पडला.

५६९. **पाण्हावणें** : पान्हा निर्माण करणें. सोमकांताला पान्हा फोडणारें, चंद्राचें चांदणें. त्यामुळे **अदुभणीं** : इतरांकडून दोहले न जाणारे, **चंद्रकांत दुभती** (पाझरत होते).टीपकाराने **आदुभणीं** : आसमंततात दुभण आदुभण : एवं **आखंड** ' = एक सारखें असा अर्थ दिला आहे. व्युत्पात्ति वरून हा अर्थ नीटसा लागत नाही ' अतिशयेन दुभण ' अशी व्युत्पत्ती घेतल्यास मात्र तो अर्थ होऊं शकेल.

५७०. **कासिमराचां कळसेवरी** : स्फटिकाच्या कलशांतून.

५७१. ' **झडें** : सीतें करूनि : **वोकारे** : वमन : भावें कांटाळे : प्रळय : महासंहारीचा अग्नि : ऐसी वांती होए ' ( टीप )

५७२. '**दामति ना** : नीट नव्हेति : तथा लवति ना : बोटें : पर्वे '

## प्र. ६६-६७

५७३. **देवाचिये अवस्थेचा** : श्रीकृष्णाच्या विरहामुळे निर्माण झालेल्या व्यथेचा ' जिवीं आस असे ते देवाचीय भेटीची ' ( टीप )

५७४-५७५. झालेला शीण एवढा मोठा होता की त्यामुळे जिवंत राहणेंच अशक्य होतें. परंतु तिला श्रीकृष्णाच्या वेधाची (ध्यानाची) वज्रांगी (वज्रकवच) लाभलें होतें म्हणून ती ( रुक्मिणी ) तो सीण सहन करूं शकली. ' **क्षोभु** : गहनता, ( टीप ) अर्थात ध्यानाचा, वेधाचा गंभीरपणा.

५७६. ' **आगियेल** : भावें घर्मोदक ' ( टीप )

५७८. कस्तुरी घोळून तयार केलेली वोवरी. ' **देव्हारसर** : देवघर ' ( टीप ) ' **चांदिनयाचा अरुवारीं** : शीतल आन श्वेन : **आरुवारी** : सुकुमार ऐसी सुपवती : **सुतली** : निजविली ' ( टीप )

५८४. रुक्मिणी म्हणजे जणुं कांही मदनाचा अवतारच. अग्नीने मदनाला एक वेळ जाळलें. तेव्हांपासून जणुं तो (अग्नि) मदनाला जाळायला सवकलाच होता ( पडकैला ). म्हणूनच मदनाप्रमाणे असलेल्या रुक्मिणीवर त्याने घाला घातला. त्यामुळे तिच्या शरीरांत संताप ( विशेष विरहाग्नि ) निर्माण झाला होता, अशी कल्पना.

५८५. श्रीकृष्णाला विशुद्ध रुक्मिणी पाहिजे होती. वस्तुतः रुक्मिणी विशुद्धच होती पण वडिलांनी ठरविल्यामुळे का होईना पण तिला शिशुपाळाने मनाने पत्नी कल्पिलें होतें. हाच जणुं तिला डाग लागला होता. तो काढून टाकून विरहाग्नि रुक्मिणीरुपी सुवर्णदळ शुद्ध करून घेत होता, हा भाव.

## प्र. ६८–७०

५८७. **सप्तस्वर** : निषादर्षभगांधारषड्जमध्यमधैवता :
पंचमेत्यमी सप्त तंत्रीकठोत्थिताः स्वरा : ॥

रुक्मिणीवर सूड उगवण्यासाठी सप्तस्वरांनी कोकिळाला लाच दिली. म्हणून त्याने पंचम स्वराचा मंत्र जपून रुक्मिणीला अशी खिळून टाकली.

५८९. **दळें बांधणें** : शस्त्र उपसणें, शत्रुत्व करणें : **दळें**=म्यान, तरवार बांधून हत्यार उपसणें. पहा : भक्तिज्ञानाचेनि बळें : माहाकाळेंसीं **बांधलें दळें** : तेहीं तन्हीं वाणावें परब्रह्म सावळें :श्रीउद्धवार्जुनीं' (शि. ११.)

५९०. **नयनाचां सेवटीं** : तिरप्या नजरेने पाहून.

५९१. '**रातिवा** : धाडी ' हल्ला ( टीप. ) पहा : ' तयाचा शृंघारू काइ वानावा : हैसा कवण तो जोधाचा मेळावा : जे कांडाचेनि आंधारें करिती **रातिवा**: पारकयावरी ' ( शिशु. ९३९. )

५९३. अग्नीचें स्तंभन होईल; विरहाग्नि शांत होईल, असा मंत्र.

५९४. **अनुहात जंत्रें** : विशेष वाचाळता न करतां, जंत्राच्या साह्याने ( निरनिराळया आकृति काढून त्या मंत्राने भारतात व रोग्याच्या गळ्यात बांधतात, त्यांना जंत्रें म्हणतात ) रुक्मिणीच्या व्यथा बंद करील.

**आबुटाचें विष** : ढग हेंच विष. आकाशांत ढग येऊन वर्षाकाळ सुरू झाला म्हणजे कोकिळांचा गळा पडतो, ते गोड आवाजांत गाऊं शकत नाहींत, अशी समजूत आहे.

• ५९५. ' **नळिकायंत्रें** : येळुचे मणी दोर ओवुनि बांधतिः तयावरि बैसाति : आन, मणी फिरे : आन ते लीगटुनि पडति ' ( टीप )

५९६. ' **टापर** : गवसणी : **मद्वी** : कांटाचें वस्त्रः एवं पींजरेयासि ' (टीप) **मद्वी** : काव्याचें वस्त्र हा टीपकाराचा अर्थ बरोबर वाटत नाहीं. उंच रेशमी वस्त्र या अर्थाने हा शब्द आढळतो उदा : ' कीं **मद्वियेचा** सेला : तो वनश्रिया वेढिला, (शिशु २५१.) ' आतां अविद्येच्या गांवीं । मोहाची वेढूनि **मद्वी** । संदेहाचीं आघवीं । लेऊनि लेणीं' ज्ञा. (१८—६९०.) यामुळे, **मद्वियेचें टापर** = उंची रेशमी वस्त्राची गवसणी हाच अर्थ घेणें ठीक वाटतें.

५९८. त्यांच्या गोफणींचे दांडे कमळ—नालांचे ( देठांचे ) होते. **फळेंवरि** : गोफणींत फळें घालायचीं व तीं वर फेकायचीं.

६०१. **सा पां** : जवळ.

६०२. राहूचें मस्तक ( =राहू ). या विरहिणी रुक्मिणीचा **कुवासा**= कैवारी होवो. हिची बाजू घेऊन हिला त्रास देणाऱ्या चंद्राचा नाश करो.

६०३. इंद्रनीळाचा रंग घालून चंद्राचें चांदणें पिळून काढायचें. त्याचा रंग काळसर करायचा, म्हणजे त्याची शोभा नाहींशी होऊन, तें रुक्मिणीला तापदायक होणार नाहीं, अशी कल्पना असावी असें वाटतें. कुमुदाला ( चंद्रविकासी कमळाला ) सूर्य शत्रूप्रमाणे असतो हें लक्षांत असू द्यावें.

६०४. **कांहीं घडतें न दिसे** : याचा कांहीं उपयोग होईल असें दिसत नाहीं.

## प्र. ७१

६०८. **पांजरां घाला वोल** : ओलीस म्हणून आम्हांला पिंजऱ्यांत घालून ठेवा **वोल** = हमीदाखल घेतलेली वस्तु, तारण.

६०९. **वर** = खुशाल. (संस्कृत **वरं**) ' **लांडेपण** = लांडी नामाचें लघुत्व ' ( टीप ). पुच्छविहीनता. आमुच्या शेपट्या तुटून पडतील व आम्ही लांडे होऊं.

६१३. **स्वस्तिकें** : ' स्वस्ति ' वचनपूर्वक. आशीर्वादासहित.

६१४. मृग ( हरिण ) हरिणींना कुरवाळीत; खाजवून खाजवून गोंजारीत होते. अर्थात्, शकुन फळें सांगतांना ते गोड आनंदांत होते. अगदी निःशंकपणें आणि आनंदानें शकुनाचीं फळें ते वर्तवीत होते.

६१५. जणु आपल्या पाण्याच्या गोडीच्या रूपानें सरोवरें देखील सांगत होतीं की येथे श्रीकृष्ण चक्रवर्ती येणारच. ते न आले तर ' कमळें आमच्या मांडीवर (**उसंगिये**) प्रवेश करणार नाहीत (म्हणें रिगती)=आमच्यांत ( सरोवरांत ) कमळें फुलणारच नाहीत. आणि ' हंसें म्हणे मिळतु=आमच्याशीं हंसांचें मीलन होणार नाही=हंस पक्षी आमच्या पाण्यांत क्रीडा करणार नाहीत. चौथ्या चरणांत ' **म्हणे** ' च्या ठिकाणीं ' **म्हणे** ' पाहिजे.

६१७. **वारें वर्तणें** : वारा कोणत्या दिशेला वाहतो, एकंदर परिस्थिती कशी काय आहे, हें पडताळून पाहणें. **कंदर्पाचा गोसावी** : मदनाचा स्वामी ( पिता ); श्रीकृष्ण. श्रीकृष्णाला रुक्मिणीच्या पोटीं प्रद्युम्न नांवाचा पुत्र झाला तोच मदन.

६१८. **घुणघुना** : वायुमुळे होणाऱ्या आवाजाच्या रूपानेच जणु वसंत बोलत होता. पहा : ' घनु वाजे **घुणघुणा** वारा वाजे रुणझुणा । भवतारकु हा कान्हा वेगीं भेटवा का । ' ( संतवचामृत ज्ञान. ४०. )

६१९. **मातें पुसा** : असें असें न झालें तर मग **मला विचारा**, असें आपण नेहमीं म्हणतों, तोच भाव या ठिकाणीं आहे.

६२० चंद्राला खळें पडलें म्हणजे पाऊस येतो अशी समजूत आहे.

६२१. चांदण्याचा स्पर्श हा किंचित् ( **आणुचि**=अणु प्रमाणांत ) कापराच्या वासासारखा होता. ( वासानें युक्त भासत होता ) **इंद्रियांपुढें** : अर्थात् रुक्मिणीच्या इंद्रियांना ( जाणवितांय ).

६२२. जणु आपल्या पदरांना शकुनगाठ बांधण्यासाठीं झाडें आपली पालवी ( पल्लव, कोवळीं पानें ) खालीं लावीत होतीं.

## प्र. ७२

६२३. होरपळलेलें (**बनवलें**) कुमोद जसें चांदण्यामुळे प्रफुल्लित व्हावें (**साजिवें**) तशी, भीमकी सावध झाली.

६२५. तुझ्या जीविताचा आनंद ( **रमण** ) नाहीसा झाला तो केवळ तुझ्या हटवादी बुद्धीमुळेच.

६२६. **वोढा काढुनि** : ओढाओढ करून.

६२७. **बुधी** : माझ्या बुद्धीने डोकें चाळवून व नाना युक्त्या करून. **आटक**=अघटित. तुझ्या बाबतींत काय घडून येत नाही, तुला काय पाहिजे तें मला सांग. ( म्हणजे तें मी माझ्या बुद्धीने घडवून आणीन ). **आटक तें** या ऐवजी **आटकतें** ( अडणारें ) असा एक शब्द घेतला तरी चालेल.

## प्र. ७३

६२९. **उसासौनि** : उच्छ्‌वास टाकून. दीर्घ श्वास सोडून.

६३०. श्रीकृष्णाविषयींची आवड हाच भोवरा. त्यांत माझें शहाणपण (बुद्धी) रूपी तारू सापडून तें रसातळाला गेलें. माझी बुद्धी रसातळाला गेली. मला कांही सुचत नाही. **उत्कंठा** : अर्थात् श्रीकृष्णदर्शनाची उत्कंठेवर पतंगाचें व जाणिवेवर दिव्याचें (कुळैवा) रूपक आहे.

६३१. **चाडेचें आबूठ** : श्रीकृष्णमीलनाची इच्छा हेंच आभाळ, मेघपटल (आबूठ). प्रेमाच्या पुरांत गांभीर्याचे (गरुवानेंयेचे) वृक्ष (आरव) वाहून जात आहेत.

६३२. **मन करी (धरुनि)** : हातांत मन धरून. हिय्या करून.

६३६. **वेधवंती** = आकर्षणशक्ति. तिचा दीक्षागुरु; तिला आकर्षणाचा मंत्र उपदेशणारा.

६३७. **शब्दवेधिया रसांचा पुतळा** (दाखविला). ज्याचें केवळ नांव उच्चारल्याने देखील वेध लागतो ( आवड उत्पन्न होते ) अशा रसाचा मूर्तिमंत पुतळा (श्रीकृष्ण).

६३८. माझ्या अंतःकरणांत प्रसन्न झाली (**प्रसादली**); उमटली.

६४०. **आनिका वरिलियें** : इतराकडून ( शिशुपालाकडून ) मी मनाने वरलें गेलें, शिशुपाळाने मला आपली पत्नी म्हणून मानलें, यामुळे माझ्या रूपाला विटाळ तर नाही लागला ? ( आणि त्यामुळे तर श्रीकृष्ण माझी उपेक्षा करीत नसतील ना ? )

६४१. **आदि-लक्ष्मी** : माया. पण एकवेळ जरी त्याचें दर्शन

घडलें असतें तर त्याला मीं अंतःकरणाशीं धरलें असतें, आलिंगन दिलें असतें. त्यानंतर माझा जीव गेला असता तरी हरकत नव्हती.

६४२. आपलें आवडतें माणूस दुरून पाहण्याचें सामर्थ्य जर मनाला असेल तर त्याने (मनाने) माझ्या डोळ्यांना तसा उपदेश करावा (**उपदेसु**= उपदेश करो ) की श्रीकृष्ण असा असा आहे म्हणून (म्हणजे श्रीकृष्ण दर्शनाचा मला मनोमय लाभ तरी होईल ).

६४३. एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं जायचें असलें आणि मुहूर्त नसला तर 'प्रस्थान' ठेवीत असतात. 'मला श्रीकृष्णाच्या चरणीं प्रस्थान ठेवावयाचें आहे. पण हें प्रस्थान ठेवतांना घातवार (वार-सुळु) चुकवायला पाहिजे. शिशुपालाचें नांव हाच घातवार. तो टाळायला पाहिजे. अर्थात् श्रीकृष्णाच्या चरणावर प्रस्थान ठेवतांना शिशुपालाचें नांव देखील माझ्या कानावर येऊं देऊं नये.

## प्र. ७४

६४५. **बुद्धि दवासन घेतलें** : 'घोडियाचें दवासन : एवं उपलाणीचि आसन' (टीप). तिने बुद्धिरुपी दवासनावर, तिहीं लोकीं बसून घेतलें. खोगीरावर (घोड्यावर) बसून, मांड न मोडतां ज्याप्रमाणे त्रैलोक्यांतून संचार करावा त्या प्रमाणे तिच्या बुद्धीने एकदम त्रैलोक्यांतून संचार केला. ( रुक्मिणीची विरहव्यथा नाहिशी कण्यास एखादी युक्ति शोधून काढण्यासाठी.)

## प्र. ७५

६४९. कामसेना नांवाची दासी.

६५३. क्षीणावस्थेंत देखील रुक्मिणीच्या शृंगार-शोभेल ( अनंगा ) सौंदर्याची झळाळी प्राप्त होत होती, असें वर्णन करीत असतांना मधेच थांबून कवि म्हणतो की, रुक्मिणीच्या चेहेऱ्यावरील भावांचें वर्णन करणें बरें नव्हे. कारण ते परब्रह्म परमेश्वराचे भोग-विषय होते. त्यांचें आसक्तिपूर्ण वर्णन करणें आपणांला शोभणार नाही.

६५६. कामकळा नांवाच्या सखीने रुक्मिणीला आधार (लागु) दिला.

६६३-६४. ज्या मदनाने शंकरासारख्या यतिश्रेष्ठाला जर्जर केलें ( आधा केला ) त्याचा स्वामी ( पिता ) श्रीकृष्ण अर्थातच अतिशय सुंदर

असणार ! त्या श्रीकृष्णाच्या वियोगामुळे श्री ( लक्ष्मी, रुक्मिणी ) निस्तेज झाली ( उपखे ) यांत काय आश्चर्य आहे ?

**कथासंदर्भ :** श्रीकृष्णाचा पुत्र प्रद्युम्न. प्रद्युम्नाला अनिरुद्ध नांवाचा मुलगा होता. बाणासुराची कन्या उषा हिने त्याला स्वप्नांत पाहिलें व तिचें त्याजवर प्रेम बसलें. उषेची चित्ररेखा नांवाची सखी होती. तिने अनिरुद्धावर मोहिनी टाकून त्याला द्वारकेतून उचलून आणलें व उषेबरोबर त्याचें मीलन घडवलें उषेच्या महालांत अनिरुद्ध विलास करीत असतो हें बाणासुराला कळतांच तो संतापला. त्याने अनिरुद्धाला कैदेंत टाकलें. हें प्रद्युम्नाला समजतांच तो श्रीकृष्णासह शोणितापुराला आला. त्यांचें तेथे युद्ध झालें. या युद्धांत बाणासुराच्या बाजूने शंकर लढत होते. पण त्यांना प्रद्युम्नाने जर्जर केलें. या कथेचा येथे संबंध आहे.

६६६. स्वप्नांत **(सिवना)** घाव लागून मूर्छित पडलेल्याला ज्याप्रमाणे जागृति ( **उपहुडु** ) हीच पंख्याप्रमाणे ( **विजना** ) होय त्याप्रमाणे. मूर्छित माणसाला पंख्याने वारा घालून सावध करतात हें लक्षांत घेऊन अर्थ लावावा.

## प्र. ७६–७७

६६८. जयाचेन बोलें लक्ष्मी ( रुक्मिणी ) तोखे ( आनंदित झाली ) त्या द्विजापासौनि ( पेक्षा ) देखणें ( दूरदृष्टीचा, शाहणा ) आन नाही.

६७०. श्रीकृष्णाची भेट हेंच बक्षीस ( उचित ). **उचित** शब्द बक्षीस या अर्थी १३७, ३४५, ३६६ या ओंव्यांत वापरलेला आहे. शिशुपाल–वधांतील पुढील चरण पहा : मग माटांतें **उचितीं** वारितु : तेवींचि घोडियाचा खांद थापटितु. ( ओ. ५१७ )

६७३. **तरी देह सांडी** : तर मग मी प्राण देईन : **सांडी** आज्ञार्थी घेतां उपयोगाचें नाही.

६७५. **आखरीं परागाचां** : परागाच्या शाईतील अक्षरांनी.

६७९. तुझ्या आवडीचा–प्रेमाचा आनंद हें आकाश; त्यांत रममाण झालेली ( स्वच्छंदाने विहार करणारी ) मी चंद्रकळा.

६८०. शिशुपाळाचें नांव हाच महारोग. त्या रोगाने मार्झी सर्वांगें **दाढेलीं** = आपल्या दाढेखाली घातलीं. अथवा, **दाढणें** = मंत्रतंत्रादिकांनी

निःशक्त, चलनवलनहीन करून सोडणें.

६८१. तुझ्या अप्राप्तीचें दुःख हेंच तीक्ष्ण हत्यार ( **सामथा** = छिद्र पाडण्याचें हत्यार ). तें, आधींच बलहीन असलेल्या माझ्या अंतःकरणांत एकसारखें फिरत आहे. त्यामुळे अंतःकरणाला घरें पडत आहेत.

६८२. **अवस्थेचें भुररें** : तगमगीचा जादूटोणा (अथवा गोड विष).

६८५. मला आपणाविषयीं केवढें प्रेम वाटतें तें मी कसें सांगू ? शब्दांच्या साह्याने तें प्रेमसुख वर्णन करणें शक्य नाही. त्याचें यथार्थ वर्णन शब्दांनी होऊंच शकत नाही. आणि तरीहि तें प्रेमसुख शब्दांनी वर्णन केलेंच तर त्या प्रेमाला ( आवडी ) मात्र कमीपणा येतो. तेव्हां आपणावरील माझें प्रेम मी शब्दांनी वर्णन करीतच नाहीं. **मुद्रित जाण-रायें** : माझी ही मुद्रित ( थोडक्यांत केलेली, अथवा, जिच्या शेवटीं मुद्रा ठोकलेली आहे अशी ) विनंती, जाण-रायें ( जाणत्यांचे स्वामी = सर्वज्ञ असे आपण त्यांनी ), मनीं वाचावी ( मनांत ओळखावी ). आपण सर्वज्ञ आहांत, तेव्हां माझ्या या विनंतीचा खराखुरा भावार्थ मनाने ओळखूं शकाऊच ! **मुद्रा** शब्दाचा **सारांश** या अर्थाने पुढील उपयोग पहा " तो परिपाठीं उलथा : सांगतां नावरे कथा : या कारणें बोलैन सर्वथा : **मुद्रानिया** " (ज्ञाप्र.२०९).

## प्र. ७८-७९

६८७. विरह-तापाने रुक्मिणीचे हात इतके तापले होते की त्यामुळे तिने हातांत धरलेल्या विड्यांतून देखील धूर निघत असे; ' पळवा ' म्हणजे वाळलेला पाचोळा असाहि अर्थ आहे. पहा : ' भीमप्रतापतपनें झाले बहु शुष्क ते जसे **पळवे** ' (मोरो. विरा. १-१६७).

६८९. आपण हातांत धरलेले विडे कां जळावेत याविषयी रुक्मिणी कल्पना करते. आपणाप्रमाणेच श्रीकृष्ण देखील उपभोग्य वस्तूंचा स्वीकार करीत नसेल. म्हणून या भोग्य वस्तु ( तांबूल वगैरे ) विरहज्वरामुळे आहाळत असतील (दादैले) व जळत असतील.

६९३. **जैसा वारा** : वाऱ्यावर आरूढ झालेल्या जाईच्या फुलांच्या सुगंधाने थापटतांच (इशारा देतांच) वारा जसा वेगाने धावत सुटतो त्याप्रमाणे.

६९४. " रेवंतक तो सुर्यांचा घोडा : रेउनि जाय : तथा दळवटे "

(टीप). ज्याच्या तेजासमोर सूर्याचा घोडा देखील दडपला जात असे, असा. **लक्ष्मियेचा** (वारू देखाल) **खांचना** (तुच्छ होय). सुदेवाबरोबर असलेले घोडे इतके वेगवान होते की त्यांच्यासमोर सूर्याचा घोडा, प्रत्यक्ष वायु व लक्ष्मीचा घोडा, हे सर्व तुच्छ होत.

६९५. ' **सुआरू** = वस्त्रें देता ' (टीप). पण ' **सूवार** आणिती बोनें वीस्तारीती नारी कुशळा ' (धउ. ४४). यावरून **सूवार** = आचारी असा अर्थ दिसतो.

६९८. **तुमचिया जवळिका** : तुमच्या सांनिध्यामुळे आम्हांला आज हें भाग्य लाभलें (आम्ही सदैव).

७००. **सोरट** : सौराष्ट्र; काठेवाड प्रांत.

७०२. श्रीकृष्णाच्या राज्यांत लोकवस्ती इतकी दाट होती की त्या देशांत वसलेल्या नगरांमुळे तेथील जमिनीचा काळेपणा नाहीसा झाला होता. काळी जमीन अशी दिसतच नव्हती ! जिथे पक्षांना देखील आणि तेंहि एका पायावर (कारण दुसरा पाय ठेवायला जागाच नव्हती) रहावें लागत असे तेथे माणसांना राहायला पुरेशी जागा कोठली ?

७०४. वाणी व व्येव्हारी लोकांना त्या राज्यांत पुष्कळ (**बहुवसु**) तेजी होती. त्यांची चलती होती. व्यापारधंदा फार भरभराटलेला होता.

## प्र. ८०

७११. द्वारकेच्या तेजाचें उंचपण (मोठेपणा, झगझगीतपणा) पाहून असें वाटलें कीं जणु येथे प्रकाशाचें अरण्य भरभराटलें आहे; किंवा श्रीकृष्णाच्या भेटीसाठी अरुणाचें सैन्य या ठिकाणीं उभें राहिलें आहे.

७१२. **हो काज** : खरोखर. **जोतिचें जौळ** : प्रकाशाचा समूह.

७१३. द्वारका म्हणजे जणु राहूच्या भीतीने सूर्याने समुद्रांत लपवून ठेवलेलीं आपल्या तेजाचीं भांडारेंच ! " **गगन-डाउ** : आकाश हाच **गणेश.** " 'डाउ'-चा अर्थ गणेश असा टीपकाराने दिलेला आहे. तो 'सेंदूर ' शब्दाच्या अनुरोधानेच ! **डाउ** शब्द लग्नाच्या वेळीं नवरदेवाच्या मनगटावर बांधलेल्या सुपारीसाठीहि वापरतात. ही सुपारी व बांधण्याचें फडकें

हळदीने भरलेलें असतेंच. गोविंदप्रभुच-रित्रांत हा शब्द आला आहे. " आवो मेळी जाय : कांकण बांध म्हणे : डाउ बांधावा म्हणे : हळदी उटावा म्हणे" (१२४). हाच अर्थ या ओवींतहि चांगला लागू पडतो.

७१४. मुक्तिक्षेत्रें म्हणून प्रसिद्ध असलेल्या नगरींत द्वारकेचा समावेश होतो. पहा : " अयोध्या मथुरा माया काशी कांची अवंतिका। पुरी द्वारवती चैव सप्तैता मोक्षदायकाः ॥ " मुक्तेश्वराने देखील " वाराणसीहूनि तिसरी। सप्तम **मोक्षाची पायरी**। ज्ञानस्वरूप ती माझारीं। आत्माराम वसतसे॥ " ( सभा अ. १-६९ ) असें द्वारकेचें वर्णन केलेलें आहे.

## प्र. ८१-८२

७१६. **पाताळौनि गाढा** : पाताळापेक्षाही अधिक खोल.

७१७. तो खंदक म्हणजे जणु द्वारकेमोवती गस्त ( **घरटी** ) घालणारे नीलवर्ण प्रलय-मेघच !

७१८. " **गळाळे** = उदक उसाळे मारी : **अवर्त** = भोवरे : **उभड** = उदकाचे भडके निघति : **वळसे**=खळाळ : **उकाळिया**= उदकासि उकळी फुटे : **उलाळ**=वायोचेनि योगें उदक हेलावे : **धारसे** = उदक धार धावे " ( टीप ). एकमेकांना दाबून टाकणाऱ्या सावजांच्या ( पाण्यांतील प्राण्यांच्या ) आवाजाने, गळाले, आवर्त इत्यादि आकाशांत गर्जना करीत आहेत असें वाटत होतें.

७१९. **तरिया** : होडगी. **द्रोनि** : ( सं. द्रोणि ) लहान नाव.

७२२. " **मेघांची वीनि साधिली गगनें**=मेघ व्याले का जैसे " ( टीप ). तेथे पसरलेलीं अनेक उद्यानें म्हणजे जणु आकाशांत इतस्ततः विखुरलेले लहान लहान मेघखंडच ! किंवा, वृक्षछायेने निर्माण झालेल्या अंधाऱ्या जागेवर जणु शेषशायी विष्णूने वस्ति केली असें वाटत असे.

७२३. **बोझां(सा)वलें**=रंगले. त्या वनांतील झाडांना श्रीकृष्णाच्या श्यामल कांतीचें भूषणवस्त्र ( **पडप** ) लाभलें होतें. अर्थात् श्रीकृष्णापासूनच जणु त्यांना त्यांचा सावळा रंग मिळाला होता. आणि या सावळ्या वर्णाच्या वहरानेच आकाश रंगलेलें आहे. आकाशाचा रंग सावळा असण्याचेंहि हेंच कारण, अशी कविकल्पना. **झाडळी** : वृक्षसमूह. पहा

" जीवधर्माचियां झाडळीं : मनोरथाचिया वंशजाळीं : तेथ आशातृष्णा सर्वकाळीं : वसती लाहासी " ( ज्ञाप्र. २६६ )

७२५. " पाउळ ( पहुळ )=सैन्य. " समूह. ( टीप )

**७३१. मेरुचां वरिवं(व)टीः** मेरु पर्वतावर.

**७३२.** त्या उद्यानांतील झाडें जर आपण झालों तर मुरारीचें सान्निध्य ( जवळीक ) लाभेल व त्याच्या स्पर्शाचा परमानंद आपणांस प्राप्त होईल या इच्छेने स्वर्गातील देवच त्या ठिकाणीं सुरतरूंचा वेष घेऊन आले.

## प्र. ८३

**७३३. अनंगु जीवावेया** : शंकराने जाळलेला मदन जिवंत करण्यासाठी. कारण रुक्मिणीच्या पोटीं मदन प्रद्युम्नरूपाने जन्म घेणार होता.

**७३४. श्रीकरण** ( संस्कृत ): टाक. यावरून **श्रीकरणी**=लेखक. हेमाडपंताला ' श्रीकरणाधिप ' म्हणत असत तें याच अर्थाने असावें.

**७३५.** संसार हेंच राहाण ( भगत ); त्याला उन्मत्त करणारा; संसारांत खरेंखुरें चैतन्य ओतणारा. टीपग्रंथांत **भवराहाणिचा** ऐवजीं **भवराहाटीचा** असा पाठभेद दिला आहे;पण तो प्रशस्त वाटत नाही.पाठभेदाकडे देखील टीपकाराचें लक्ष कसें असें हे टीपग्रंथांतील या ओवीच्या पुढील टीपेवरून दिसून येईल " भवर राहाटीचा=रुणझुण करीत ते भ्रमर : हें **पाठांतर** : भावें भवराहाटीचा संसार : तल्लक्षणें राहाण " ( टीप )

**७३६.** तो वसंत ऋतु म्हणजे शंकरावर चालून गेलेलें ( पालाणलें ) अनंगाचें सैन्यच ( साहाण ).

**७३७. कामत्त्वाचा सर्वदा** : शृंगाराचा ज्योतिर्षी; मुहूर्त सांगणारा. संभोग—शृंगाराला आता सुरवात होणार हें सांगणारा ज्योतिषी वसंत ऋतु.

**७३८. धेंढेवाळिया होति** : " विरह लक्षणें अग्नि : तेणें धेंडवाळी = सरमाचा मोंदळा बांधिती आन अग्न लावीति : तथा दीवटी : हृदय लक्षणें : धेंडवाळी होउनि : कामरुप काजळी पडे " ( टीप ). वसंत ऋतु म्हणजे संभोग शृंगाराची दिवाळीच. कारण या ऋतूंत संभोगाचा आनंद खूप लुटायला सापडतो. पण यावेळीं ( वसंत ऋतूंत ) विरहिणींची स्थिति कशी होते ? त्यांच्या हृदयांत विरहाचा अग्नि पेटलेला असतो. त्यामुळे त्या धेंडेवाळी

प्रमाणे दिसतात ( **धेंडेवाळी** = दिवाळीच्या दिवसांत गवताचा एक उंच भारा बांधतात आणि त्यावर दिवे लावतात. ) दिव्यांनी व दिव्यांच्या ज्योतीच्या काजळीने युक्त असलेल्या त्या धेंडेवाळीप्रमाणे विरहिणी दिसतात. धेंडेवाळी दिव्यांनी युक्त असतात तर विरहिणीच्या अंतःकरणांत विरहाचे दिवे असतात; धेंडेवाळी काजळीने युक्त असतात तर विरहिणीच्या मनांत विरहामुळे निर्माण झालेल्या संभोगेच्छेची काजळी असते; असें हें रूपक घ्यावें.

**७३९.** हा वसंत ऋतु नव्हे, हा पावसाळाच आहे, अशी अपन्हुती. पुष्पपरागरूपी मेघसमूहामध्ये कोकिल–कूजनाच्या मेघगर्जना होतात. आणि त्या पुष्पपरागरूपी मेघांतून, पुष्परसाच्या पर्जन्यधारा ( बरंगाळी ) विलासी पुरुष ( श्रीमंत ) हेच चातक, त्यांवर पडतात.

**७४०-४२.** वसंत ऋतु हा पुरुष आहे अशी कल्पना करून या ओव्या लिहिल्या आहेत. त्याचें शरीर चंद्राच्या गाभ्याप्रमाणे गौर व श्यामल वर्णाचें आहे. त्याच्या डोळ्यांनी नीलकमलांना देखील जिंकलें आहे. लाल रंगाचें ( अरुणोदय कालीन ) जरतारी वस्त्र त्याने नेसलें असून हातांत लीला-कमल धारण केलेलें आहे. ( वसंत ऋतूंत कमळें पुष्कळ फुलतात ). रूपाने तो मदनापेक्षांहि अधिक विकार उत्पन्न करणारा म्हणून विशेष सुंदर आहे. त्याने आपल्या अंगाला चंदनाची उटी ( ठकारू ) लावलेली आहे. निर-निराळ्या फुलांच्या कळ्यांचे दागिने घालून डोक्यावर आंब्याच्या पानांचा फेटा बांधला आहे. त्याच्या उपभोगामुळे भोग्य वस्तु जणु बहरून आल्या आहेत. त्याच्या डोळ्यांचे कोपरे ( कटाक्ष ) मस्तीमुळे चंचल बनले आहेत. म्हणूनच तो अंधरांत देखील ( रात्रीं ) वनदेवतांना ( वनलतांना ) अनुराग-पूर्वक( सराग ) उपभोग देत असतो. वसंताचा विलास, पुरुषा प्रमाणेच रात्रीं सुद्धा चालूच असतो.

**७४३.** प्रमत्त करून सोडणाऱ्या मलयानिलावर ( बसून ) आपल्या परिवारासहित मोठ्या ऐटीने उपवनांत येत आहे. वसंताचा परिवार ७४४–७५१ ओव्यांत वर्णन केलेला आहे.

**७४४.** तेथील सरोवर हाच उदक देणारा सेवक व उपवनांत पसर-लेला अनंगराग ( शृंगार–प्रेम, संभोगेच्छा ) हाच विडा देणारा सेवक. विड्या-मुळे संभोगेच्छा तीव्र होते म्हणून हें रूपक.

७४५. " **पाडे**=रानगोऱ्हे " ( टीप ). वनांतील ते वृषभ कसे होते ? **चवरियाचे**=आपल्या शेपट्या एखाद्या पताकेप्रमाणे उंच तोलून धरणारे व **उभासिंग**=उभट शिंगाचे. शेवटच्या दोन चरणांचा पदच्छेद टीप-काराने पुढील प्रमाणे केलेला आहे. " **सडकीसीं**=सडकासहीत : सींगें लक्षणें **साबळ** = चवराचे भाले : **सैंग** = सैंभ " (टीप.) याचा नीट समाधान-कारक अर्थ लागत नाही. म्हणून मीं निराळा पदच्छेद केलेला आहे. तेथील '**भारसिंग** = सांबर हे **कोंतेकार** = भालदाराप्रमाणे शोभत होते. ते **सींसा** = आपल्या डोक्याने ( डोक्यावरील शिंगांच्या भाल्यांनी ) **बळिये** = जोराने **सडकि**=टोचीत असत, हल्ला चढवीत असत, हें **सैंग**= निश्चित ! ' असा अर्थ घेणें बरें वाटतें.

७४६. **भाव** ऐवजीं **भार** असा पाठ टीपग्रंथांत दिलेला असून अर्थ पुढीलप्रमाणे केलेला आहे. " बनकरीचे = बनाचां ठाइं : आकर = खाणि आहे कां जया वनाचां ठाइं : भार = दळभार एवं पुष्पजाळींया : जाइले गडे = जाईचे मांदाडे : भावें गडे = सींमा : तल्लक्षेणें धनुवाडे : एवं जाळिया : फुलें लक्षणें कामखंडे = कुऱ्हाडे-बाण : लपवींति = पाना आड फुलें न दीसतीं : कटाक्षांची = सकल जाळियांचे कटाक्ष भाव : ते ऐसेचि जाणावें " ( टीप ).

७४७. राजहंसांचे समूह म्हणजे शंख भेरी वाजवणारे सैनिक. तेथे मयूरपक्ष्यांच्या जोड्या ( दुकवळा ) आपल्या पिसाऱ्यांचीं मोरचेलें ( कुंचा ) उभारून मोठ्या डौलाने ( गाढ़िका ) चालत होते.

७४८. चक्रवाक व चकोर हेच **फळेकार** = ' थोरा फळयाची सैती धरीति ते ' ( टीप ) लांब टोकाची बर्ची धारण करणारे, **लेकार** = ऐवजी **कांतिएकार** असा पाठ टीपग्रंथांत आहे व त्याचा अर्थ ' क ( कां ) तिया ज्या तरुवारा त्या धरिते ' असा दिला आहे. **लेकार** = धारण करणारे, घेणारे असा अर्थ दिसतो : तेव्हां **खम** प्रतींतील **कांतिए लेकार** हाच पाठ घेणें प्रशस्त वाटतें. नुसत्या '**लेकारा**' चा कांहीं अर्थ लागत नाहीं. दापाति जवादिये हे तरवार धारण करणारे सैनिक होते असा भाव. **सावाय** (सायाळ) हेच घोडेस्वार.

७५०. फुलांच्या कळ्यांवर बसून भुंगे जणु काहाळी ( एक वाद्य ) वाजवीत होते. टीपकाराने ' **काहाळी = सहने ( सनई )** ' असा दिला आहे. तो विचार करण्यासारखा आहे.

७५१. लहान पिलें असल्यामुळे त्यांच्या मुखांतून स्पष्ट वाणी निघत नव्हती म्हणून **मुखें-विन** असें म्हटलें आहे.

७५२. ऋतुराज वसंत हा भगत. तो आपल्या सामर्थ्याने मदन–देव तेचा संचार अबलांच्या ठिकाणीं घडवून आणीत असे. त्याच्यामुळे स्त्रियांच्या अंगांत मदन–संचार होत असे.

७५३. शिशुपालवधांतील पुढील ओवी पाहा : कैसा ऋतु मातापिता : नलनीचें आलिंगनु न सोडी सविता : म्हणौनि मज पांतां : दीस वडील होति ( ६३० )

७५४. जगांतील सगळे जण या ऋतूंत ( विडे नागवेलि ) खातात.

७५५. वसंत ऋतूंत निरनिराळ्या उपभोग्य वस्तूंचा प्रभाव जनतेवर कसा पडलेला असतो त्याचें वर्णन या व पुढील दोन ओव्यांत केलेलें आहे. कस्तुरीने चांगलाच वेध निर्माण केलेला असतो (मालाथिलें.) कस्तुरीचा उपभोग आपण घ्यावा असा वेध सगळ्यांना लागलेला असतो.

७५८. केशर–मर्दनाने अंगें हळुवार ( अलवार ) झालेलीं असतात; म्हणून रत्नालंकार घालून शरिराला शीण येतो. यामुळे वसंत ऋतूंत स्त्रिया अंगावर रत्नालंकार न घालतां केवळ कापराचे अलंकार धारण करतात.

७६०. केशराचें व कस्तुरीचें पाणी उडवून जलक्रीडा केल्यामुळे कामी जनांच्या अंगावरील नाजुक वस्त्रें चित्रविचित्र ( भिन्न भिन्न रंगांनी रंगलेलीं ) दिसतात.

७६१–६२. वसंत ऋतूंत जिकडे तिकडे रंगांच्या पिचकाऱ्या ( सिंपणारी ); पाण्याचे हौद; चंदन वृक्षाला बांधलेले झोपाळे; थंड पाण्याच्या टांगलेल्या झाऱ्या ( पाण–तुळिया ); फुलांचीं शय्या–गृहें; तेथे परागाच्या शय्येवर फुलांच्या उशा, याच, गोष्टी आढळून येतात. ( स्त्रिया ) सुवर्ण कमळांच्या पानांचीं ( किंवा त्या रंगाचीं, अर्थात केशरी ) वस्त्रें नेसतात. जगाला मोहनी घालणारा संध्यारागाचा ( आरक्त वर्णाचा ) धुळोरा

पसरलेला असतो; चंद्र प्रकाशाचे शीतल अलंकार हे श्रीकृष्णाला फार आवडतात. **( मुरारि मेचु )**

**७६३. अमृत** = अमृताप्रमाणे मधुर अशा पंचम स्वराने, वसंत रागांत ( संगीत शास्त्रांतील एक राग ) श्रीकृष्णाचीं ( किंवा अनंग-राजाचीं ) स्तुतिस्त्रोत्रें जेव्हां कोकिळा गातात तेव्हां सर्व दिशा जणु मूर्तिमती होऊन तीं ऐकायला येतात.

**७६५.** मानिनी आपणहून पतीकडे धाव घेत. तेथे दूतींची (तुडताळींची) मध्यस्थी लागत नसे. पहा " मळेयानिळांचीं बाळांनीं : न म्हणता मानियातें आणी : तैं **तुडताळाचिया** जिनीं : पारुखालियां " ( शिशु. ६३१. )

**७६६.** पहा : झाडां उपजति डोहळे : कामिनियांचे : (उ. ४२९.)

**७६७.** मदनाचें हत्यार तें कोणतें ? तर फक्त उसाचें धनुष्य व त्यावर फुलांचे बाण ( सर=शर ); मग या सामान्य हत्यारांनी तो देवादिकांना कसा जिंकूं शकतो ? याचें कारण त्याच्या सैन्यांत वसंतासारखे शूर योद्धे आहेत म्हणून.

**७६८.** कामाचे कुसुमाचे तीर ( बाण ) कैसे ? ज्या कमलनालासारखे ते बाण होते, त्यांना खरोखरच बाणांचा आकार होता. त्या फुलांचा वास म्हणजे ( बाणाच्या टोकावर लावलेलें ) विषच.

**७७०.** श्रीकृष्णाने जणु मदनाच्या प्रधानाला ( चाळक ) आज्ञा केली होती ( की आता मदनाला जिवंत करायचें आहे, रुक्मिणीच्या पोटीं मदनाला अवतार घ्यायला लावायचें आहे. तर आवश्यक ती तयारी कर. ) म्हणून वसंत ती आज्ञा पार पाडीत होता. यासाठीच त्याने आपलें सर्व सामर्थ्य त्या उपवनांत प्रगट केलें होतें.

**७७१.** तो (वसंत) महुराची पालवी (आम्रमोहर) दे; अवधी (वेली) स्वहस्तीं फुलांचिया वोता सूति ( फुलांचे बहर अर्पण करूं लागल्या ) व वनस्पति, अंगासिकें देउनि अमोदाचे पाटे ( सुगधाचे पेले, पाट ) वापिती.

## प्र. ८४–८५

**७७२.** वसंत वनदेवतांच्या कानांत कुजबुजल्याबरोबर त्यांच्या अंगांत मदनाच्या लहरी निर्माण झाल्या व त्या जगजेठी (जगाला जिंकणाऱ्या)

शृंगारभावनेने ( संभोगेच्छेने, **विषया** ), आपल्या हातांतील कंकणें वाजवीत नाचायला लागल्या " वृक्षाचीं पानें वायो योगें वाजति : तल्लक्षेणें **माल्हाडी=** आनंदें नाचतां हातींचीं कंगन वाजति " ( टीप )

७७५. आकाशांत, रंगीबेरंगी पानांच्या जणु गुढ्या उभारल्या गेल्या.

७७६. आंबेमोहोराची जणु तोरणें लावलीं. फुलांच्या चांदोव्याला ( छताला ) फळांचे घोस लटकले व आंत सोनचाफ्याच्या कळ्यांचे दिवे शोभून दिसूं लागले.

७७८. श्रेष्ठांच्या मुखांत शोभून दिसणाऱ्या ( सुमुखीं ) देशी भाषेच्या (बोलीं) साह्याने मी वर्णन करूं लागलों तर साहित्य-रसाचा वर्षाव(वारीखीं) करून त्यांचें आनंददायक व निर्मळ जलाशय निर्माण करून दाखवीन. खेडकुळीचें रूपक भास्करभट्टाने देखील वापरलें आहे. पहा 'साहित्याचिया **खेडकुळिया** : सुदेसा बोलाचिया चिपीळिया : सींपणें खेळेति सावळिया : रसवृत्तीशीं' ( शिशु. २६ )

७७९. द्वारकेभोवतालच्या उपवनांचेंच वर्णन चालूं आहे. मदन व वसंत हे त्या उद्यानांचे माळी, सप्तसागर हे तेथील मोटकरी, चंद्रवायु हे पाणी देणारे बारी व प्रत्यक्ष शृंगार त्या ठिकाणीं लावणी (झाडें लावणें) करीत होता.

७८०. आपला शत्रु जो शंकर (रुद्र) त्याने त्या उद्यानांत प्रवेश करूं नये म्हणून(रुद्रा—**दोषें=कारणें**,साठी)मदनाने त्या उद्यानाभोवतीं कंदर्प—केतकींच्या कुंपणाच्या रूपाने जणु असंख्य हत्यारांचीं रोपेंच पेरलीं होतीं ! आणि त्यांना परिमळाचें (सुगंधाचें) विष (बासट) माखलें होतें. 'साठीं' या अर्थाने **दोषें** शब्दाचे पुढील उपयोग पहा : ' स्फुरण स्फुंदनाचेनि मिषें : प्राण एरझारा करीतु जसे : सौरभ्यें गिवसावेआ **दोषें** : गर्भ सुमनाचा ' (ऋद्धि १४४) " इये सामुद्रिकें परेशें : अंगीकरीलीं येणेंचि अंशें : सृष्टी मुद्रा घालावया **दोषें** : निजपदीचीं " ( ज्ञाप्र. ४१७ )

७८१. आवंधी ( वेलीसाठी, वेलींभोवती ) आळी ( खोलभाग; आळें ) राखौनि त्या अळींकडे चंद्रकांत मण्यांची **पापडी** ( आळ्यांची भिंत ) ढाळिली ( बांधिली ); त्यामुळे ( सोमकांताची पाळी असल्यामुळे ), उपवनांत आलेल्या स्त्रियांच्या मुखचंद्राने ते सोमकांत पाझरत असत व त्यांच्या पाझराचें पाणी **पाखाडीं**(=पाळीच्या उतरत्या बाजूवरून) पडे.

७८२. **हिरविया** ( कच्च्या, न तापवलेल्या ) **दुधा** ( दुधानें ). **सावधा**=साजुक, असा अर्थ टीपकाराने दिलेला आहे. शिवाय **सावधा**= परिमति, पुरेसें असाहि अर्थ घेतां येतो.

७८३. **गुळुळियावरी** : गुळण्या, चूळ टाकून ( रोपें सिंपि )

७८४. त्या वृक्षांच्या शाखा अष्टदिशांना फळांचीं वाणें देति.

७८६. प्रसिद्ध ( प्रसिद्धी ) फळांचिया वेली.

७८७. **घड**=समूह. **अंतराळीं दिसताति** = अतिशय उंच असल्यामुळे आकाशांत असल्यासारखे दिसत होते.

७८८. देवाची पूजा करण्यासाठी देवावर फुलाफळांचा व पक्वान्नांचा ( करज्या वगैरेंचा ) फुलोरा बांधण्याची चाल आहे. तीच कल्पना या ओवींत आहे. श्रीकृष्णावर (गोपाळीं) राय–खजुर व सुरपोफळीच्या झाडांनी आकाशाच्या पोकळींत जणु घड ( फळांचे समूह ) यांचा नक्षत्राप्रमाणे शोभून दिसणारा फुलोरा बांधला होता.

७८९. नेहमी फळांनी भारावलेल्या आम्रवृक्षाच्या पल्लवरूप पताकावर बसून, आम्राप्रमाणे मधुर असलेल्या पंचम स्वराचें वस्त्र गुंडाळून कोकिळा गोविंदाचीं रूपकें ( चरित्रपर गीतें ) गाताति.

७९०. **पाखिसीं** : पंखासहित इंद्राने पर्वतांचे पंख कापून टाकल्याच्या कथेचा येथे संबंध आहे. **गुढे** : शिखरें. ( **गुढा**=पताका; शिखर )

७९२. " **वीणि साधिली** : व्याला. **सोनवर्खीं** = पीवळीं पक्षीकुळें : परस्परें चारा मुखीं घालीति " ( टीप )

७९३. **मेघ वीणि साधिती** : मेघ वितात, प्रसवतात, अर्थात् पर्जन्यवृष्टि करतात त्यावेळीं मेघांतून आवळ्यांच्या आकाराएवढ्या मोत्यांचे घोस खाली पडतात. मेघांतून मोती पडतात असा कविसमय आहे. पहा : ' करींद्रजीमूतवराहशंखमत्स्याहिशुक्त्युद्भववेणुजानि । मुक्ताफलानि प्रथितानि लोके तेषां तु शुक्त्युद्भवमेव भूरि ' **क्षिर-द्राक्ष** : द्राक्षाचा एक प्रकार.

७९४. माधवी–मंडपाचे **विणे** = टोकावर. ' **सीकार** : सुरतें ' ( टीप. ) यावरून **सिकारपणें** : कामोन्मत्त होऊन; धुंद होऊन.

७९५. चकोराला चंद्रिकेची ( चांदण्याची ) मेजवानी देण्यासाठीं,

आपल्या डोक्यावर सतत चंद्र धारण करणाऱ्या शंकराला तेथे आणण्याच्या उद्देशाने जणु ही त्रैलोक्याची शिडी बांधली आहे ( स्वर्ग, मृत्यु, पाताळ या पायऱ्या ) असे ते मांडव दिसत होते.

७९६. **अनुरागीं** : ( १ ) प्रेमाने; ( २ ) आरक्त वर्णाने. **कुंकुम कल्लोळीं**=आरक्त वर्णाचा बहर उधळीत उधळीत.

७९८. दाडिंबें **तढैलीं**=पिकून उललीं होतीं. **निडारें** = खूप प्रमाणांत झाडांना लहडलेलीं. दाडिंबाचें पीक खूप आलें होतें व सगळीं दाडिंबें पिकून उललीं होतीं.

७९९. " **राय जंबीरी** ते नींब्रोणी " (टीप.) जंबीर = लिंबू. **राय-जंबीर** ही लिंबाची एक जात. **दुधावळिया** ( रितुपी ) = दुधाने भरलेल्या. ( रितुपी ).

८०१. **आकाशा उमाणिति** : आकाश मोजीत होत्या. आकाश उंच की आम्ही उंच हें मोजून पाहत होत्या. आपल्या फळांनी नंदनवनाशीं स्पर्धा करीत होत्या. (नदनवनांतील वृक्षांना असलेल्या फळापेक्षा आपल्याजवळ फळें अधिक आहेत या कल्पनेने )

८०३. **वोता** मधुर = **अधिक** गोड.

८०४. तेथे जाणाऱ्या स्त्रियांच्या शरीरसौंदर्याने तेथील अंधार नाहीसा होत असे अशी कल्पना. तुलनेसाठी पुढील ओवी पहा : ' तिए वनीं सूर्येकर न सिरती : तर प्रियांचीं गुप्तलिंगें केंवि दिसति : परि गौर मुखचंद्र बखलिती : अंधकाराते " ( शिशु. ६२० ).

## प्र. ८६

८०५. **खातां** : कोनाड्यांत. **सहस्रनामांचिया** : विष्णुसहस्रनामांतील शब्दांनी द्योतित होणारीं परमेश्वराचीं रूपें. त्या रूपाच्या आकृति.

८०७. जो ( वेध-चाफ्याचा ) अमोद् मधुकरांच्या गोता ( कुळाला ) सायोजेता दे ( जो सुगंध घेतल्याने भ्रमरांना सायोज्यता प्राप्त होते, ते मृत्यु पावतात. ) त्या वेध-चाफ्याच्या तळीं, संभोग करून दमलेल्या स्त्रिया विश्रांति घेतात. संभोगानंतरच्या विश्रांतीची ही कल्पना शिशुपालवधांत देखील आहे. पहा : " चंदन तरुचिया पालविया : परागाचिया सुपवतिया : तेथ डोळां

लागे **रती सिनलिया** : राजकुमरी " (२५७). चाफ्याच्या फुलाकडे भुंगे कधीच जात नाहीत, हें प्रसिद्धच आहे.

**८०८.** भवर (आणि) रंग-बाहाळा (रंग=राग=अनुरागयुक्त) मधुकरी, आंबेयाचा उपरवाळा (आम्रवृक्षावर) बसून, जगदळा (जगाला पीडा देणारा) अनंगु जीववावया, कमळा—स्वतुरासीं (हे पाताळांतील गायक) वादें (स्पर्धा करून, त्यांना जिंकण्याच्या इच्छेने) गाती. कमळा—स्वतुर यांनीं गायन करून मदालसेला जिवंत केलें अशी कथा आहे. 'तुम्ही मदालसेला जिवंत केलें तर आम्ही अनंगाला जिवंत करणार' अशी भ्रमरांची स्पर्धा.

**८११.** मदनाचें बीकभरी (चिकाने, दुधाने भरलेलें) हातियेर=स्तन; पयोधर. कर्णिकाराचीं फुलें स्तनाप्रमाणे दिसत होतीं. **सिंधुवार** वृक्षाचीं फुलें मोत्यासारखींच दिसतात. पहा 'अशोकनिर्भर्त्सितपद्मरागमाकृष्टहेमद्युतिकार्णिकारम् । **मुक्ताकलापीकृतसिंधुवारं** वसन्तपुष्पाभरणं वहन्ती' (कुमार ३—५५.)

**८१२.** घाटोलीं (बटमोगऱ्याच्या कळ्यांवर) व सहस्रदळांनी युक्त असलेल्या कुंकुम (केशरी रंगाच्या) सेवंतीच्या फुलावर भुंग्यांचीं **हाउळि** (झाका, थवे) पडत होत्या. सेवंतीचें फूल हजार पाकळ्यांविषयी प्रसिद्धच आहे. पहा : "**सेवंत**पणा बाहेरी । न निगताचि परी । **पातीं सहस्रवरी** । उपलविजे" (अमृ. ९–८)

**८१३.** रसाच्या (मकरंदाच्या) सेजारीं (शय्यागृहांत) असलेल्या मधुकराने (आपल्या गुणगुणण्याने), कोकिळांनी आपल्या (पंचम) स्वराने व सोगौर (राजहंसा सारखे पक्षी,) यांनी राहाण मांडिलें (देवतासंचारासाठी पूजा मांडली) व ते अनंग-**मेचु** (अनंगाला **आवडणारें** स्तोत्र) आळविती (गायला लागले). ७६२ व्या ओवींत **मेचु** शब्द पहा.

**८१४.** केशराचे (१) कुंकुम केशर; (२) चारु केशर; (३) रती—केशर (४) मदन केशर इत्यादि प्रकार आहेत.

**८१५.** वाटोगरी मल्लिका वारुनि (यांचें निवारण करून, त्यांना तुच्छ लेखून) मदन—मोगरे व कर्पुर—कर्णिका आपल्या परिमळामुळे भ्रमर—समूहांना शपथ घालतात की "आमचया परिमळापासि विशेष परिमळ पहा :

मग आणीकाकडे जा : नां तरि आण आहे. " (टीप) आमच्यापेक्षा अधिक सुगंध इतरत्र आढळेल तरच तिकडे जा; एरवीं जाल तर तुम्हांला शपथ आहे.

८१६. **नगरें** ऐवजी **नागरें** वाचावें. **नागरें**=सुंदर, नगरांत चालणारीं. ( नार्णी )

८१७. त्या मुग्धा ( नुकत्याच तारुण्यांत आलेल्या बालिका ) म्हणजे तारुण्यरूपी नगरांतील बाजारपेठाच होत्या; किंवा ते नूतन यौवनाचे समूहच होते की काय!

८१८. **पेरवातिया** : इतर प्रकारच्या अनेक पुष्पजाति.

## प्र. ८७

८१९. आपल्या आवाजाच्या ( गायनाच्या ) मोहनींने कस्तुरी-मृगाचें अंतःकरण आकर्षून घेत होत्या व दान म्हणून ( बक्षीस म्हणून ) त्याजवळची कस्तुरी काढून घेत होत्या. हरिणाला गाणें फार आवडतें. तें ऐकतांना तो इतका तल्लीन होतो की त्याला स्वतःचें भान राहत नाही. पहा " पारधिया गोरि गातां : **हरिणु लुब्धु होए गिता** " ( उद्ध. २७० ).

८२०. **परब्रह्म** : परमेश्वराचें अव्यक्त स्वरूप. **पाहुनि** : पेक्षा.

८२१. वोप ( त्याच्या सौंदर्याची शोभा ) चैतन्यातें ( पहाणाराच्या अंतःकरणातें ) झळंबी ( येऊन बिलगते, वेधते, व्यापून टाकते. ) **कटाक्षीं क्षेव देतां** : दृष्टीने आलिंगन दिलें तर; केवळ दृष्टिमात्रेंकरून पाहिलें तर.

८२२. भोंवती सर्वत्र देवच दिसतो हें खरें, की आमच्या डोळ्यांतील बाहुल्यांची देवाशीं स्वरूपता ( तद्रूपता ) झाल्यामुळे असें भासतें ?

८२४. डोळ्यांना खूप वळसे येतात, म्हणून श्रीकृष्णाच्या मुखाकडे पाहवतच नाही. यामुळे केवळ त्याच्या चरणाकडे मी पाहतें व तेथेच माझें अंतःकरण तद्रूप होतें.

८२७. समुद्राने जणु आपलें सैन्य पाठवलें (तींच सरोवरें). " **गादलें** : जमले " (टीप)

८२८. या व पुढील चार ओव्यांत तेथील सरोवरांचें वर्णन केलेलें आहे. **सिळीं** : शिलांनी, पाषाणाच्या चिऱ्यांनी.

८३०. मूळ मृत्युलोकांतील कमळें हीं क्षणजीवी असल्यामुळे वैकुंठ-

राजाने वैकुंठांतून, कधीच म्लान न होणारीं कमळें श्रीकृष्णासाठीं पाठविलीं होतीं. तींच द्वारकेच्या सरोवरांत होतीं.

८३१. त्या कमळांतील परागाने लक्ष्मीचें देखील प्रेम चांगलेंच संपादन केलें; आणि म्हणूनच लक्ष्मीने कमळांना आपलें निवासस्थान बनविलें.

८३२. कमळाच्या पानावर भुंग्यांच्या विहाराने पडलेल्या रेषा म्हणजे जणु रतीने श्रीकृष्णाला उद्देशून लिहिलेली विनंतीपत्रिकाच. विनंती कशाबद्दल ? तर देवासारखाच सर्वांगसुंदर असलेला मदन आपणांस पुन्हा प्राप्त व्हावा याबद्दल.

## प्र. ८८

८३३. वैकुंठरावो, रुद्र, चतुराननु इंदु ( इत्यादि ) कोडें (कौतुकाने) झाडें जालीं तेथ काइसें नवल ?

८३४. इंद (द्र) गगन हें वृक्षाचें नांव. पुढील ओव्यांत आलेलीं **रसरजन, कामकेशर** व **देववल्लभ** हीं देखील वृक्षांचींच नांवें होत. याच वृक्षांचे वेष निरनिराळ्या देवतांनी घेतले होते.

८३८. **विपायें** : कदाचित्. पहा " जया दोघामाजी एकादें । **विपायें** उमजलें होय निदे " ( अमृ. १–१४ )

८३९. वनस्थळी हींच एक बाजारपेठ, तेथे परिमळाचा माल उत्ता ( सगळाचा सगळा ) एकदम विकत घेणारे बडे व्यापारी म्हणजे भुंगे, आणि तोच माल सर्वत्र दूरवर नेऊन विकणारे फिरते दुकानदार ( चाटे ) म्हणजे मलयानिल. **वनीज वाहाति** = व्यापाराचा माल वाहून नेणारे.

## प्र. ८९

८४०. **खेचरी** : आकाशांत विहार करणाऱ्या ( मदन येक्षिणी ).

८४१. **वोलि-सेले** ( एक शब्द वाचावा )=अतिशय मृदु व तलम वस्त्रें. यादव–कुमारांचे वोलिसेले कमलतंतूंचे तयार केलेले होते.

८४२. ' **पोफळगाठी** = परिवटाची गाठी : **वायगाठी** = आतुल पदराची आसुड गाठी : ' ( टीप )

८४३. त्या कुमारिकांचे ते अवयव पाहून मनाला (तें नपुंसक असलें तरी) दादुलेपणाची ( आपण यांचे पति होऊन यांचा उपभोग घ्यावा असी )

होंव होत. संस्कृत मधील पुढील सुभाषित पहा :

नपुंसकमिति ज्ञात्वा प्रियायै प्रेषितं मन :
तत्तु तत्रैव रमते हताः पाणिनिना वयम् ॥

व्याकरणाचा आधार घेऊन अशा कोट्या इतरत्रहि आढळतात. उदा. **नपुंसका प्रेमा**चीं विकारीं : राउळहि भुले " [ ऋद्धि. ३१५ ]. ' तीए **ब्रह्मीं नपुंसकीं** : देवा आवडि कैसी ' ( ऋद्धि. ५०१ ).

८४४. परागाचें **मळणें** = उटी.

८४५. **केसकें** : किंशुक; पळसाचीं फुलें. आपल्या हाताने पाण्यांत पळसाच्या फुलांचा रंग कालवून, तें सुगंधी पाणी रंगवीत होत्या, रंगीत पाणी तयार करीत होत्या. त्या कामकिशोरींच्या नेत्रकटाक्षांच्या समूहांत ( गर्दींत ) त्यांनी आपल्या हातांत घेतलेल्या नील-रत्नांच्या पिचकाऱ्या लक्षांत देखील येत नव्हत्या.

८४६. **कनकधार** = पिचकारींतून उडणारी जलधारा. **कख** प्रतींतील **कनधारा** पाठहि योग्य आहे. शिशुपालवधांत " आत्रो दुजी **कनकधार** लागती : तरी पाणिएं वाति पाजळति ' ( ६७० ) असा हा शब्द येतो. तथापि कांहीं हस्तलिखितांत ( शि. व ) **कनधारा** हाहि पाठ आढळतो.

**होति केळि-गर्भा** : "जळकेळि खेळतां स्त्रियाचां आवयत्रीं धारा सीरती : तेणें वस्त्रें फुगे होति : ते गर्भ : " ( टीप )

८४७. नंतर श्रीकृष्णाशीं जलक्रीडा करायची होती त्याची त्या तालीम करीत होत्या.

८४८. रत्नाशीं रत्नाची कांति जशी एकरूप झालेली असते तशी त्यांचीं वस्त्रें त्यांच्या शरीराशीं एकरूप झालीं होतीं; पूर्णपणें चिपकलीं होतीं.

८४९. **वाहातपणें** : वर्णन करीत असतां मी वाहात गेलों व रस ( वर्णनाचा रस ) जर आवरला गेला नाही तर **कथे ठाकैल** ( कथाप्रसंग तसाच वर्णन करायचा राहून जाईल ).

## प्र. ९०.

८५०. **वानियां** : वर्ण, प्रकार. **पारणें होय** : तृप्ति होते.

८५१. **मालखंड** : साखरेचा एक प्रकार; खडीसाखर. ' **माल-**

**खंड** = नबाद साकर ' ( टीप ). पहा " अहो गुळा साखरे **मालेयाचे** । बांधे तरी एकाचि रसाचे । परि स्वाद गोडियेचे । आन आन जैसे ॥ (ज्ञा. १०-१३.)

८५३. (राजकुमारांची) **लळवडि**=लाडक्या : हातिची वैहाळी (क्रीडा) व वारुवाची वैहाळी ( घोड्याची क्रीडा ) पांत : ते राजकुमार जणु तालिमखान्यांत एकमेकांबरोबर तालीमच करीत होते. कांही पारव्यासारखें घुमून क्रीडा करीत होते. टीपकाराने ' **लळीवाडी**=हातीचीं पिलीं ' असा अर्थ दिलेला आहे. **लळेवड** शब्द 'लाडका ' या अर्थाने उद्धवगीतेंत 'तो भक्त–चक्रचुडः मियां केला **लळेवडु** : म्हणौनि तयासि नाही कव्हणाचा पाडु : चराचरीं ' ( ८०९ ) या ओवींत आढळतो.

## प्र. ९१.

८५५. पश्चिम समुद्र हाच ' पांचसे गाउवें ' लांब असा भास्वत नांवाचा रत्नांचा पर्वत. छत्तीस योजनें लांब असलेली द्वारका म्हणजे त्या पर्वतांत कोरून काढलेलें एक लेणेंच.

८५६. ' **मळय-पांचौर** = यक्षकर्दमाची पेटी ' ( टीप ). सुगंधी पेटी. उद्धवगीतेंत हा शब्द ' ब्रह्मसुखाचें **मळय-पांचौर** : जि कवणा वेचिलें ' ( १२५ ) या ओवींत आलेला आहे. त्यावरील टीपेंत ' पांचा सुगंधाचें ' एवढाच अर्थ दिलेला आहे. त्याचप्रमाणे ' सर्व सुखाचें **मळये-पांचौर** : जाण माझें स्वरूप ' ( उद्ध. ६६२ ) या ओवीवरील टीपेंत ' कापुर : कस्तुरी : जवाद : केशर : चंदन ऐसे पांच परीमळ ' असा अर्थ दिला आहे.

८५७. द्वारका म्हणजे शहराच्या आकारांत गोठलेलें पाणीच. जणु समुद्राचें पाणी गोठून द्वारका नगरी तयार झाली असें वाटत होतें.

**जळ-मांडवी** : जलक्रीडा. ( **जळमंडप** नांवाचा कळसूत्री बाहुल्यांचा एक खेळ आहे. **जळमांडवी** नांवाचा एक पानवेल असून ती पाण्यांत टाकली म्हणजे तिच्यावर माती बसते व त्यांतून नवीन नवीन कोंम उद्भवतात. पहा. दृष्टांतपाठ. पान १०६. )

८५८. तारकासुराने ( स्वर्गावर ) चढावणी केली त्यावेळीं समुद्राने आपल्या पोटांत सामावून ठेवलेलीं नक्षत्रें म्हणजेच ही द्वारका.

८५९. श्रीकृष्णाचा वेष ( परब्रह्माने श्रीकृष्ण स्वरूपाचा घेतलेला वेष = अवतार ) हीच बरवंठ (चांगली) दिवाळी. तेजिठ ( तेजःसंपन्न ) ज्योतिष्चक्र ( देवता-समूह, अथवा प्रकाश-समूह ) ओवाळूं आलें. ज्योति-चक्र असा सामासिक शब्द वाचावा. आली ऐवजी आलें हा सम प्रतींतील पाठ घेणें अधिक इष्ट वाटतें. वेष-दिवाळी ऐवजी टीप ग्रथांत यश-दिवाळी असा पाठ दिलेला आहे.

८६०. क्षीरसागराशीं स्पर्धा करण्यासाठी ( कारण तो नेहमीच परब्रह्मास आपल्या अंतःकरणांत साठवून त्याची पूजा करतो ) रत्नाकरें ( रत्नांचा सांठा असलेला एक समुद्र ) आपली राणीव ( आपलें सर्व ऐश्वर्य, राज्य ) जणु द्वारका रूपाने या ठिकाणीं आणलेलें आहे.

८६१. द्वारका आणि एकवीस स्वर्ग पारड्यांत घालून तोलून पाहिले तर, एकवीस स्वर्ग ( अधिक ब्रह्मलोक जरी पासंगाला घातला तरीहि ) हलके ( कमी वजनाचे ) भरतील. या सर्वापेक्षा द्वारका जड होती.

८६२. द्वारकेचा महिमा जेव्हां कैलास पर्वताने ऐकला तेव्हांच तो गारैला = गार झाला. ( गारठला, थंड पडला. ) तेव्हांपासूनच तो हिमरूप झाला अशी कवि-कल्पना.

८६३. द्वारकेच्या पवित्रपणापुढे ( शुद्धपणा-शुभ्रपणापुढे ) आपलें शुभ्रत्व टिकणार नाही म्हणून लाजेने श्वेतद्वीप क्षीरसागरांत लपून बसलें.

## प्र. ९२

८६४. गगन हेंच सरोवर. कुमोद = चंद्रविकासी कमळ. कमळ= सूर्यविकासी कमळ.

८६५. द्वारकेभोवतीची पौळी ( कोट ) म्हणजे चंद्राचें चांदणें मोजण्याचें आडमापच. आकाशरूपी साळुंकां (शाळुंकेला, शिवलिंगाच्या शाळुंकेला) बांधलेली प्रकाशवती मेखला ( कमरपट्टाच ).

८६६. साहाण-सुद्ध : साहाणेप्रमाणे ( गंध वगैरे उगाळण्याच्या चिकणचोपड्या पाषाणाप्रमाणे ); शुद्ध ( निर्मळ ); त्या पौळीवर मन गेलें तर तें उचलौनि आगडी पडे = त्या अलिकडच्या खंदकांत फेकलें जाई. अशा स्थितींत, त्या पौळीच्या आंत असलेलें हाटाडें ( हट्टी, कठिण ) दुर्ग ( द्वारकेचा किल्ला ) कोणाला प्राप्त करून घेतां येईल ? ( टाकणें = प्राप्त

करून घेणें. उद्धवगीतेतील ओव्या १६५, १९०, २२५ पहा. )

८६७. ती पौळी इतकी उंच होती कीं तिला लावलेले माणकाचे **चिरे**= दगड, त्यांत ( त्यामुळे ) सूर्य देखील लोपत असे आणि त्या पौळीला असलेले इंद्रनील मण्यांचे बुरुज म्हणजे जशीं पर्वताचीं शिखरेंच !

## प्र. ९३-९४

**८६८. पाणि बारेया :** त्या पौळीं मधे **पाणि-बारेया** = पाणी वाहून जाण्यासाठी काढलेले पाट म्हणून **नवसें ( ९०० ) सांटे** = जागा होत्या. आंतील पाणी वाहून जावें म्हणून नउशे ठिकाणीं छिद्रें ठेवलेलीं होतीं. तसेंच एकेका दरवाजावर सोळा सोळा खणाची तेजःपुंज व कलाकुसरीची एकेक माडी होती.

८६९. साटोपा (अतिशययुक्त, भव्य) सिंहाडेयाचिया (सिंहमुखी पाषाणाचे, दरवाजापुढे असणारे कठडे. दरवाजाच्या दोन्ही बाजूंना सिंहाच्या मूर्ती उभारतात. त्यांवर टेकण्याची व्यवस्था असते. यांनाच **सिंहाडे** म्हणतात) नानाविधा सैंभी ( स्वयंभू, अतिशय सुंदर, अप्रार्थित ) कुसरी उभी आणि दरवाजावर **नाटारंभीं** ( तुळईला आधार म्हणून; ४२१ ओवीतील टीप पहा; किंवा नाचायला तयार असलेल्या पवित्र्यांत ) षड्विधा ( षड्विकारांनी युक्त, किंवा षड्विधा = सहा प्रकारांनी सज्जित अशा नाटारंभीं ) पुतळिया द्विजराजु दाखवी ( चंद्र दाखवीत होता. चंद्रप्रकाशांत शोभून दिसत होत्या ).

**८७०. सुदर्शना-तळीं** म्हणण्याचें कारण असें कीं द्वारकेभोवती श्रीकृष्णाचें सुदर्शनचक्र नेहमींच फिरत असे.

८७३. अवघड ( ओलांडून जाण्यास कठीण असे ) अगाध. अगस्तीने समुद्राला पिऊन टाकलें होतें; म्हणून समुद्राला अगस्तीची भीति.

**साती समुद्र :** क्षार, इक्षुरस, सुरा, घृत, क्षीर, दधि, व शुद्धोदक समुद्र.

**८७७. स्नेहाइलिया**=समर्पण केल्या, त्यांचे विवाह लावून दिले.

८७९. चंद्र हा ज्याच्या मुखाचा **आंकणा** ( अंकित ) होता = चंद्रापेक्षाहि ज्याचें मुख अधिक सुंदर आहे व ज्याने आपल्या दातृत्वानें (त्यागें) क्षीरसमुद्र जिंतिला ( त्या ) यादवरायाचें कटक नरेंद्र कवि वानिताहे.

*

# स्थळांची सूची व माहिती.

**अयोध्या**–२४७. औध.

**उजनि**–२३३. उज्जयिनी.

**उत्तर-कुमर**–२१७.मूळशब्द 'उत्तर कुरु' असा पाहिजे. उत्तरकुरु म्हणजे गढवालच्या उत्तरेकडचा प्रदेश.

**अंध्रदेश**–२६७. गोदावरी व कृष्णा या नद्यांमधील प्रदेश.

**कंभोज**–२१५. अफगाणीस्थानचा उत्तर भाग. यालाच कांबोज असें म्हणत असत.

**कार्णिक**–२६९. नर्मदा नदीवरील कर्नाळी नांवाचें गाव.

**कर्नाटक**–२६५. रामनद व श्रीरंगपट्टण मधील मुलुख.

**कांति**–२६३. कनिंगहॅमच्या मतें कांतिपुर शहर म्हणजे ग्वाल्हेरच्या उत्तरेस २० मैलांवरील कोतवाल नांवाचें शहर. काहींच्या मतें हें शहर नेपाळ मधील असावें असें दिसतें. पण २६३ व्या ओवींत वर्णिलेलें शहर दक्षिण भागांतील आहे हें लक्षांत घेतलें म्हणजे येथें **कांची** असा पाठ पाहिजे हें उघड दिसतें. सहदेवाने...... "जिंकोनी **कांची** पुरी। दूत धाडिले त्वरें करीं। लंकापुरा पत्रेंसीं॥ पत्र वदूनि बिभीषण। म्हणे..." (मुक्त सभा.८-१३४) या तुल्य उल्लेखावरूनहि येथे **कांची** शब्द पाहिजे हें दिसेल.

**कांची**=हल्लींचें काँजेव्हेरम; मद्रासच्या नैऋत्येला ४२ मैल.

**कांतिमंडळ**–२३८. कांतिपुरालाच कांतिमंडळ म्हणत असावेत. नेपाळमधील खटमंडु शहराला पूर्वी कांतिपूर असें नाव होतें.

**कारकदेस**–२२८. कारक हा कारूष शब्दाचा अपभ्रंश होय. दंतवक्त्राचा देश 'करूष' असल्याचा उल्लेख आहे. (हरि. अ. १०६). कारूष देश म्हणजे आजचा रेवा प्रांत.

**कावेर**–२६५.कावेरी नदीच्या काठावरील प्रदेश. विशेषतः आजच्या कावेरीपट्टणच्या भोवतालचा प्रदेश.

**कास्मिर**–२१९. काश्मिर प्रांत.

**केरळ**–२६५. प्राचीन केरल प्रांतांत कोचीन, कर्नाटक व त्रावणकोर या भागांचा समावेश होत असे. तथापि या ओवींत मात्र कर्नाटक यांतून वगळला पाहिजे. कारण

कर्नाटकचा स्वतंत्र उल्लेख याच ओवींत आलेला आहे.

**कोंकण**–२७६. हिंदुस्थानच्या पश्चिम किनाऱ्यावरील मुंबई खालचा प्रदेश.

**कौंडण्यपूर**–५३,६४ हल्लींचें कुंडिनपूर. अमरावती (वऱ्हाड) जवळ. 'देशानां दक्षिणो देशस्तत्र वैदर्भमंडलं। तत्रापि वरदातीरमंडनं कुंडिनं पुरम्' (नलचंपू)

**कोळगिरी**–२७७. मलबार किनाऱ्यावरील कूर्गप्रांत. पण नरेंद्राने हा प्रांत पश्चिम दिशेला वर्णन केलेला आहे तें बरोबर दिसत नाही. 'कृत्स्नं कोल्लगिरिं चैव सुरभीपट्टनं तथा'(महा·सभा ३१-६९)

**कोश देश**-२४०. क प्रतींतील को(कौ)शिक हा पाठ अधिक चांगला दिसतो. कोस देश म्हणजे कौशिकी नदीच्या (बिहारमधील कुशी नदीच्या) काठावरील प्रदेश. 'ततः पुंड्राधिपं वीरं वासुदेवं महाबलम्। कौशिकीकच्छनिलयं राजानंच महौजसाम्' (महा·सभा ३०-२२)

**खुरासन**–२२७. मध्य आशियांतील खोरासान प्रांत. उत्तम प्रकारच्या घोड्यासाठी हा प्रांत फार प्रसिद्ध होता.

**चंपावती**–२६६. मुंबईच्या दक्षिणेस २५ मैलांवर असलेल्या चौल बंदराला पूर्वी चंपावती म्हणत असत. याच गावाला रेवदंडा असेंहि नांव आहे.

**चैद्य**–२५०. देशाचें नांव चैद्य नसून चेदि आहे. चेदि देश म्हणजे आजचें बुंदेलखंड व मध्यप्रांताचा थोडासा भाग.

**चौड देश**–२६१. कारोमांडल किनाऱ्यावरील प्रदेश. यालाच 'चोल' असें नांव होतें. गिरिनार येथील अशोकाच्या शिलालेखांत याचा उल्लेख **चोड** असा केलेला आहे.

**जंबु खंड**–२७८. पश्चिम किनाऱ्यावरील कोंकणपट्टीला लागून हें एखादें शहर असावें कारण तेथील राजा 'विजय' 'समुद्राच्या गोठीं वसे' असे याच ओवींत म्हटलें आहे.

**ज्योतिगिरी**– २८१. कोल्हापुर संस्थानांत, कोल्हापुर शहराजवळ असलेला ज्योतिबाचा डोंगर तो हाच असावा असें वाटतें.

**झाडमंडळ**–२४५. गोंडवन. आजचा मध्यप्रांत. लीळाचरित्रांत झाडी मंडळाचा उल्लेख वारंवार येतो.

**तुरुकानन**–२२६. म्लेंछ-मंडळा-जवळचाच हा एक प्रांत असावा.

**त्रिगर्त**–२१७. लाहोर जिल्ह्याच्या भागाला त्रिगर्त असें म्हणत.आजचें जालंधर म्हणजेच प्राचीन त्रिगर्त. त्रिगर्त म्हणजे रावी, व्यास आणि सतलज या तीन नद्यांच्या पाण्याचा प्रदेश.

**त्रिपुर**–२३१. (१) तिपारा. या गावाचा कामरुप (आसाम) मध्ये अंतर्भाव होत असे. (२) त्रिपुर या नांवाचें दुसरें गाव म्हणजे नर्मदा नदीच्या काठावरील जबलपुर जवळचें तेउर. त्रिपुरी कॉंग्रेस जेथे भरली होती तें ठिकाण. २३१ व्या ओवींतील त्रिपुर हें नर्मदा काठावरील तेउरच असावें. कारण याच ओवी पूर्वीच्या ओवींत नर्मदेच्या पलीकडच्या काठावरील महिष्मतीचा उल्लेख आलेला आहे.

**दधी**–२१६.विदर्भात पयोष्णी तीरावर दधिग्राम या नांवाचें एक गाव आहे. त्याच प्रमाणे नर्मदेच्या संगमाच्या पूर्वेस दधीची नांवाचें एक गाव आहे. पण २१६ व्या ओवींत उत्तरेकडील राजे वर्णिलेले असल्यामुळे हें दधी नाव कोणतें तरी निराळें असावें असें दिसतें. हिमालयांतील एखाद्या जमातीचें व तिच्या निवासस्थानाचें हें नांव असावें.

**दंडकी**–२७१.प्राचीन कोकण पट्टींतील एक देश. 'दंडक म्हणजे मध्याचें दंडकारण्य नव्हे तर शूर्पारकाच्या दक्षिणचें जें कोकण तें.' हल्लीची **दंडाराजापुरी**. दंडक देश पूर्वी सहदेवाने जिंकल्याचा उल्लेख महाभारतांत आहे. 'वशे चक्रे महातेजा **दण्डकांश्च** महाबलः' (महा. सभा. ३१-६७)

**दंभोळी**–२७२. रत्नागिरी जिल्ह्यांत **दाभोळ** नांवाचें बंदर. क प्रतींत **दाभोळी** असा पाठ आढळतोच 'दाम्भ जंगल किंवा दाभिलेश्वर या नांवावरून हें नांव पडल असावें असें वाटतें.' (महा ज्ञान.)

**दशार्णव**–२५४. दशार्ण नांवाचे दोन देश होते. भोपाळ संस्थान व माळव्याचा पूर्वभाग मिळून पश्चिमेकडील दशार्ण. आणि छत्तीसगड जिल्ह्याचा ( मध्यप्रांत ) एक भाग म्हणजे पूर्वेकडील दशार्ण देश. ( महा. सभा. अ. २० व ३२

**दिव्यप्रस्त**–२४०.पंजाबांतील जुनें दिव्यकट नांवाचें शहर. 'कृत्स्नं पंचनदं चैव ... ... तथा दिव्यकटं पुरम्' (महा. सभा. ३२-११ ).

**द्राविड देश**.–२५९ मद्रासपासून

सी श्रीरंगपट्टण व केप कामोरीन पर्यंतचा प्रदेश.राजधानी कांचीपूर.

**द्वारावती**–११२. द्वारका.

**निखाडद्वीप**–२४५. माळवा आणि खानदेशाच्या सरहद्दीवरील डोंगराळ मुलुख. निखाड-द्वीप=भिल्लांचे वसतिस्थान.

**नेपाळ**–२२५. हिमालय पर्वतांतील आजचें नेपाळ संस्थान.

**पंचाळदेश**–२५४.गंगा व यमुना या नद्यांच्या दोआबामधील प्रदेश (चंबळा नदीपासून तो उत्तरेकडे गंगाद्वारापर्यंत. रोहिलखंड म्हणजेच पंचाळ देश. उत्तर पांचाळ व दक्षिण पंचाळ असे याचे दोन विभाग होते.)

**पांडियदेश**–२६१. हल्लींच्या तिनेवेल्ही व मदुरा जिल्ह्यांचा समावेश प्राचीन पांड्य देशांत होत असे. राजधानी उरगपुर म्हणजे आजची त्रिचनापल्ली.

**बहिरगिरी**–२२१. हिमालयांतील पर्वत–विभागाचें नांव असावें असे दिसतें. पहा : 'अंतर्गिरी बहिर्गिरी बळें जिंकिली उपगिरी (मुक्ते. सभा. ८-१७.

**भद्रनंदी**–२६९. दक्षिण हिंदुस्थानांत कर्णकैच्या (कावेरीला मिळणारी एक नदी) जवळपास असलेलें हें शहर असावें. कदाचित भद्राचलालाच भद्रनंदी म्हणत असावें.

**भारतवर्ष**–५२. हिंदुस्थान.

**मणिपुर**–२४४. कलिंग देशाची राजधानी. मध्यप्रांतांतील रतनपूर शहर हेंच मणिपूर असावें.

**मत्स्यदेश**–२६३. जयपुर संस्थान. जयपुर संस्थानांतील हल्लींचे विराट नांवाचें गाव म्हणजेच मत्स्यदेशाची राजधानी विराट नगरी.

**मल्लदेश**–२४६.माळवाप्रांत. प्राचीन मल्ल देशांत मुलतानचा सुद्धा समावेश होत असे.

**महाराष्ट्र**–२८६. मराठ्यांचा प्रदेश. आजचा महाराष्ट्र.

**महिकावती**–२२९. मूळ शब्द 'माहिष्मती' विंध्य पर्वत व ऋक्ष पर्वत यांच्या मधील प्रांताची राजधानी. जबलपूर जवळील भेडाघाटच्या जवळपास. कित्येकांच्या मतें इंदूर जवळील महेश्वर तीच माहिष्मती, तर आणखी काहींच्या मतें नर्मदा तीरावरील मांधाता – ओंकारमांधाता – हीच माहिष्मती होय. 'पुरीं माहिष्मतीं, यमौ। तत्र नीलेन राज्ञा स चक्रे युद्धं नरर्षभ' (महा-सभा ३१-२१

**मळयदेश**-२४८. 'माला' नांवाचा एक देश. मगध देशाच्या वायव्य बाजूला.

**मळयाचळ**-२४९. म्हैसूर संस्थानच्या दक्षिणेकडील मलय नांवाचा पर्वत. सात प्रमुख कुलपर्वतांपैकी एक.

**मळिवाळि**-२५९. मलबार प्रांत. याचाच मल्लार असेंहि नांव होतें आजचें त्रावणकोर संस्थान.

**मान - सरोवर** - २१३. मानस सरोवर. पश्चिम तिबेटांतील हूण देशांत असलेल्या कैलास पर्वतांत वसलेलें सरोवर. एक हाटक देशाजवळचें. पहा. ' सरो मानसमासाद्य हाटकानभितः प्रभुः ' ( महा. सभा २८-५ )

**मिथळा**-२५३. तिरुहत प्रांतांतील जनकपूर. विदेहाची राजधानी.

**मेरुमंडळ** - २८२. बदरिकाश्रमाजवळील रुद्रहिमालय व भोंवतालचे इतर भाग ( रुद्रहिमालय, विष्णुपुरी, ब्रह्मपुरी, उद्गारिकांथ व स्वर्गारोहिणी हे पांच भाग. )

**म्लेंच्छमंडळ**-२२६. कालयवनाच्या प्रदेश कोणता तें हरिवंशांत व महाभारतांत स्पष्टपणें दिलें नाही. पण तो प्राग्ज्योतिष नगराजवळ - आसाम प्रांतांत असावा. कारण राजसूय यज्ञाचे वेळीं प्राग्ज्योतिषाचा राजा भगदत्त हा आपल्याबरोबर म्लेंच्छाधिपति व यवनांना घेऊन आल्याचें वर्णन आढळतें. 'प्राग्ज्योतिषाधिपः शूरो म्लेंच्छानामधिपो बलिः। यवनैः सहितो राजा भगदत्तो महारथः ' ( महा. सभा. ५१-१४ )

**रश्मिजाळ**-२२९. कुंतिभोज राजाचें वसतिस्थान चंबळा नदीच्या काठावर कुठे तरी असावें. त्याच प्रदेशाला 'कुंतिभोज' हें नांव होतें.

**राजगृह**-२४२. मगध देशाची अति प्राचीन राजधानी. हल्लीचें राजगिर ( बिहार प्रांत. )

**लोणार**-४६४. मेहेकर तालुक्या- ( बुलडाणा जिल्हा ) मधील गाव.

**लोहित देशमंडळ**-२२०. ब्रह्मपुत्रा नदीच्या उगमाजवळचें लोहित सरोवर = लोहित देश; आणि त्याच्या भोंवतालचा प्रदेश. ' देशमंडळ ' ऐवजी ' दशमंडळ ' असा पाठ पाहिजे होता. पहाः ' व्यजयल्लोहितं चैव मंडलैर्दशभिः सह ' ( महा. सभा. २७-१७ )

**वंगदेश**-२२९. बंगालप्रांत.

**वाराणसी**-२४८. काशी; बनारस.

**वैदर्भ**–५४. विदर्भ; वऱ्हाड.

**वोडियान**–२६८. हिंदुस्थानच्या दक्षिण किनाऱ्यावरील एक देश. नक्की कोणता तो सांगतां येत नाही.

**शोणितपुरी**-२३७. कुमाउन प्रांतांत केदारगंगे ( मंदाकिनी )च्या काठावर वसलेलें शहर. आज देखील त्यास शेणितपूर असेंच नांव आहे.

**श्रीशैळ**–२६१. कृष्णा नदीच्या काठावर असलेलें कर्नाळ प्रांतांतील एक देवालय. हें एका उंच पर्वत—टेकडीवर वसलेलें असून प्रसिद्ध बारा ज्योतिर्लिंगापैकी एक आहे.

**सप्तमंडळ**–२२४. हिमालय पर्वतांतील सात लहान लहान विभाग मिळून बनलेला प्रांतविशेष. ' इंद्रपर्वतीं बहुनायक। किरातरायांचें सप्तक। उभें ठेलें करभारें' ( मुक्त. सभा. ८-६४ पहा ).

**समुद्र देश**–२५७. हें एका विशिष्ट देशाचें नांव दिसत नाही; तर सर्वसाधारणपणें समुद्रविभाग असा याचा अर्थ घ्यावा.

**सिंधु देश**-२८१. आजचा सिंधप्रांत.

**सागरसंगम**–२३८. आजचें गंगासागर. सागरसंगम हेंहि नांव अजून चालू आहेच. गंगेच्या मुखाशीं असून यात्रेचें एक अत्यंत पवित्र ठिकाण आहे.

**सिंहपुरी**–२१६. पंजाब प्रांतांत झेलम विभागांत पिंडी दंडखान पासून १६ मैलांवर असलेलें कटाक्ष नांवाचें गाव. हीच पूर्वीची सिंहपुरी होय. ह्यूएनसंगच्या मतें सिंहपुर प्रांत सिंधु नदीच्या पश्चिम किनाऱ्यालगत वसलेला होता. पहाः ' ततः सिंहपुरं रम्यं चित्रायुधसुरक्षितम् ' ( महा. सभा. २७-२० )

**सुवर्ण-पागारि**–२७७. म्हणजेच सुवर्णागिरी असावें. म्हैसूर संस्थानांत सिद्दापुरच्या पश्चिमेकडे असलेलें मस्की शहर. बूल्हरच्या मतें हा सुवर्णगिरि पश्चिमघाटांत कुठेंतरी असावा. कोंकणांतील राजांच्या वर्णनानंतर सुवर्णागिरीचें वर्णन आलेलें असल्यामुळे अलिबाग ( कुलाबा जिल्हा. मुंबई इलाखा ) जवळील कनकेश्वराच्या डोंगराशीं तें बरेंच जुळतें; त्यावरून सुवर्णपागारी म्हणजे कनकेश्वराचा डोंगर असावा असें वाटतें.

**सोरठ**–२८३; ७०० सौराष्ट्र. काठेवाड. गुजराथप्रांत.

**हाटकदेश**–२१४. हिमालयांतील मानस – सरोवराजवळील हूण

नांवाचा देश. ' पुढे हाटक नामक देश । जो गुह्यकीं रक्षिला ॥... पुढे मानस सरोवर । समुद्रप्राय देखिलें थोर ।' ( मुक्ते. सभा. ८-२७;२९. )

**हीमवंत**-२२१. कित्येकांच्या मतें हिमवंती = नेपाळ. तर कांहींच्या मतें तिबेटलाच हिमवंत म्हणत असावे. हिमवंत म्हणजे हिमालय पर्वत हा सरळ अर्थ घेतला तरी चालेल. पहा : ' हिमवंत श्वेत-पर्वत । वोलांडोनि विजयी पार्थ।' मुक्ते-सभा. ८-२७. )



# व्यक्तींची सूची व माहिती

**अघ**–२०७. कंसाचा सेवक. बकासुर व पूतना यांचा भ्राता. सर्पदेह धारण करून श्रीकृष्णाला मारण्याचा याने प्रयत्न केल्यामुळे श्रीकृष्णाने याला ठार केलें. (भाग. १०-१२.)

**अतिक्षेतृ**–२३८. सागर – संगम येथील राजा.

**अभीरकार्तिक** – २८२. अभीर देशांतील (नर्मदेच्या मुखाजवळील) कार्तिकेय नांवाचा राजा. हा रोहीतक पर्वतावर राज्य करी. 'कार्तिकेयस्य दयितं रोहीतकमुपाद्रवत्' (महा-सभा ३२-४)

**अश्वमेधीश्वर**–२५३. हें विशेषनाम नसून ही पदवी असावी. त्याचें नांव रोचमान असें आढळतें. '**सोश्वमेधेश्वरं** राजन्रोचमानं सहानुगम्' (महा-सभा. २९-९). महा-क्षत्रियांचा स्वामी असा अश्वमेधीश्वर. २५३ वी ओवी पहा.

**इशान्य**–२३१. ईशान्य दिशेचा स्वामी.

**इंद्र**–४९२, ७९०, ८३३. स्वर्गाचा राजा. पूर्व दिशेचा स्वामी.

**इंद्रायणी**–१९४, २७८. इंद्राची पत्नी.

**उचितचंद्रिका** – ४४०, ४६७. रुक्मिणीची एक दासी.

**उमा**–१. पार्वती. हिला उमा नांव पडण्याचें कारण कालिदासाने पुढीलप्रमाणे दिलें आहे. 'उमेति मात्रा तपसो निषिद्धा पश्चादुमाख्यां सुमुखी जगाम' (कुमार १-२६).

**उत्तरकुमरू**– २१७. हें राजाचें नांव नाही. मूळ ओवींतील शब्दांचा 'उत्तरकु(म)रु देशाचा रावो' असा संबंध घ्यावयाचा. स्थल-सूचींतील टीप पहा.

**कमळ**–१५८, १८३. पाताळांतील एक गायक.

**कर्ण**–२४१. अंग देशाचा राजा. कुंतीला कौमार्यावस्थेंत झालेला मुलगा. दुर्योधनाचा परम मित्र.

**कल्याणकीर्ति**– १३३, १४९, १५३, ३६६. काशीश्वराचा भाट.

**कंस**–३१०. उग्रसेनाचा पुत्र. मथुरेचा राजा. याला श्रीकृष्णाने ठार केलें.

**काळिया**– ३०८. यमुनातीरावरील डोहांत राहणारा एक सर्प.

**चंद्रसेन**–२८०. महाभारतांत हा चंद्रसेन पूर्वेकडील समुद्र–विभागाचा राजा म्हणून वर्णिला आहे. समुद्रसेनं निर्जित्य चंद्रसेनंच पार्थिवम्' (महा. सभा. ३०–२४)

**चंद्रायुध**–२३९. वंग प्रांताजवळील भागाचा एक राजा. बंगाल प्रांतांत हुगळी जिल्ह्यांतील रत्नाकर नदीच्या काठावर याचें 'रत्नकोश' नांवाचें गांव असावें.

**चित्रायुध** – २१६. उत्तरेकडील सिंहपुरीचा ( पंजाबप्रांत ) राजा. 'तत : सिंहपुरं रम्यं चित्रायुधसुरक्षितं ' (महा-सभा. २७-२०) असा त्याचा उल्लेख आढळतो. याला अर्जुनाने जिंकलें होतें.

**जयंत**–२७८. जंबुखंडांतील राजा.

**जरासंद**–२४२. मगध देशाचा राजा. बृहदश्व राजाचा पुत्र. राजसूय यज्ञाच्या अगोदर दिग्विजय प्रसंगीं भीमाने याचा वध केला.

**तारकासुर**–८५८. एक असुर. सात दिवसांच्या मुलाच्या हातूनच याला मृत्यु यावा, एरवीं नाहीं, असा वर याला ब्रह्मदेवापासून मिळाला होता. हा उन्मत्त झाल्यामुळे शिवपार्वतीचा मुलगा कार्तिकेय सात दिवसांचा असतांना त्याने (तारकासुराने) याला ठार मारलें.

**तुंबर**–१५९. नारदाबरोबर ब्रह्मसभेंत गायन करून परमेश्वराचे गुणानुवाद गाणारा एक गंधर्व.

**तृणावर्त**–२०७. कंसाचा सेवक. याने वावटळीच्या रुपाने गोकुळांत शिरून कृष्णाला उडवून नेलें. पण एका शिळेवर आपटून कृष्णानें त्याचा वध केला.

**त्रिकाळ**–२५७. पागारी नगरांतील त्रिमूर्ति राजाचा मुलगा.

**त्रिभुवनकीर्ति**–५३. विदर्भाचा राजा जो भीमक त्याचा हा पिता.

**त्रिमूर्ति**–२५७. पागारी नगरांतील राजा.

**त्रियंबक**–६. शंकर.

**त्रिनेत्र**–४६८,७३६. शंकर.

**दंडपाळ**–२६० पांडय देशाचा राजा.

**दंतवक्र**-२२८. कारक ( करुष ) देशाचा राजा. याला वक्रदंत असेंहि म्हणत.

**दमघोष**–२५०. चेदी देशाचा राजा. शिशुपाल हा याचाच पुत्र.

**दमयंती**-१९६.विदर्भाधिपती भीमक राजाची कन्या.

**दुर्योधन**–२३१. धृतराष्ट्र चा वडिल मुलगा.

**दुरंद**-२१५. 'दरद' असा मूळ शब्द. कंबोज देशाजवळील एक लहान

देश. दरद हें त्या देशांतील लोकांचें नांव. 'दरदान्सह कांबोजैरज-यत्पाकशासनि :' ( महा. सभा. २७-२६ ) अर्थात् , दुरंद=दरद लोकांचा राजा.

**द्रुपद्**-२५४. पांचाल देशाचा राजा. पांडवपत्नी द्रौपदी ही याचीच कन्या.

**धृतराष्ट्र**-२३१. विचीत्रवीर्याचा वडिल मुलगा. दुर्योधनादि कौर-वांचा पिता.

**नरेंद्र**-१५; ४९; ७५; ३६०; ४१४; ४८८; ८७९. प्रस्तुत काव्याचा लेखक. विशेष माहिती प्रस्तावनेंत पहा.

**नादमूर्ति**-२१९. काश्मीर देशाचा एक राजा.

**नारद्**-१५९. प्रजापतीचा पुत्र.

**पंडु**-२७२. विचीत्रवीर्याचा दुसरा मुलगा. धर्मभीमार्जुनादि पांड-वांचा पिता.

**पद्मावती**-४०८, ४४४. रुक्मि-णीची एक दासी.

**परीक्षिति**-६८. अभिमन्यूचा मुलगा. शुकाचार्यांने भागवत यालाच ऐकविलें होतें.

**पुरुशोत्तम**-२१४. हाटक देशाचा राजा.

**पुतना**-३०६. कंसाची बहीण. कृष्णाला स्तनपान देण्याच्या मिषाने विष पाजीत असतांना श्रीकृष्णाने हिचा प्राण घेतला.

**पौंड्रक वासुदेव**-२४०. कौशिकी नदीच्या काठावर ( बिहार प्रांत ) राहणारा एक राजा. हा श्रीकृष्णा-प्रमाणेच वेष करीत असे. व आपल्या रथावर गरुडाचा ध्वज ठेवीत असे श्रीकृष्णानेच याचा वध केला.

**प्रतापलोचन**-२३१. त्रिपुर नग-रांतील एक राजा.

**प्रधानिका**-६०६, ६२४. रुक्मि-णीची एक दासी.

**बळिभद्र**-२९४, २९५, २९७, ७०८. बलराम श्रीकृष्णाचा वडिल भाऊ.

**बहुधान्यक**-२८२. मेरु-मंडळीचा राजा.

**बाण**-२३७. शोणितापुर येथील राजा. याला हजार बाहु असून हा शंकराचा मित्र होता. उषेच्या निमित्ताने श्रीकृष्णानें याशीं युद्ध करून त्याचे दोन हात ठेवून बाकीचे सर्व तोडून टाकले होते.

**बाहाळिक**-२२५. हिमालय पर्व-ताच्या प्रदेशांतील 'बाल्हीक' नांवाच्या लोकांचा अधिपति.

ततः परमविक्रान्तो **बाल्हीका-**
न्पाकशासनिः ' (महा. सभा. २७–२२ ) याने राजसूय यज्ञ-प्रसंगीं सोन्याचे रथ भेट म्हणून आणले होते. '**बाल्हीको** रथ-माहार्षीज्जाम्बूनदविभूषितम् '(महा. सभा. ५३–५ )

**बिभीषण**–२६३. रावणाचा धाकटा भाऊ; लंकाधिपति.

**ब्रह्मा**–१६१. प्रजापति; ब्रह्मदेव.

**भगदंत**–२२३. प्राग्ज्योतिष (आसाम) प्रांताचा राजा. भौमासुराचा पुत्र. हा गजयुद्धांत प्रवीण असून भारतीय युद्धांत याला अर्जुनाने ठार मारलें.

**भावकळना**–४०६, ४०९, ४१२ ४४१, ६०४, ६२३, ६२९, ६३३, ६४५. रुक्मिणीची एक दासी.

**भारती** (-थी) ५८८, ५१८, ५७७. रुक्मिणीची एक दासी.

**भास्वत**-२५९. द्राविड देशाचा राजा

**भीमक**–विदर्भ देशाचा राजा. रुक्मिणीचा पिता.

**भौम**–२२३. प्राग्ज्योतिष (आसाम) प्रांताचा राजा. भगदत्ताचा पिता. यालाच भस्मासुर किंवा नरकासुर असेंहि म्हणतात.

**मणिराज**–२८१. सिंधु ( सिंध ) देशाचा एक राजा.

**महानिळ**–२२८. महिकावतीचा राजा. हैहय वंशात जन्मलेला. यालाच ' नीळ ' ' नीलध्वज ' अशीहि नांवें आहेत. अग्नि हा त्याचा जावई. अग्नीच्या वरानेच याच्या राज्यांतील ' चहू वर्णांच्या युवती । जारकर्मी विमुक्ता ' होत्या. ( मुक्त-सभा. ८-९३. )

**महिपाळ**-२६१.चौड देशाचा राजा.

**मुकुंद**–२४२ श्रीकृष्ण.

**मेघध्वज**-२४८.मलय देशाचा राजा.

**यमळार्जुन** – ३०६. शापामुळे गोकुळांत वृक्षरूपाने असलेले दोन गंधर्व. उखळबंधनाचे वेळीं श्रीकृष्णाने यांचा उद्धार केला.

**रत्नतिलक**–२६९. कर्णिक देशाचा राजा.

**रत्नध्वज**--२५६. आग्नेय दिशेकडील एक राजा. ' **ऋतुध्वज** । जो संग्रामीं वैरियाकाळवीज ' असा संतोष मुनी कृष्णदासाने आपल्या रु. स्वयंवरांत उल्लेख केला आहे.

**रत्नरथ**–२५८. संतोषमुनी कृष्ण-दासाने ' मेखळरत्नरथ ' असा या नांवाचा उल्लेख केला आहे. तो योग्य वाटतो. त्याच प्रमाणे

'चंड्ड' हें 'चंद्र' चें रूप आहे. दक्षिण देशाचा एक राजा.

**रत्नसेखर**-२६६. चंपावती नगरीचा राजा.

**रत्नायुध**-२८६. महाराष्ट्राचा राजा.

**रंभा**-१५५; १५६. स्वर्गांतील एक देवांगना.

**राहु**- ३०४; ७१३. चंद्रसूर्याला ग्रासणारा एक ग्रह.

**रुक्मिया**-६५; ३६५; ३६६; ३६७; ३७५; ३७६; ३७९; ४०२. विदर्भाधिपती भीमक राजाचा ज्येष्ठ मुलगा. रुक्मिणीचा भाऊ.

**रुक्मबाहो**-
**रुक्मरथ**-
**रुक्मकेश**-
**रुक्ममाळी**- } ६५. भीमक राजाची इतर मुलें. रुक्मिणीचे बंधु.

**रुक्मिणी**-भीमक राजाची मुलगी रु. स्वयंवर काव्याची नायिका.

**रोहितक**-२८२. महाभारतांत रोहितक हें एका पर्वताचें नांव असून तो कार्तिकेयाला प्रिय असल्याचें वर्णिलें आहे. 'कार्तिकेयस्य दयितं रोहीतकमुपाद्रवत्' (महा. सभा. ३२-४). नरेंद्रानें हें राजाचें नांव म्हणून वापरलें तें बरोबर दिसत नाही.

**लक्ष्मी**-६७. १९२,

**लोहित**-२२०. लोहित देशांतील लोकांचा राजा. ब्रह्मपुत्रेच्या उगमस्थानाजवळील प्रदेशाचा राजा.

**वज्रकेतु**-२३६. ईशान्य दिशेकडील एक राजा.

**वज्रबाहो**-२४४. मणिपुर येथील रत्नशेखर राजाचा मुलगा.

**वसुदेव**-२९१ : २९२ श्रीकृष्णाचा पिता.

**विक्रमकेतु**-२५९. माळिवाळि नगराचा राजा. या माळिवाळी नगरालाच संतोषमुनीनें **मल्लजाळ** असें म्हटलें आहे.

**विक्रांत**-२८१. ज्योति - गिरीचा राजा.

**विरहधवळु**-२४७. अयोध्या नगरीचा भूपति.

**विंदानविंद**-२२३, उज्जयिनीचा राजा. '**विन्दानुविन्दा** वावन्त्यौ सैन्येन महतावृतौ' (महा-सभा ३१-१०) याच्याच मित्रवृंदा नामक मुलीशीं श्रीकृष्णानें विवाह केला होता. (पद्म-उत्त २७६-३) 'विंदानुविन्दौ' या महाभारतांतील प्रयोगावरून हे दोन असावेत असें दिसतें. पण 'विन्दानुविन्दस्य सुतां मित्रविन्दां' या पद्मपुराणांतील उल्ले-

ह्यावरून मात्र हें एकाच व्यक्तीचें नांव असावें असें दिसतें व तेंच अधिक बरोबर असावें.

**विंध्य**– २२४. हा सप्तमंडळाच्या राजांपैकी एक असावा असें वाटतें. संतोषमुनीनें तर 'सप्तमंडळीचा **वैधव्य** राजा। तो पृथ्वीतें वे रत्नखांडेपूजा' असें म्हटलें आहे. ( रु स्व. ५-२२ )

**विरामहेश**–२३७. भगवान शंकरासाठीं हा शब्द वापरलेला आहे. बाणासुराच्या शोणितपुराला शंकराचें वास्तव्य नेहमी असे.

**विराट**–२६३. मत्स्य देशाचा ( विराट देशाचा ) राजा. याच्याच वाड्यांत पांडवांनी अज्ञातवासाचा काळ घालविला.

**वीरदर्प**–२६८. आंध्र-देशाधिपति.

**वेदघोष**–१५५, १८०, ३५१, ३५४; ३६७, ६३७. एक ऋषी याचा वृत्तांत ३६७ व्या ओवीवरील टीपेंत पहावा.

**शिशुपाळु**–२५०; ३७३; ३७५; ३७६; ३७९; ४६५; ५०५; ५७४; ६१६; ६४३; ६७१; ६८०. चेदि देशाचा राजा. दमघोषाचा पुत्र. याचे शंभर अपराध भरल्यावर श्रीकृष्णानें राजसूय यज्ञप्रसंगीं याचा वध केला.

**शोभ**–२८७. पश्चिम दिशेचा एक राजा. याचें वसतिस्थान ओवींत दिलेलें नाही. 'शोभ' राजा अंतराळांतच नेहमी राहत असे !

**शुक**–२०. व्यासमुनीला घृताची नामक अप्सरेपासून झालेला मुलगा. हा नैष्ठिक ब्रह्मचारी होता.

**शुक्र**–९६. दैत्यगुरु शुक्राचार्य. मृताला जिवंत करण्याची संजिवनी विद्या याजजवळ होती. कचानें त्या विद्येचें हरण केलें होतें.

**श्रीकृष्ण**–वसुदेवाचा पुत्र; द्वारकाधीश. प्रस्तुत 'रुक्मिणीस्वयंवर' या काव्याचा नायक.

**संकसेखल**–२२७. द्राक्ष-राम(?) येथील राजा.

**संदिपनी**–२११. श्रीकृष्णाचा विद्यागुरु. या ओवीवरील अर्थ-निर्णायक-टीपा पहा.

**समुद्रसेन**–२२९. पांडवपक्षीय राजा. वंगदेशाधिपती. 'वंगराजमुपाद्रवत्। समुद्रसेनं निर्जित्य ...' ( महा. सभा. ३०–२३,२४ )

**सशांक**–२६९. भद्रनंदी गावाचा राजा.

**सारदा**–५, १५८, १९५. सरस्वती.

**सीता**–२२७. श्रीरामचंद्राची भार्या.

**सुगंध**–२७६ कोंकणप्रांतांतील एका राजाचें नांव.

# संगीतांतील पारिभाषिक शब्द

**अभंग**-ख्याल, ठुमरीप्रमाणेच हा गायनाचा एक प्रकार आहे. यांत राग व ताल यांचें कोणतेंच बंधन नसतें. बहुधा एकतारीवर गाइला जातो. अभंग हें एका तालाचेंहि नांव आहे.

**उपांग**- 'अंगच्छायानुकारित्वादुपांगं कथ्यते बुधैः' ( संस. ३-२ ).

**गमक**- 'स्वरस्य कंपो गमकः' ( अमं. १-६९ ). स्वरास कंप देऊन त्याचा उच्चार करणें याला गमक म्हणतात.

**गीत**- 'ध्वनिः शारीरसंजातविचित्र स्वरवर्तनम्। छाया तदाभया-

चार्यैर्गीतमित्यभिधीयते ' ( संस. १–२६. )

**गुजरि**–एका रागाचें नांव. 'गूर्जरी' असें हें मूळ नांव आहे.

**गौडी**–एका रागाचें नांव.

**ग्राम**–' ग्रामः स्वरसमूहः ' ( संस. १–४९ ) सप्तस्वरांच्या समूहाला ग्राम म्हणतात.

**छंद**–गायनाला योग्य अशी विशिष्ट स्वरयोजना.

**जाति**–वर्ज्यावर्ज्य स्वरांवरून रागांचे जे विशिष्ट विभाग काल्पिले आहेत त्यांना जाति म्हणतात. षाडव, ओडव व संपूर्ण अशा या तीन जाति आहेत. तसेंच रागांच्या स्वरूपावरूनहि शुद्ध, सालंग व संकीर्ण अशा तीन जाति कल्पिलेल्या आहेत.

**ताल**–' तालः कालाक्रियामानं भेयः ' ( संस. ४–२० ). हे ताल सात आहेत. त्यांचीं नावें 'तत्रावापोऽथ निष्क्रामो विक्षेपोऽथ प्रवेशनम् । शम्या तालश्च विज्ञेयाः संनिपातश्च सप्तमः' ( संस. ७–७ ).

**देशांक**–एका रागाचें नांव.

**देशांग**–देशपरत्वें 'रागां'-त जो फरक होतो त्याला देशांग म्हणतात.

**धानाश्री**–एका रागाचें नांव. संगीतसमयसारकाराने यालाच 'धन्नासी' म्हटलें आहे. ' धनाश्री ' असेंहि याचें नांव आहे.

**धृपद**–चिजेचा एक प्रकार. ही चीज बहुधा गंभीर प्रकृतीच्या रागांत व प्रौढ भाषेंत रचलेली असते. यांत गायकी कमी असून तालाचीच कसरत जास्त असते.

**धृपदांग**-कोणतीहि चीज ध्रुपदासारखी म्हणजे तालाची कसरत करून गाइली गेली म्हणजे धृपदांग होते.

**प्रबंध**–' चतुर्भिर्धातुभिः षड्भिश्चांगैः स्यात् प्रबध्यते । तस्मात् प्रबंधः कथितो गीतलक्षणकोविदैः ।' ( संस. ४–२ ).

**भाषांग**–' भाषांगानि तथैव स्युर्भाषाछायानुकारतः ' ( संस. २–१ ) कोणताहि राग विशिष्ट भाषेंतून गाइला म्हणजे भाषांग बनतें. हा रागाचा प्रकार नसून पदाचा प्रकार आहे.

**मल्हार**–एका रागाचें नांव.

**मूर्छना**–' क्रमात्स्वराणां सप्तानामारोहश्चावरोहणम् । मूर्च्छनेत्युच्यते ' ( संस. १–६६ ) सप्तस्वरांचा अनुक्रमें आरोह व अवरोह करणें, त्याला अथवा त्या स्वरसमुदायाला मूर्छना म्हणतात.

**राग**–' योऽयं ध्वनिविशेषस्तु स्वरव-

र्णविभूषित: । रंजको जनचित्तानां स रागः कथितो बुधैः ' ( अभं. १–८६ ). लोकांच्या चित्ताला आनंदित करणारी अशी सप्तस्वरांची जी विशिष्ट रचना तिला राग म्हणतात.

**रागांग**–'रागच्छायानुकारित्वाद् रागांगानि विदुर्बुधाः' ( संस. ३–१ ). एखाद्या रागावर, त्याला जवळ असलेल्या दुसऱ्या रागाची छाया पडली म्हणजे रागांग होतें.

**रामक्रि**–एका रागाचें नांव. संगीतसमयसारांत हें नांव ' रामाक्रि ' असें आढळतें. त्यालाच ' रामकृतिः ' म्हटलेलें आहे. (३ -५६).

**रूपक**–' रामान्यारोफणा नेतु स्यादस्मिन् रूपकाभिधा ' (संस. ४–३). यावरून रूपक म्हणजे प्रबंधाप्रमाणेच गायनाचा एक विशिष्ट प्रकार. याचे मुख्य प्रकार नऊ आहेत. ' नवधा रूपकं प्रोक्तं ' (संसा. ४–२०७). नरेंद्राने रूपकाचे प्रकार ५० सांगितले आहेत.

**वर्ण**–' मानक्रियोच्यते वर्णः सचतुर्धा निरुपितः । स्थाय्यारोह्यवरोही च संचारीत्यथ लक्षणम् ' (अभं. १–६१).

**षोडव**–पांच स्वरांच्या रागांना ' षोडव ' राग म्हणतात. ' विकादिनि स्वरद्वंद्वे लुप्तेत्वौडव इष्यते ' (संस. ६–१४).

**शुद्ध**–रागांच्या ज्या मुख्य तीन जाती आहेत त्यांपैकी एक. दुसऱ्या रागाची छाया पडूं न देतां व विकृत स्वर येऊं न देतां गाइलेले राग ते सर्व शुद्ध राग होत.

**श्रीराग**–एका रागाचें नांव.

**श्रुति**–' प्रथमं श्रवणाच्छब्दः श्रूयते ऱ्हस्वमात्रकः । सा श्रुतिः संपरिक्षेया ' सप्तस्वरांतील प्रत्येक स्वरास जो काल नियमित केला आहे त्याचे सूक्ष्म विभाग करून त्या प्रत्येक विभागास श्रुति ही संज्ञा आहे.

**श्रुतिकार**–गायकाच्या मागे वाद्यें वगैरे घेऊन उभे असलेले–श्रुतिधर=सूर धरणारे.

**साळांग**–रागांच्या मुख्य तीन जातींपैकी दुसरी जात. ज्या रागांत दुसऱ्या रागाची छाया येते त्याला 'सालंग' म्हणतात.

**सिकार**–श्रुतिकार पहा.

**सूड**–' प्रबंध गायनाचा एक प्रकार.

**संकीर्ण**– दोन शुद्ध रागांपासून उत्पन्न झालेला, विकृत स्वरांनी युक्त राग.

**स्वर**– ' स्वयं यो राजते नादः स स्वरः ' (संस- ४–२६).